गुणलुब्धाः स्वयमेव संपदः ।

महाराष्ट्र-कुटुंब-माला

पुष्प १४ वें

# त्याग



लेखक

श्रीयुत वामन श्रीधर पुरोहित, बी. ए.

---

फेब्रुवारी १९२९

---

किंमत एक रुपाया



# अर्पणपत्रिका

**ती. सौ. मातुःश्री आणि ती. भाऊ**

ह्यांच्या पवित्र चरणीं

अत्यंत प्रेमादरपूर्वक

**'त्याग'**

अर्पण करीत आहें.

—वामन

# प्रास्ताविक

मी—खालीं सही करणार, ह्या वाङ्मयाच्या प्रांतांत अशा रीतीनें अतिक्रम करीत असतांना पाहून वाङ्मयक्षेत्राच्या रखवालदारांना अचंबा वाटेल. इतर कित्येकांचा स्वतःच्या डोळ्यांवर विश्वास न बसल्यासुळें आपण जागे आहोंत कीं स्वप्नात आहोंत ह्याबद्दल स्वतःची खात्री पुन्हां पुन्हां करून घ्यावी लागेल. कादंबरीची प्रस्तावना म्हणजे तरी झोपेपूर्वीची जांभईच म्हणायची. कित्येक माणसांना अशा आळसांतच देवाचें नामस्मरण करण्याची संवय असते. प्रस्तुत पुस्तकाची प्रस्तावना वाचतांना वाचकांना अन्य प्रकारचें नामस्मरण करून देण्याचाच प्रघात मी पाळीत आहें.

प्रस्तुत कादंबरीच्या कित्येक ‘अवस्था’ झाल्या, त्यांतच नामांतराचा संस्कारही घडून आला. ‘महाराष्ट्र—लक्ष्मी’ ह्या नांवानें ह्याच कादंबरीचा कांहीं भाग एका अल्पजीवी मासिकांतून प्रकाशित झाला. कांहीं कारणानें तें प्रकाशन बंद झालें. महाराष्ट्र—कुटुंबमालेचे संपादक व वाङमयप्रांतांत माझ्या आचरटपणाची सुधारणा आवृत्ति करणारे माझे स्नेही, नारायणराव कुलकर्णी ह्यांनीं तीच कादंबरी आपल्या मालेंत ‘प्रसिद्ध’ करण्याचें ठरविलें व त्याप्रमाणेंही माझी पहिली कादंबरी आज प्रसिद्ध होत आहे. महाराष्ट्र—भाषेच्या उंबऱ्यावर माझी पाउलें पडण्यास सर्वस्वी कारण श्री. कुलकर्णीच होत. प्रस्तुत कादंबरीची कल्पना व त्यानंतरचे तिचे सर्व अवतार ह्यांची जोपासना करण्यांत श्रीयुत कुलकर्णी ह्यांनीं अत्यंत परिश्रम घेतले. माझे स्नेही श्री. दिवाकरकृष्ण ह्यांनीं अत्यंत जिव्हाळ्यानें ही कादंबरी लिहिली जात असतां जें अमोल सहाय्य केलें आहे, त्याबद्दल त्यांचे आभार कसे मानावेत हेंच कळत नाहीं. वाङ्मयांतला माझा चिंध्या—संसार कसा सजवावा ह्याचें पुष्कळ शिक्षण श्री. दिवाकरकृष्ण ह्यांच्याच हातून मला मिळालें आहे. तेव्हां माझ्याकडून तोच संसार एका कादंबरीच्या रूपानें पुढें येत असतां त्यांचा आनंद आणि माझे आभार ह्याचें व्यस्तच प्रमाण पडणार. मतभेदाचे कित्येक भाग असतांना माझे मित्र श्रीयुत महादेव विनायक काळे ह्यांनीं वेळोवेळीं ज्या सूचना केल्या व विशेषतः क्षणोक्षणीं निराश होणाऱ्या मनाला जो धीर दिला त्याबद्दल त्यांचे आभार मानणें म्हणजे बाह्य उपचारानें

त्यांचा अपमान करण्यासारखेंच आहे. लौकिकदृष्ट्या अफाट दिसणाऱ्या पण अंतरंगीं उज्वल असलेल्या श्रीयुत काळ्यांचा स्नेह निरंतन ठेवण्याचें ऋण सतत शिरावर वहाणें हेंच मला श्रेयस्कर वाटतें. श्री. महादेव वामन चित्राव ह्यांनीं आपल्या स्मरणशक्तीच्या कोशांतून एक अभंग देऊन आपला स्नेह 'अभंग' असल्याचें दाखविलें, ह्याबद्दल त्यांचे आभार मानणें आवश्यक आहे. ह्याशिवाय अनेक सज्जनांचें उपकार आहेत, पण सर्वांच्या नामनिर्देशानें उगाच त्या सज्जनांना निष्कारण त्रास देणें बरें नव्हे.

पण ह्या सर्व मित्रांच्या सहाय्याचे खरें बीज महाराष्ट्र–कुटुंब–मालेचे प्रकाशक श्रीयुत विठ्ठल रामचंद्र खाडिलकर ह्यांच्याच हातून झालें. त्या दृष्टीनें त्यांचे मनःपूर्वक आभार मानणें अत्यंत आवश्यक आहे.

प्रस्तुत कादंबरीवर अनेक प्रकारच्या छाया पसरलेल्या दिसून येतील. व्हिक्टर ह्यूगो ह्या ग्रंथकाराचें ऋण प्रत्यक्षपणें घेतलें नसलें तरी त्याच्या Les miserables ह्या कादंबरींत ग्रथित केलेलें तत्व Saints have a past and sinne havers a future ह्याचाच विचार प्रामुख्यानें कल्पनेचा संसार मांडून प्रस्तुत कादंबरींत करण्याचा मी प्रयत्न केला आहे.

स्वतःच्या मतप्रतिपादनार्थ एखादा विषय घेऊन तो रंगवण्याइतका मी स्वतःला मोठा समजत नाहीं. त्यामुळें प्रस्तुत कादंबरींत कांही ठिकाणीं मतप्रतिपादन दिसलें तरी तें त्या परिस्थितीला साजेल म्हणून केलें आहे. स्वतःचा आग्रह म्हणून नव्हे. विशेषतः रंगू व लक्ष्मी ह्या दोन स्त्रियांचा संबंध आई आणि मुलगी एवढ्यापुरतांच दाखवला आहे. अस्पृश्यता निवारण्याची चळवळ घुसडून देण्याचा त्यांत बिलकूल हेतू नाहीं. माझें स्वतःचें धर्मज्ञान त्या दृष्टीनें 'अगाध' आहे.

प्रस्तावनेंत ह्यापेक्षां अधिक तें काय लिहिणार? ज्या सर्वशक्तिमान परमेश्वराच्या कृपेनें व प्रेरणेनें मला हा 'त्याग' तयार करतां आला त्याबद्दल कृतज्ञतापूर्ण वंदन करून हें प्रास्ताविक पुरें करतों.

महाराष्ट्र–नाट्य–
मंदीर
नाशीक.

वा. श्री. पुरोहित.

# प्रिय आश्रयदाते !

मुंबईस एकवेळ निघत असलेल्या " अरविंद " या सुन्दर मासिकाच्या सल्लागार मंडळापैकीं एक प्रमुख सल्लागार, संपादक व लेखक, श्रीयुत वा. श्री. पुरोहित बी. ए. यांनीं 'त्याग' ही कादंबरी हौसेनें 'माले' करितां दिलेली आहे. ही कादंबरी गेल्यावर्षी " मनमोहन " मासिकांत " महाराष्ट्र—लक्ष्मी " या नांवानें क्रमशः येऊं लागली होती. तें मासिक कांहीं कारणामुळें बंद पडल्यामुळें सदरहू कादंबरी ' माले 'ला मिळवितां आली.

मालेच्या मागील कोणत्याही कादंबरीपेक्षां **त्याग** कादंबरीचा थाट निराळा आहे, इतकेंच नव्हे तर ज्या वाचकांना एकच एक प्रकारच्या कादंबऱ्या वाचण्याचा कंटाळा आला असेल त्यांना ही कादंबरी रुचिवैचित्र्य प्राप्त करून तर देईलच. पण विलक्षण चटका लावील असा आम्हांस भरंवसा वाटतो. त्याग कादंबरीचें अंतरंग व हेतु सोज्वळ, उदात्त असल्याचें वाचकांना पटेल आणि बाह्य सजावटीची-समुद्राच्या बाह्य हेलकाव्यांची खळबळ उत्तम प्रकारानें मनाला रमवील यांत शंका नाहीं.

श्री. पुरोहित यांचा हा **त्याग** सर्वांना अत्यंत प्रिय होईल असा आम्हांस पूर्ण भरंवसा आहे. या कादंबरींत एक छायाचित्र दिलें आहे. हें छायाचित्र ललितकलादर्श नाटक मंडळींतील हल्लीं लोकप्रिय झालेले व अल्पावधींत " **पर्लव्हाइट** " अशी रसिकांकडून पदवी पटकावणारे—प्रमुख नायिकांच्या भूमिका करणार, नट श्री० गोविंद माशेलकर, यांचें देण्यांत आलें आहे. हें चित्र कादंबरीकरितां दिल्याबद्दल त्यांचे, व तें देण्यास आनंदानें परवानगी दिल्याबद्दल श्री. बापूसाहेब पेंढारकर ( मालक ) व श्री० गोविंदराव सोळसकर ( मॅनेजर ) यांचे आभार ' माला ' आनंदानें या ठिकाणीं नमूद करून ठेवीत आहे. असो.

मालेचें पुढील पुष्प ' कौटुंबिक गोष्टी ' हें असून यांत प्रो. चिं. वि. जोशी, श्री. वि. स. खांडेकर, श्री. दिवाकरकृष्ण, श्री. 'शिवराम' रा.गो. भिडे, वाग्भट ना. देशपांडे, श्री. सौ. कमलाबाईसाहेब किबे, कु. पिरोज-

बाई आनंदकर, बी. ए., श्री. 'षडानन' श्री. पं. मा. कामतकर बी. ए. इत्यादि सुप्रसिद्ध कथालेखकांनीं आपापल्या लघुकथा देण्याचें कबूल केलें आहे. यावरून मालेचें पुढील 'पुष्प' किती सुंदर–सुवासिक निघेल याविषयीं वाचकांची खात्री होईल. पण त्याबद्दल आजच कशाला अधिक लिहा ! असो.

"त्याग" ही कादंबरी लिहून दिल्याबद्दल 'माला' श्री. वा. श्री. पुरोहित, यांची आजन्म ऋणी राहील.

मालेचें हें पुस्तक आश्रयदात्यांना आवडेल अशी आशा बाळगून व आवडो अशी श्रीगुरुचरणीं नित्य प्रार्थना करून आश्रयदात्यांची थोडक्यांत रजा घेणेंच बरें.

सर्वांचा नम्र,

महाराष्ट्र–कुटुंब–माला.
३९१ नारायण पेठ, पुणें शहर } विठ्ठल रामचंद्र खाडिलकर



श्रीयुत वामन श्रीधर पुरोहित, बी. ए.
" त्याग " कादंबरीचे कर्ते.

*

# त्या ग !



## उपोद्घात



" बाळ सदाशिव, दार उघड बरं दार ! "

एवढे शब्द ऐकल्याबरोबर एक स्त्री झटकन् उठली. तिचा हात खरकटा होता तसाच ठेवून तिनें दाराचा अडसर दूर केला. नेहमींच्या संवयीप्रमाणें ती किंचित्काल थांबली. पण घरधन्याच्या बरोबर कुणीतरी परका इसम आहे हें दिसतांच ती त्याच पावलीं मागें परतली. भैरव आंत शिरला आणि त्यानें मुलाची चौकशी केली.

संध्याकाळ होऊन अंधार पडला होता. वॉर्डर लोकांच्या खोल्यांच्या धुराड्यांतून निघणाऱ्या धुरानें त्या अंधाराला जणू कांहीं काळ्या रंगाचीं पुटं देण्याचें काम चालविलें होतें. कामावरून सुटलेले वॉर्डर लोक आपापल्या घराकडे शांत देहानें पण उल्हासित मनानें चाललेले होते. सार्वजनिक नळाच्या तोट्यावरून पाणी भरण्याच्या धांदलींतच एकमेकांशीं शक्य तेवढें बोलून घेण्याचा सपाटा बायकांनीं चालविला होता. एकंदरींत सारें वातावरण चैतन्यमय दिसत होतें.

भैरव सुद्धां आपल्या घरीं आज विशेष प्रसन्न चित्तानें आला होता. वॉर्डरची नोकरी करतांनासुद्धां मनाला समाधान देणारी एक गोष्ट आज त्याच्या हातून घडत होती. त्याच्याबरोबर आलेली व्यक्ति त्या प्रसन्नतेंत अथवा आजूबाजूच्या चैतन्यांत वाटेकरी नव्हती. ती व्यक्ति दाराच्या बाहेरच उभी राहिली, हें पाहून भैरवानें अगदीं अगत्यानें म्हटलें, " ये-ये-कृष्णा, आंत ये ! परक्यासारखा संकोच बाळगण्याचें कांहीं कारण नाहीं. काढ ते कपडे ! " कृष्णा आंत आला पण अगदीं

एका कोपऱ्याला टेकून उभा राहिला. मानवी संस्काराला अजिबात अनोळखी असणाऱ्या एखाद्या मागासलेल्या जातींतील इसमाप्रमाणें कृष्णा वागत होता. भैरवनें बसायला म्हणून एक सतरंजीची पट्टी टाकली त्यावर कृष्णा बसला. भैरव त्याला मधून मधून एखादा दुसरा प्रश्न करी. कृष्णा जरूर तेवढेच शब्द उच्चारून त्याला उत्तर देई. भैरवाच्या घरधनिणीला-पार्वतीला त्या बाहेर बसलेल्या माणसाबद्दल कुतुहल उत्पन्न झालें होतें. तिनें दोनदां तिनदां दाराच्या आडून कृष्णाकडे पाह्यलें, पण तिला आपलें कुतुहल दाबून ठेवावें लागलें. एकीकडे भाकरी बडवण्याचें काम चालूच होतें. आणि त्याच वेळीं बाहेर आलेला इसम कोण असेल या बद्दल ती आपल्यापरीनें तर्कवितर्क करीत होती.

भैरवनें कृष्णाला विचारलें, " कृष्णा, आज तुला आमच्या हातचें अन्न चालेल ना "? कृष्णानें एक दीर्घ निश्वास सोडला आणि अगदीं खोल आवाजांत त्यानें ' होय ' असें उत्तर दिलें. त्याच्या त्या उत्तरांत आणि निश्वासांत एक प्रकारची विरक्ति भरलेली होती. भैरवाला कृष्णाचा अस्वस्थपणा कळत होता, पण अशा प्रसंगीं न बोलण्यांतच शहाणपणा आहे असें समजून तो शांत राहिला. थोड्या वेळानें भैरवानें पुन्हां एकदां सदाशिवाची चौकशी केली. पार्वतीनें त्याची जिज्ञासा तृप्त केली. किंचित् रागानेंच तिनें उत्तर दिलें, "चहा थोडा मिळाला त्याला दुपारीं म्हणून गेला आहे तो रुसून; कारटं तरी असं " भैरवानें तिला अर्धवटच थांबवलें. मुलाला हिडीसफिडीस करणें त्याला आवडत नसे. भैरव खोलींतल्या खोलींतच फेऱ्या घालीत होता. तो दारापाशीं येऊन थांबला तों समोरून त्याला आपला मुलगा येतांना दिसला. स्वारी इकडे तिकडे पहात सावकाश येत होती. घर दूर होतें तोंपर्यंत अगदीं चैनींत सदाशिव येत होता. पण घर पहातांच त्यानें आपला नूर पालटला. घरांत शिरला तो अशा झोकांत कीं, कोणाची गर्दन उडवून परत आला आहे. आंत शिरतांच सदाशिवानें आपली टोपी वगैरे फेंकून दिली. आणि बसला फिरंगटून. त्या विलक्षण मुलाला पहातांच कृष्णा किंचित् हलला. आपली भटकणारी नजर त्यानें त्या पोरावर स्थिर केली. ती भेदक नजर, ती वाढलेली दाढी, असें सर्व ' प्रकरण ' पहातांच सदाशीव गडबडला.

त्यानें आपला ' दिव्यावतार ' सोडून लगेच तो बापाला जाऊन बिलगला. भैरवानें त्याच्या पाठीवरून हात फिरवला आणि त्याला थोपटीत तो म्हणाला, " भिऊं नको सदाशिव ! आपला कृष्णा आहे तो " पण काय असेल तें असो. सदाशिवानें जी दहशत घेतली तीं त्यानें पुन्हां तोंड म्हणून उघडलें नाहीं.

थोड्या वेळानें जेवणें झालीं. भैरवानें आपली व कृष्णाची पथारी बाहेरच पडवींत टाकली. बाहेर बसल्या बसल्या त्यानें आपली वारकऱ्याची माळ काढली आणि पाडुरंगाचें नामस्मरण तो करूं लागला. लवकरच त्याला डुकल्या येऊं लागल्या आणि विछान्यावर अंग पसरून तो झोंपी गेला.

कृष्णानें सुद्धां जमिनीला पाठ टेकली. त्याला भैरवाप्रमाणेंच झोपेची अपेक्षा होती व आवश्यकता होती. त्याच्या साऱ्या अंगांतून वेदना सुरू झाल्या होत्या. पण तो त्या निमूटपणें सहन करीत होता. उजव्या गालावर एक बारीक भाजल्याचा चट्टा होता, तो वाढलेल्या केसांत झांकून गेला होता. कृष्णाच्या अपमानाची ती खूण त्याच्याच केसांनीं झांकून टाकली होती. कृष्णानें झोपेकरतां डोळे मिटले आणि त्याच्या अंतर्चक्षूपुढें निराळें जग उभें राहिलें. सभोंवारच्या विश्वांतली एकेक वस्तू त्याच्या मनापुढून जात होती आणि नवीनच वस्तू तेथें येत होती. मस्तकांत चालणाऱ्या विचारांचें छायाचित्र घेण्याची कला जर कुणाला साध्य असती; तर कृष्णाच्या डोक्यांत कुरुक्षेत्राची दंगल चाललेली त्या छायाचित्रांत वठली असती. त्याच्या विचारांना शेंडाबुडुख नव्हतेंच. ते कसे तरी येत होते आणि जात होतें. प्रत्येकाची बोळवण करायला दुसरा विचार अतिथीच्या रूपानें हजर होई.

आजच्या स्थित्यंतराचा विचार त्याच्या डोक्यांत आला. काल आपण तुरुंगांत होतों. कालच काय पण आजपर्यंत सात वर्षें आपण तुरुंगांत काढलीं. तुरुंग-तुरुंग आपल्या नशिबीं कां आला ? कृष्णाचा डोळा किंचित् लागत होता. तो ह्या प्रश्नानें खाडकन् जागा झाला. पूर्वस्मृति त्या हृत्पटलावर खड्गाचे तीव्र आघात करूं लागली. कृष्णाला तो मार असह्य झाला. तो उठला. त्यानें अगदीं हळूंच भैरवाजवळ जाऊन पाहिलें. भैरव गाढ झोपेंत होता.

भैरवाचें जीवन शांत श्वासनिश्वासांच्या कांठावरून वहात होतें. कृष्णानें त्याला नमस्कार करण्याकरतां आपले हात वर उचलले. पूर्व स्मृतीनें त्याचे हात तसेंच राहिले. पूर्वस्मृतीनें आठवण करून दिली "जगांत विश्वास तरी कुणाचा धरतोस ? काय कुणाचा नेम ? आजचा दयाळू भैरव उद्यां दयाळूच राहील काय ? कालचा कुटुंबवत्सल कृष्णा--" ! कृष्णाच्या विचारचक्राचा एक एक फेरा संपला. कृष्णा निघाला. अमावास्येच्या निबिड अंधःकारांत लुकलुकणाऱ्या ताऱ्यांनीं कृष्णाच्या हृदयाकाशांत आशा कशी लुकलुकत होती ह्याची साक्ष दिली. पडवींतून कृष्णा खालीं उतरला. त्याच्या पायाला कांहीं तरी बोचल्यासारखें वाटलें. वेदना सुरू झाल्या. त्या अंधारांत त्याला कांहींच दिसणें शक्य नव्हतें. कृष्णाच्या मनस्तापापुढें ती कळ कमीच ठरली. कृष्णा एकेक पाऊल उचलीत होता. आंतून बाहेरून दुहेरी वेदना सुरू होत्या. त्यानें दोन्हींही वेदनांकडे दुर्लक्ष केलें. धीमेपणानें तो रस्ता काढीत होता. प्रत्येक पावलागणिक त्याची हुरहूर वाढत होती. प्रत्येक श्वासागणिक त्याच्या दुःखाची कला चढत होती. तरी कृष्णाला वाटत होतें, हें कांहींच नाहीं; हा पूर्वरंगच आहे.

कृष्णानें गांवाचा रस्ता धरला. डेक्कन कॉलेज टाकून तो बंडगार्डन समोरच्या पुलावर उभा राहिला. किंचित् काळ त्याला वाटलें कीं विसावा घ्यावा. म्हणून अडोसा पाहून तो एका दगडाला टेकून बसला. बंडावरचे पाणी धरणावरून खालीं कोसळत होतें. एखाद्या घरघंटीसारखा तो आवाज कृष्णाच्या कानाला लागला. आपल्या वेदनांशीं त्या पाण्याचा सूर त्यानें मिळविला. दुःखाच्या घरीं पाहुणचार सुरू झाला. रात्रींचा वारा सुटला होता. कृष्णाच्या दाढींतून त्या वाऱ्याचा स्वैर संचार चालू होता. कित्येक जण त्या वाऱ्याकरतां हपापून घर सोडीत होते. त्या वाऱ्यानें उडालेल्या रमणींच्या पदरावर कोणी काव्य रचीत होते. कायमचें घर सोडलेल्या कृष्णाला तो वारा कसचें सुख देणार. अथवा कुठल्या अभिनव कल्पनेनें त्याला पुलकित करणार ?

बसल्या बसल्या कृष्णानें आपलें पाय लांबवले. सडकेवर रहदारी नव्ह-तीच. त्या शांततेमुळें कृष्णाला वाटलें कीं, आपण आपल्या घराच्या पड-वींतच बसलों आहोंत. तुटलेल्या विचारांचा धागा कृष्णानें पुन्हां धरला

आणि त्याचे तंतू तंतू तो विणूं लागला. पण कुठलाही विचार पुरा करण्याचें भाग्य त्याच्या नशीबीं नव्हतें. त्याच्या पायाला कुणाची तरी ठोकर बसली. ज्या पायाला दंश करून पुनीत केलें होतें तोच तो पाय ! एका मानवी वृश्चिकानें त्याच पायाचा दंश घेतला होता. कृष्णा चटकून उभा राहिला. दुसऱ्याचा अनादर झाला ह्या कल्पनेनें त्यानें त्या माणसाच्या पायाला हात लावला. त्या बरोबर तो तिस्मारखान मागें सरला. बरोबर असलेल्या नोकराला त्यानें हुकूम केला. त्या नोकरानें हातांतला चाबूक कृष्णाच्या पाठीवर उडवला. कृष्णाची सहन शक्ति सुटली. त्याच्या डोळ्यांतून जणूं आगीचें झोत चालले होते. त्यानें त्या माणसाचें मनगट गच्च धरलें. अंधारांतच त्याच्याकडे त्यानें नीट निरखून पाहिलें. कृष्णाला ओळख पटली. त्याच्या साऱ्या शरीरांतून धगधगणाऱ्या ज्वाला संचार करूं लागल्या. त्याचा कंठ संतापानें रुद्ध झाला. कृष्णाची पकड त्या नोकरानें सोडवण्याचा प्रयत्न केला. कृष्णानें तिक्त स्वरांत एकच शब्द उच्चारला. "विश्वास" ! तो तिक्त स्वर ऐकतांच विश्वासाची गाळण उडाली की काय कुणास ठाऊक पण त्यानें कृष्णाच्या हाताला झटका दिला. कृष्णानें आपली मिठी सैल सोडली. विश्वास एक अक्षरही न बोलतां झपझप पावलें टाकीत निघून गेला. जातांना आपल्या नोकराला मागून येण्याची त्यानें खूण केली.

कृष्णाचा संताप ओसरत चालला होता. तो दांत ओठ करकरां खाऊन 'विश्वास–विश्वास' एवढेंच शब्द अत्यंत तिटकाऱ्यानें उच्चारीत होता. पाठीवर बसलेल्या चाबकाच्या फटकाऱ्यानें कृष्णा एका भावांतून दुसऱ्या मनोभावांत प्रवेश करीत होता. निमकहराम जगानें आपल्या सद्‌गुणाची खूण त्याच्या पाठीवर उठवली होती. कृष्णा मनांतल्यामनांत चडफडत होता ' काय दुनिया आहे ! पाठीवर मारलेल्या कोरड्याचा वण केवढा वठला आहे. हें सुद्धां पहायला त्या दुनियेला फुरसत नाहीं. विश्वास एक वेळचा जिव्हलग दोस्त. विश्वास पाठ फिरवलेल्या जगाप्रमाणेंच निष्ठूर होता. घातकी होता. कृष्णा संतापाच्या आवेशांत पुढें पुढें चालला होता. विजेची रोषणाई केलेला तो रस्ता कृष्णाच्या डोळ्यांना दिपवीत नव्हता. अमावास्येच्या रात्रीं चाललेले इष्कबाज रंगेलांचे अप्रहित आचार त्याच्या

मनाला वेधूं शकत नव्हते. कृष्णानें तो मोठा रस्ता सोडला आणि मधल्या वाटेनें तो गांवाकडे वळला.

मध्यरात्र उलटून गेली होती. रात्रीला उतार पडत चालला होता. कृष्णा गांवांत येऊन पोहोंचला. अजूनही तो शक्य तितका मोठा रस्ता टाळी. शनवार पेठेंतल्या एका बोळांतून तो चालला होता. जवळच कुठल्या-तरी घरांतून एका स्त्रीच्या रडण्याचा आवाज ऐकून तो थांबला. ती स्त्री धुमसून धुमसून रडत होती आणि त्याच बरोबर संतापानें ओरडत होती. कृष्णा पुढें सरकला. घराच्या आर्दी जवळ येतांच तो थबकला. बाहेरच्या ओट्यावर त्यानें आपली बैठक ठेवली आणि तो आंतील प्रकार लक्षपूर्वक ऐकण्याचा प्रयत्न करूं लागला. विशेषतः त्या स्त्रीचा स्वर ऐकून व ओळखून तर त्याच्या काळजांत चर्रर झालें. त्यानें एकच क्षण डोळे मिटले. त्याला वाटले कीं, आंतल्या आंत होणारी आग तशीच डोळ्यांत साठ-वावी आणि ज्याच्यामुळें आपला इतका संताप झाला; तो चांडाळ समोर येतांच त्याला त्या आगीच्या झोतानें जाळून खाक करावें. त्या स्त्रीच्या हुंदक्यानें कृष्णाचें हृदय पिळवटून निघत होतें. घरांत शिरून तिला दुःखमुक्त करावें असा जोराचा विचार त्याच्या मनांत खळबळ करीत होता. पण पुन्हां त्याला काय वाटलें—त्यानें तटस्थपणाच स्वीकारला.

कोणी तरी एक इसम त्या स्त्रीला बेपर्वाईनें आणि तोऱ्यानें म्हणत होता "जा, जा, हो चालती! नवऱ्याचा पत्ता नाहीं आणि पातिव्रत्याचा टेंभा मिरवते आहेस! नवरा दाखव नाहीं तर नवरा कर!" हें उपदेशामृत ऐकून ती स्त्री तिटकाऱ्यानें म्हणाली, "भाऊ बहिणीशीं व्यभिचार करूं पहातात, तिथं इथीं कशाला नवरा बायको? मी छिनाल असलें तरी दोष कोणाचा? ही चाललें मी घर सोडून. माझ्या पोरांचा तळतळाट तुझा सत्यनाश करील." त्यावर तो इसम 'तुझ्यासारख्या छप्पन्न पाहिल्या आहेत' असें कांहींसें पुटपुटत होता. थोड्याच वेळांत दरवाजा उघडला गेला. कृष्णा स्तिमित होऊन बसला होता. त्या स्त्रीच्या 'दोष कोणाचा?' ह्या प्रश्नानें तो थंडच झाला होता. नाजूक मर्मस्थानावर एखादा फटकारा बसावा त्याप्र-माणें त्याची स्थिती झाली. त्या स्त्रीनें आपलीं दोनही मुलें त्याच्या पुढ्यांत आणून ठेवलीं. ती पुन्हां आंत जाऊन एक गांठोडें घेऊन आली. तिच्या

आतां लक्षांत आलें कीं, कुणी तरी ओट्यावर बसलें आहे. ती किंचित् चपापली. पण घर सोडून निघालेल्या स्त्रीनें कोणाकोणाला भ्यायचें ? चहूं बाजूनें घेरलेल्या श्वापदाप्रमाणें ती जगावर उलटून बेफाम होऊन निघाली. कृष्णाही तिच्या मागोमाग चालूं लागला. त्याच्या मनाचा गोंधळ उडून गेला होता. किती तरी वेळां तो भरभर चालून त्या स्त्रीच्या जवळ जाई. कांहीं तरी बोलावें पण त्याचे शब्द तोंडातच घुटमळत. एकदां तर त्यानें 'राधा' असा शब्द उच्चारला ! पण ती स्त्री आपल्याच चिंतेंत आणि दुःखात व्यग्र असल्यामुळें तिला तो शब्द ऐकूं गेला नसावा. त्या स्त्रीच्या झपझप चालीवरून ती कुठल्या तरी निश्चित दिशेनें जात असावी हें खास होतें. तिनें गांव सोडला आणि नदीवरून जाणाऱ्या दगडी पुलाजवळ ती पोहोचली. नदी दिसतांच कृष्णा चपापला. ही स्त्री आत्महत्या करणार कीं काय, असाही एक विचार त्याच्या मनांत आला. कदाचित् त्या स्त्रीनें आत्महत्या करण्याचा प्रयत्न केला असता तर तिला त्या बेतापासून परावृत्त करण्याचें कृष्णाच्या स्वाधीन नव्हतें. त्याचें मन इतकें दुबळें झालें होतें. दोन्ही मुलांना नदीच्या उतारावर बसवून पलीकडे जाण्याचा रस्ता सुरक्षित आहे किंवा नाहीं हें पहाण्याकरितां ती त्या दगडी पुलावरून जाऊं लागली निम्मा रस्ता चालून जाईपर्यंत तिच्या लक्षांत येऊन चुकलें कीं, रस्ता निसरता आहे. तरीही तिनें शेवटपर्यंत जाण्याचें ठरवलें. ती तशीच पुढें चालूं लागली. तिचा पाय जोरानें सरकला आणि ती नदीच्या पात्रांत पडली. अमावास्येच्या अंधारांत झालेला तो अपघात कृष्णाच्या लक्षांत आला नाहीं. त्या स्त्रीचीं दोन्ही मुलें मुकाट्यानें बसलीं होतीं. विशेषतः त्या दोघांत जी मुलगी होती ती फारच शांत दिसत होती. तिच्या डोळ्यांतलें उदासीन पाणी अत्यंत स्थिर होतें. त्या चिमुकल्या जीवाच्या भावी आयुष्याचा चित्रपट आज कोणाला दिसूं नये म्हणूनच ईश्वरानें तिच्या डोळ्यात त्या अद्भुत उदासीनतेचा दर्या निर्माण केला असावा. त्या प्रशांत मुग्ध बालिकेचा भाऊ तिच्या जवळ बसला होता. बालवयांत इतकी विलक्षण समज आणि उमज त्यांना कुणी शिकवली होती देव जाणें ! बराच वेळ झाला तरी आपली आई येत नाहीं, हें पाहून त्या मुलीनें आपल्या भावाला अगदीं शांतपणें विचारलें, "भाऊ, आई केव्हां येणार ?" पण तिचा तो शांत-

पणाच हृदयाला हलवणारा होता. मूल म्हणून रडून तिनें तोच प्रश्न केला असता तर साहजिकतेनें आणि अपेक्षेनें तितका चरका बसला नसता; पण त्याच्या अगदीं विरुद्ध अशा त्या शांतपणानें एक प्रकारचा भेसूर सूर उत्पन्न केला होता. कृष्णा तर तो शांतपणा पाहून चरकला. त्याच्या त्या निस्तेज डोळयांत आणि कोरड्या ठणठणीत हृदयांत ओलावा उत्पन्न होण्याची सर्व पूर्वतयारी झाली. त्याला अगदीं असें वाटलें कीं, ह्या दोन मुलांना घेऊन जावें ! पण जाणार कुठें ? आपणच आज अन्नाला जिथें मोताद तेथें ह्या मुलांचा भार आपल्याला कसा सहन होणार ! आपल्या बरोबरच त्यांना उपासमारीचे दिवस कंठावयाला आपण कां न्यावें ? पण पुन्हां त्यानें आपला बेत बदलला. त्यानें त्या दोन्ही मुलांना घेतलें आणि तो पुन्हां गांवच्या रस्त्याकडे वळला. अजून लोक पुरतेपणीं जागे झाले नव्हते. कृष्णा एका मोठ्या वाड्यासमोर थांबला. दोन्ही मुलांना त्यानें बाहेर दाराजवळ ठेवलें. एक वेळ निरखून त्यानें त्याच्याकडे पाहिलें. त्या मुलीच्या शांत चेहऱ्याकडे पाहिलें. त्या मुलीच्या शांत चेहऱ्याकडे पाहतां पाहतां त्याला आपल्या अगदीं आवडीच्या माणसाची आठवण झाली. स्त्रीजातीच्या त्या छोट्या प्रतिनिधीला त्यानें तेथें सोडलें. त्यानें एक दीर्घ निश्वास टाकला आणि मायेचा गळयापर्यंत दाटून आलेला गहिंवर त्यानें तसाच दाबून तो तेथून निघाला.

एका रात्रींत केवढे विलक्षण चमत्कार घडले ! आजपर्यंत न भेटणारीं माणसें भेटलीं. क्षणभर त्यांचा व आपला सहवास झाला आणि एकेका प्रसंगाच्या तडाक्यासरशीं त्यांची व आपली ताटातूट झाली; ह्या विचारांत कृष्णा चालूं लागला. शक्य झाल्यास आपल्या मृतवत् आयुष्यास पुन्हां निराळें वळण द्यावें असें त्याला वाटूं लागलें. जगाचा त्याला वीट आला होता. अनेक गुप्त विचारांनीं त्याच्या मनाला कंगोरे पडले होते. अशा मन:स्थितींतच कृष्णा स्टेशनच्या रस्त्याला लागला. नुकत्याच उगवणाऱ्या सूर्याचीं आरक्त किरणें प्रत्येक वस्तूवर आपला प्रकाश पाडीत होतीं. आकाशाच्या मध्य प्रान्ताकडे सूर्याचा प्रवास सुरू झाला. कांहीं काल तरी जग त्या उगवत्या सूर्याचे कौतुक करणार होतें; पण कृष्णा अजूनही कृष्णमेघांनीं दाटलेलें आयुष्य कंठीत होता. कुठूनही आशेचा किरण येण्याची

त्याला आशा नव्हती. जातगोत, घरदार, मुलेंमाणसें, स्नेहीसोबती सर्वांनीच त्याला सोडचिठ्ठी दिली होती. कृष्णाला जर कुणी त्यावेळीं वय, धंदा, धर्म, विवाहित कीं अविवाहित ह्यापैकीं कुठलाही प्रश्न विचारला असतां तर त्याला कुठल्याही प्रश्नाचें उत्तर देतां येणें शक्य नव्हतें. अशा कांहीं विलक्षण परिस्थितींत कृष्णा चालला होता. त्याला सगळें असून नसल्यासारखें झालें होतें. एकछत्री साम्राज्याप्रमाणें त्याचा कारभार अविरोध चालला होता. विरोध करायला कुठला पाशच मुळीं त्याला शिल्लक नव्हता.

स्टेशनाच्या रस्त्याला लागलेला कृष्णा त्याला नकळत आयुष्याच्या नव्या मार्गाला लागला होता. फूटपाथवर अजून कांहीं भिकारी चैनींत निजले होते. त्यांना पाहून कृष्णाला वाटलें कीं, आपण आणि हे भिकारी सारखेच ! कृष्णा स्टेशनजवळ आला. मोटमोठ्या इमारती त्या निर्धन गृहहीन कृष्णाकडे टवकारून पहात होत्या. दुकानावर लावलेल्या पाट्यांवरच्या सोनेरी अक्षरें चकाकत होतीं. उपहासानें हंसणाऱ्या माणसाच्या दातांसारखीं तीं अक्षरें दिसत होतीं. टांग्याची ये जा चालू होती. एखादा हौशी तरुण आपल्या गुलजार पत्नीला अंजीरी शालीच्या झोकनोकांत घेऊन 'मुंबई' करायला चालला होता. मुख्य दरवाजानें स्टेशनांत प्रवेश करणें कृष्णाला अशक्य होतें. तिकिटावांचून प्रवास करण्याचा कृष्णाला तो पहिलाच प्रसंग होता. पण कृष्णाचें अंतःकरण हळू हळू घट्ट बनत चाललें होतें. त्यानें तारा ओलांडून एका कामकऱ्याजवळ चौकशी केली. गाडी सुटायला अवकाश होता. एक रिकामा डबा पाहून कृष्णा बसला. सबंध रात्रीचें जागरण आणि विशेषतः मानसिक व्यथा ह्यांनीं तो अगदीं हैराण होऊन गेला होता. त्यानें मागच्या फळयांना डोकें टेकलें आणि तशाच स्थितींत तो झोंपीं गेला.

सात वर्षांच्या बंदिवासानंतर लागलेली ती झोंप, झोंपच असेल काय ? शरिरांतील सर्व अवयवांनीं, विकार शक्तींनें, सर्वांनीं एकमतानें केलेला तो सत्याग्रह असेल काय ? त्याच्या सर्व शक्ति त्याला दरडावून विचारीत होत्या कीं, आम्हांला अशा रीतीनें, अशा छळानें राबवलें, जणू कांहीं आम्हांला जीवच नाहीं. फार काय ज्या जिवाच्या सुखाकरतां तुम्ही एवढे धडपडतां

त्या जिवाचें आम्हावांचून चालेल एवढा आम्हांविषयीं जो बेदरकारपणा दाखवला गेला, त्याचें प्रत्युत्तर त्या अनास्थेचें एक प्रकारचें प्रतिक्रिया-स्वरूप सर्व इंद्रियांनीं दाखविलें. पुन्हां केव्हांही हालचाल करावयाची नाहीं, कितीही जोर-जुलूम झाला तरी आहे ही स्थिती सोडावयाची नाहीं, अशा निश्चयानें कृष्णाचीं सर्व गात्रें निष्पल झालीं होतीं. सुटलेल्या बंदि-वानाची ती झोंप अशा प्रकारची होती. सर्व दुःखांनीं डांबून टाकल्यामुळें एखाद्या मूर्च्छना आलेल्या माणसाप्रमाणें तो निश्चल दिसत होता. झोंपेच्यापूर्वी कृष्णाचें चळवळें मन सारखी धांवपळ करीत होतें. विचारांची उतरण लागून लगोऱ्याच्या खेळाप्रमाणें त्यांना धडधड पाडून देत होतें. तें मन सर्व अवयवांवर अस्मानीसुलतानी गाजवीत होतें. पण कुठ-ल्याही शक्तीला मर्यादा असतेच. त्या प्रमाणें एके काळीं अप्रतिहत साम्राज्य चालविणारें तें मन दमलें आणि त्याची ती पंगू अवस्था पहा तांच रक्ताच्या प्रत्येक थेंबानें ती आनंदाची बातमी सर्व शरीरभर पोंचवली. त्या रक्तबिंदूंनीं आपलें कार्य झपाट्यानें सुरू केलें. रक्तवाहिन्यांच्या घरीं जणूं लगीन घाईच उडाली. कृष्णाचें सारें शरीर मनस्तापानें सणसणीत तापलें. कृष्णा जेव्हां जागा झाला तेव्हां त्याचे डोळे लवकर उघडेनात. समोर बसलेलीं माणसें त्याला दिसत होतीं. गाडीचा आवाज त्याला जड वाटत होता. चाललें आहे हें सारें स्वप्न असावें असें त्याला वाटत होतें. डोकें—सारें अंग सणसणून तापलें होतें. ह्या आगींतून आपण सजीव बाहेर पडूं का! असा भयंकर विचार कृष्णाच्या मनांत आला आणि भीतीनें त्यानें डोळे मिटले. ह्या निष्प्रेम निःसत्व आयुष्यांतून कृष्णा सुटला तर बरें नाहीं का होणार?

वाचकांच्या पुढें तसाच कालाच्या पुढें तो एक प्रश्नच होता आणि त्याचें उत्तर वाचकांच्या उत्कंठेपेक्षां कालाच्या बदलत्या चक्रगतीनें मिळालें तर मिळेल! अल्प सामर्थ्यवान् मानवानें कल्पनेची दोरी कितीही ताणलीं, तरी तिनें निसटता काल कसा बांधला जाणार?



# प्रकरण १ लें

## " प्रेमी जीव "

एखाद्या रहस्यमय कादंबरीचें शेवटलें पान वाचून ती कादंबरी संपली म्हणजे जसें वाटतें तसें मिलिंदाला आज वाटत होतें. कादंबरी संपली म्हणजे पुढें दिलेल्या जाहिराती जशा निःसत्व वाटतात त्याचप्रमाणें एका विशिष्ट प्रसंगानंतरचा काळ मिलिंदाला असार वाटत होता. कादंबरींतील रहस्यमय प्रसंग, भावनामय व्यक्ति जोरानें मनाची पकड घेतात, चढत्या कथौघाबरोबर वाचकाचें मन चढत जातें, गुंतागुंतीचे प्रसंग आले म्हणजे त्यांतून पुढें काय होईल ह्याचा गोड ध्यास लागतो. एखाद्या व्यक्तिशीं आपलें मन इतकें रममाण होतें कीं कादंबरी संपली तरी किती वेळ त्या व्यक्तिची अस्पष्ट रूपमाया डोळ्यासमोर उभीच असते; कांहीं केल्या तेथून हालत नाहीं. एखादा उदात्त प्रसंग फुलाच्या दुरून येणाऱ्या सुगंधा-प्रमाणें आपल्या डोळ्यांत न कळत शिरतो आणि तेथेंच स्थीर होऊन राहतो. तसेंच मिलिंदाचें आजपर्यंतचें आयुष्य गेलें. त्याच्या भावनाप्रवण मनानें एका कुमारिकेला आपली प्रेमदेवता बनविली आणि नंतर त्याच सुरस प्रसंगांत त्याचें मन खेळूं लागलें. काळाच्या गतीनें प्रेम वाढत गेलें. त्याला वाटलें आयुष्य किती गोड आहे ! जग किती सुरेख आहे !! प्रेम किती मनोहर आहे !!!

पण कादंबरीला जसा मध्य असतो आणि तेथून मग साऱ्या गोष्टी उतरणीला लागतात. तसा मिलिंदाचा आयुष्यरथ उताराला लागला. त्याच्या प्रेमदेवतेला त्यानें प्रथम नुसता दर्शनाचाच नैवेद्य दाखवावा. पण पुढें भूक वाढली आणि त्याचा परिणाम म्हणजे त्यानें तिला आपल्या मानलेल्या वल्लभेला 'चोरून पत्र पाठवलें.प्रेमानें वेडावलेले चार तरुण ज्या धर्तीचें पत्र आपल्या प्रियेला लिहीतात तसेंच तें पत्र होतें पत्राचा मायना 'माझ्या प्रेमसागरा' असा होता. प्रेमाला सागराची उपमा देऊनत्यांत यथेच्छ डुंबा-यची मनीषा प्रकट करणाऱ्या कवीच्या मनांत काव्याच्या भरांत साग राचा खारटपणा चुकून येत नाहीं. त्या सागराच्या दोन चुळा पाणी

पोटांत गेलें तर आंतडी बाहेर काढणारी वांती होईल हें त्या प्रेमबहाद्दरांच्या ध्यानीं नसतें. सागर म्हटला म्हणजे जसें कांहीं एखादें भडक निळ्या रंगाचें न हालणारें चित्र असेंच त्यांना वाटतें. मानवी प्राण्याच्या अत्युच्च सामर्थ्यानें घडवलेल्या महानौकांना, शेपटीच्या एका वेलांटीनें पाताळ दाखवणारे जलचर ज्या महाभागानें लीलेनें आपल्या पोटांत बाळगले आहेत त्या सागराचें प्रेमाशीं साधर्म्य दाखवितांना केवढी घोडचूक होते !

मिलिंदानें धाडलेलें पत्र अशाच हास्यास्पद उपयांनीं भरलेलें होतें. त्या प्रश्नाचें उत्तरही आलें. तें उत्तर आलें ह्या एकाच गोष्टीनें त्याला अतोनात आनंद झाला. त्या आनंदाच्या भरांत किती वेळ त्यानें तें पत्र न फोडतांच त्यांत काय असेल, आपली देवता आपल्यावर प्रसन्न होऊन तिनें कोणत्या शब्दांत आपली कामनापूर्ति केली असेल इत्यादि विचारांत आपला वेळ घालवला. पण विषमय अन्न आस्वादापूर्वी जो आनंद देतें, तशाच प्रकारचा तो आनंद होता. त्या अन्नाचा पहिला घांस आणि पत्रांतला पहिला मायना, दोन्हीचा परिणाम सारखाच झाला. मिलिंदाचें डोकें फिरूं लागलें. त्यानें पत्राचा शेवट कसाबसा गांठला. पत्रांत त्याच्या मागणीला नकार होता ! आकाशानें कुऱ्हाडीचें रूप घेतलें आणि त्या प्रेमविव्हल जीवाच्या मस्तकावर घाव घातला. मिलिंदाची पुरी निराशा झाली. मिळालेला नकार वल्लभेच्या हातानें लिहिलेला असता तर कदाचित् तेवढ्या क्षुल्लक आधारावर त्यानें उरलेलें आयुष्य कंठलें असतें. निदान त्या क्षणाला तशी काव्यमय प्रतिज्ञा करून तो मोकळा झाला असता. त्यानें तें हस्ताक्षर निरंतर—अंतर न ठेवतां उराशीं बाळगून सारें आयुष्य आपल्या 'कोमल प्रेमलेच्या' चिंतनांत घालवलें असतें. खरोखर प्रेमाचें आजचे सामाजिक वर्चस्व पहातां, असा एक काळ येण्याचा संभव आहे कीं पुरुषांच्या देहाचें अवयवात्मक वर्णन करतांना हृदय आणि काळीज ह्यांच्या दरम्यान पांढऱ्या रंगाचा एक नवीन ठिपका आहे असें सांगावें लागेल. विशेष संशोधनानंतर त्या ठिपक्यावर जिकडे तिकडे काळ्या निळ्या शाईत प्रेम—प्रेम—प्रेम—असेंच लिहिलेलें आढळून येईल. लिपी हृदयाची असून ती ओळखायला 'तशाच' हृदयाचा विशारद असावा

लागेल. मिलिंदाला त्या मुलीच्या बापाकडून उत्तर आलें. ज्याच्याकडून तांदळाच्या अक्षता उधळून घेण्याचें भाग्य मिलिंद इच्छित होता, त्यानेंच वाटण्याच्या अक्षता लावून अक्षद समारंभ साजरा केला. काळवेळ ह्यांचा पोंच न राहिल्यामुळें बाशिंगबळ खडतर लागलें. त्या वेळेपासून मिलिंद जो उदास झाला त्याचें साधारण स्वरूप आरंभी दिगदर्शीत केलेंच आहे.

प्रयण–भंगाचा तो कथाभाग असा घडून आला. त्याचा पूर्वरंग मिलिंदाला खरोखरीच्या कादंबरीप्रमाणें वाटला. पण त्या कादंबरीच्या झालेल्या शोकपर्यवसायी शेवटामुळें आजपर्यंतच्या प्रेमळ कथानकाचें एकदम रूक्ष वैराग्यांत रूपांतर झालें. हें वेषांतर बाह्यात्कारीं नसलें तरी अंतरंगीं मिलिंदानें खरोखरच धारण केलें. त्याच्या अंतःकरणांत भावनांचे कोळसे धडाडून पेटले होते आणि भावी सुखाच्या कल्पनांची राख खचून पडली होती. त्या धुमीशेजारीं त्या महत्त्वाकांक्षी तरुणाचें मन मलूल होऊन पडलें होतें. त्याला कुठेंच गोड लागत नव्हतें. एवढी मोठी आणि चैनीचें आगर असणारी मुंबई पण सहारा वाळवंटाइतकीच आकर्षक वाटत होती. प्रेमभंगाचे पहिले चटके तर त्याला असह्य झाले. देव करतो ते बऱ्या करताच करतो. ह्या सूत्रांत वक्रोक्ति हाच अलंकार असावा असें त्याच्या मनानें घेतलें. आपल्या मनाला–बहकलेल्या मनाला विरंगुळा पडावा म्हणून त्यानें पुष्कळ प्रयत्न केले. प्रियेनें झिडकारलेल्या कवींची करुण रसाची सीमा करणाऱ्या काव्यांची मनःपूर्वक पारायणें त्यानें केलीं. त्या काव्यांतील भेसूर भविष्याची दाट छाया पाहून तो परत फिरे. तर कुठें प्रियेनें आपल्या प्रेमाला झिडकारल्यास 'प्राणत्यागा'ची अघोर प्रतिज्ञावाचून त्याचें मन विटे. कांहीं तरी लोकविलक्षण गोष्टीची पुरवणी जोडल्याशिवाय प्रेमगीत पुरेंच होत नाहीं असा कविसंप्रदाय असावा असें मिलिंदाला वाटलें. तो जेथें जेथें जाई तेथें तेथें त्याला आपल्या भग्न स्मृतीची स्मरणी सतत जपावी लागे. हिऱ्यामोत्यांचा बाजार पाहावा. तिथल्या हिऱ्यांचें तेज त्याच्या डोळ्याला दिपवून टाकी. त्याच्या डोळ्याला अंधारी येई आणि लगेच हृदयविदारक स्मृती त्याच्या कानाशीं येऊन गुणगुणे, " ह्याच हिऱ्यांची कुडीं करून तूं कुणाला तरी देणार होतास ना ! मिलिंद कावराबावरा होई आणि संपत्तीच्या लख-

लखाटांत त्याला अमावास्येचा काळोख भासूं लागे. एखादा फूलवाला त्याच्यापुढें येऊन सुंदर मोगऱ्याच्या कळ्यांचा गजरा पुढें करी. फुलांची मुकी मुलेंसुद्धां त्याचा उपहास करीत. हळूं हळूं विकसणाऱ्या त्या कळ्या म्हणत, " तूं एकटा असलास, खिन्न असलास, भग्नहृदय असलास तरी तुझ्यावांचून कुणाचें अडणार नाहीं. कुणाही भाग्यवंताच्या हातीं आम्ही पडूं आणि स्वतःचें सार्थक करून घेऊं." मिलिंद ह्या फटकाऱ्यानें चांगलाच शुद्धीवर येई. तो मनात उमजे, " असं आहे तर एकूण ? जगांत कांहीं कुणाचं कुणावांचून अडत नाहीं. मग मीच असा दुःखी कष्टी कां होतों ? कुणांसाठीं झुरतों ? हा एवढा भयंकर खटाटोप कोणाकरतां ? एकंदर जगाचा हृदयशून्य, सहानुभूतीशून्य असा हा आचार दाखवण्याकरतां जगाचा स्वार्थमय क्षुद्र व्याप दाखवण्याकरतांच हा सारा खटाटोप उभारला असेल काय ? "

अगदीं तुटक आणि केवळ अनुभवजन्य अशा ह्या वैराग्यपूर्ण विचारांत मिलिंदाचे कित्येक तास, कित्येक दिवस गेले. एक प्रकारच्या गूढ निष्क्रियतेनें तो अंतर्बाह्य व्यापला गेला. आवश्यक तेच व्यवसाय करण्यावांचून त्याचें मन कशांतही रमेना. वास्तविक मिलिंद क्रियाशून्य नसता, लहानपणापसून कुणाचाही आधार नसतां त्यानें जगांत आपली किंमत ठरवून घेतली होती. त्याच्या अंगीं विलक्षण स्वाभिमान बाणला गेला होता. त्यानें आजपर्यंत याचना केली नाहीं. भिक्षूक वृत्तीनें तो कुणाचा मिंधा झाला नाहीं. परमेश्वरानें आजपर्यंत त्याला जगांत निराशेचें दालन उघडून दाखवलें नाहीं. स्वतःच्या करामतीनें, उद्योगप्रियतेनें सभोंवार त्यानें आशेचे इमले उभारले. पण ते इमले आशेचे होते तसेच ते हवेंतले ठरले. प्रणयाच्या झंझावातानें त्या इमल्याचे मनोरम भाग गदगदा हलवले. प्रेमाच्या धक्क्यानें ते इमले धाडधाड कोसळले. मिलिंदाला पटलें कीं, ध्येयाच्या उत्कटतेची धार जगाच्या कठोरतेनें बोथट होते.

मिलिंदानें ज्या मुलीवर प्रेम केलें तिच्या घरादाराचा, कुलशीलाचा विचार केला नाहीं. अगदीं सरळ त्यानें आपल्या भावनेला वाटूं दिलें ती भावना आणि त्याची वल्लभा ह्यांची सांगड दिल्यावर मिलिंदाच्या हातीं कांहींच उरलें नाहीं. उद्योगाच्या जोरावर वाटेल तें काबीज करूं अशी

त्याची आतांपर्यंत अपेक्षा होती. इतकेंच नव्हे तर त्या अपेक्षेप्रमाणे कित्येक गोष्टी केवळ उद्योगाच्या जोरावर त्यानें हस्तगत केल्या होत्या. एका भिकाऱ्याची सतार ऐकून आपणही सतार शिकावी, असें त्याला वाटूं लागलें. त्यानें उद्योग केला आणि सतार विकत घेतली. फावल्यावेळीं सतारीच्या सहवासांत तो आपल्या मनाची करमणूक करूं लागला. पण प्रेमाच्या बाबतींत त्याचा प्रयत्न खुंटला. उद्योगानें लग्नाचें गोत्र जमेल असें चिन्ह दिसेना. सजीव आणि निर्जीव अशा दोन सृष्टींमधलें अंतर त्याच्या जिव्हारीं शिरून त्याला सतावूं लागले. इष्टसिद्धीला नशीब अनुकूल असावेंच लागतें हें त्याला पटलें.

रोजच्याच विमनस्क मन:स्थितींत मिलिंद आपल्या खोलींतून बाहेर पडला. त्यानें एक जवळचेंच हॉटेल ' जवळ ' केलें आणि चहाची ' ऑर्डर ' देऊन तो एका खुर्चीवर बसला. समोरच्या संगमरवरी दगडावर त्यानें आपल्या हाताचें कोपर टेकलें आणि तळहातावर हनवटी ठेवून रस्त्यांतून येणाराजाणाराकडे तो पाहूं लागला. त्याच्यापासून थोड्या अंतरावर मालक बसला होता. अंगांत एक मलमलीचा स्वच्छ अर्धल्या बाह्याचा सदरा, त्याला लावलेल्या चकाकणाऱ्या खड्याच्या गुंड्या; डोक्यावर मखमलीची काळी टोपी अशा थाटांत मालक आपल्या दुकानाची देखरेख करीत होता. दुपारची वेळ होती. दुकानांत विशेष गर्दी नव्हती. त्यामुळें सहाजीकच जिकडे तिकडे शांतता दिसत होती. मिलिंद एकटाच चहाचा कप पुढें घेऊन बसला. पांच दहा मिनीटें झालीं. इतक्यांत एक इसम दुकानांत शिरला. त्याच्याकडे पहातांच कोणाही माणसाला आश्चर्यच वाटे. त्याच्या चेहऱ्यावर मनाला मोहून टाकणारें स्मित–हास्य झळकत नव्हतें. घडून उपयोगांत आणलेल्या पाषाणावर जशी एकप्रकारची कांति दिसते तशाच प्रकारचें तेज त्याच्या मुखावर चमकत होते. टांकीच्या घावानें पाषाणाला देवकळा आणतां येते त्याचप्रमाणें अत्यंत अश्लील रूपही देतां येतें. मनाच्या मारानें माणसाचा चेहरा असाच सुरूप अथवा विद्रुप होतो. त्या इसमाचा चेहरा अविकारी होता. त्याच्या भव्य कपाळावरून त्याची बुद्धीमत्ता उघड दिसत होती. त्याची दृष्टी–पण ती दृष्टी इतकी तीक्ष्ण होती कीं त्याच्या डोळयाला डोळा देण्याची सहसा कुणाची छातीच होत नसे. फार काय पण त्याचा

करडा अम्मल आपणांवर चालवून घ्यावा असाच साधारण माणसाचा ग्रह होई. त्याच्या वर्तनांत एक प्रकारची बेफिकीरी होती. तो दुकानांत शिरला तेव्हां त्याच्या जवळ एक लहानशी हँडबॅग होती. आंत शिरतांच त्यानें एक कोपऱ्यांतलें टेबल गांटलें; नोकरानें त्याला काय पाहिजे म्हणून विचारतांच त्यानें 'कॉफी' एवढें म्हटलें. आपला मोतिया रंगाचा फेटा किंचित् मागें सारून खूप दमून आल्यामुळेंच कीं काय त्यानें एक सुस्कारा सोडला आणि हाताच्या बोटांनीं तो आपलें कपाळ चोळूं लागला. मिलिंदाचें त्या इसमाकडे आपोआपच लक्ष गेलें आणि त्याची दृष्टि तेथेंच स्थिर झाली. ह्या ठिकाणीं कांहीं तरी अजब पहाण्यासारखें आहे असें वाटून मिलिंद त्या गृहस्थाची हालचाल पहात होता. त्या गृहस्थानें आपली बॅग उघडली आणि त्यांतून चार पांच कागदांच्या घड्या बाहेर काढल्या. एकेक घडी तो उकलून पाही आणि कांहीं तरी बोटांनीं मोजून पुन्हां त्या कागदाची घडी करून ठेवी. नोकरानें कॉफी आणून ठेवली. त्याकडे त्यानें एकदां पाहिलें, नंतर त्यानें आपली ती तीक्ष्ण नजर मिलिंदावर फिरवली व पुन्हां तो आपल्या व्यवसायांत दंग झाला. कॉफी किंचित निवतांच त्यानें एका हातानें कप धरला व कागद वाचतां वाचतांच कॉफी पिण्यास सुरवात केली. दोन तीन घोंट त्यानें घेतले असतील नसतील इतक्यांत त्याला जोराचा ठसका लागला. त्याच्या हातून कप खालीं पडला आणि त्याचा चेहेरा कावराबावरा झाला. कां कुणास ठाऊक पण मिलिंद विजेचा धक्का बसावा त्याप्रमाणें उठला आणि त्या गृहस्थाजवळ गेला. पाणी मागवून त्यानें त्या गृहस्थाच्या डोक्यावर शिंपडण्यास सुरुवात केली. तो गृहस्थ शुद्धीवर आला. त्यानें स्पष्ट आवाजांत म्हटलें, "घाबरू नका. मला हा घेरीचा विकार आहे. तुम्हीं मदतीला धांवून आलांत खरोखर उपकार झाले " बस्स ! एवढेंच शब्द त्यानें उच्चारलें आणि कॉफी न पितां आपलें कागदपत्र गोळा करून पैसे देऊन तो निघून गेला.

मिलिंद त्या आभारप्रदर्शनानें थंडच झाला. त्या गृहस्थाच्या नुसत्या बाह्य देखाव्यानें मिलिंदला जितकें आश्चर्य वाटलें नाहीं तितकें आश्चर्य तें आभार ऐकून त्याला वाटलें. रीत म्हणून आभार मानायचे इतकाच भाव त्यांत होता. खरोखर हृदयाचा स्निग्धपणा अथवा उपकाराबद्दल आदरबुद्धि

ह्यांचा लवलेश त्या माणसाच्या आवाजांत नव्हता. थोड्या वेळानें मिलिंद दुकानांतून उठला. त्याच्या डोक्यांत त्या इसमाविषयीं बरेच विचार येऊन गेले. विशेषतः त्या गृहस्थाच्या वागणुकींतली शिस्त आणि नंतरच्या त्याच्या आवाजांतला रुक्षपणा ह्यांचा मिलिंदाच्या मनावर फार परिणाम झाला. नेहमींच्या त्रासदायक विचारांना ह्या प्रकारानें आळा पडला. इतका वेळ आंखडलेल्या त्याच्या मनोवृत्तींची कमान हळूं हळूं सुटत चालली, आणि एकंदरींत त्याला दुकानांतला चहा मानवल्याचीं चिन्हें दिसूं लागलीं.

नंतरचा सारा दिवस मिलिंदानें मुंबई भटकण्यांत घालवला. पायांनीं तो फिरत होता, डोळ्यांनीं तो पहात होता पण त्याचें मन स्वस्थ नव्हतें. अस्वस्थता हा रोग इतर रोगापेक्षां त्रासदायक खरा, कारण ह्या रोगाला औषध नाहीं. संध्याकाळ होऊन दिवे लागले. तरी मिलिंदाला जेवण्याची इच्छा होईना. तरी पण दमल्यामुळें तो खानावळीकडे वळला. अगदीं निष्काळजीपणानें त्यानें आपलें जेवण उरकलें आणि त्यानें आपल्या खोलीचा रस्ता धरला.

गिरगांवांत एका छोटेखानी बंगल्यालगत त्याची खोली होती. घरमालकाचा आणि त्याचा बराच लोभ होता. मिलिंदाच्या खास सोयी मालकानें त्या खोलींत करून दिल्या होत्या. घरांतलाच एक असें त्याला मानून मालकाची मंडळी त्याच्याशीं वागत. सणाच्या दिवशीं अथवा इतर कांहीं कमीजास्त असल्यास मिलिंदाला ताट वाढून येई आणि भाऊबिजेच्या दिवशीं यथाशक्ति त्याला श्रीमंत बहिणीला ओवाळणी घालावी लागे. अर्थात ह्या मानलेल्या नात्यांत रक्ताचा जिव्हाळा नसला तरी, स्वतः मानले, आपलें म्हटलें ह्या एकाच भावनेचा ओलावा होता. असें जरी होतें—ती माणसें जरी मिलिंदाला इतका मधुर जीव लावीत होती—तरी तो स्वाभिमानी तरुण आपली कुठल्याही प्रकारची तोशीद त्यांना लागूं देत नव्हता.

मिलिंद खोलींत येतांच त्यानें दिवा लावला. कपडे काढून खुंटीला ठेवले आणि स्वस्थ चित्तानें बसावें ह्या विचारानें त्यानें आरांम खुर्ची उकलली. दिव्याकडे पहात तो खुर्चीवर रेलून पडला. जवळच्या बंगल्यांत

फोनो लावला होता. ‘ खरा तो प्रेमा ना धरी लोभ मनीं ’ ही बालगंधर्वांची प्लेट त्याला ऐकूं आली. कसें बसें आवरलेलें विचार गाण्याच्या एकेका सुरानें पुन्हां उसळून आले. ‘ खऱ्या प्रेमाला कुठलेंच प्रलोभन नसतें ’ मग काय, आपण करतों हें प्रेम स्वार्थी–विषय लोलुपतेनें–सौंदर्यलालसेनें–करतों. छे ! छे ! ! त्या विचारांचा तो मार त्याला सहन होईना. वळवाच्या पावसानें एखादें फूल जसें मलूल होऊन जावें तशीच त्याची स्थिति झाली. त्यानें मान खालीं घातली आणि तो असहाय स्थितींत पडून राहिला. विजेच्या दिव्याचा झगझगणारा प्रकाश त्याच्या मुखावर पडला होता. त्याच्या अंतःकरणांत अज्ञात भविष्याचा गूढ अंधार दाटत चालला होता. तो स्वतःला विचारीत होता ‘ ह्या यातनांतून–मनांच्या संत्रस्त स्थितींतून कधीं तरी सुटका होईल काय ?’

---

# प्रकरण २ रें

## ‘लक्ष्मी जाणार’

लक्ष्मी जाणार. आपल्या गांवची लक्ष्मी सात समुद्रांच्या पलीकडे जाणार ह्या एकाच गोष्टीनें चांदगांवांत मोठी खळबळ उडवून दिली होती. लहानापासून थोरापर्यंत प्रत्येकाला आपल्यापरी वाईट वाटत होते. लहान मुलांना खेळांतली भांडणें तोडणारी प्रेमळ बहीण जाणार म्हणून वाईट वाटत होतें. तरुणांना आपल्या कर्तबगारीची स्फूर्ति देवता जाणार म्हणून हळहळ वाटत होती. तर वृद्धांना आपल्या हक्काची प्रत्येक कामीं उपयोगी पडणारी लाडकी कन्या जाणार म्हणून गहिंवर येत होता.

संध्याकाळची वेळ होती. चांदगांवच्या चावडीवर गांवांतलें शिष्टमंडळ हळूं हळूं जमूं लागलें होतें. सारा जन्म गांवच्या कुटाळक्या करण्यांत आणि नाचतमाशांच्या प्रकरणवारींत घालवलेली पोक्त मंडळी उच्च स्थानीं बसली होती. अंगावरून चार पावसाळे अधिक गेल्यामुळें शहाणपणाचें

गवत आपल्या मेंदूत अधिक उगवलें आहे अशा समजुतीनें–किंचित् ताठ्या-नेंच भोंवतालच्या चिमुकल्या जगाकडेही मंडळी पहात होती. जवळच एक चौकोन सारवून तयार केला होता. त्या ठिकाणीं वरच्या शिष्टांची नवी आवृत्ति मांड ठोकून बसली होती. त्या तीन व्यक्ति आपपसांत कांहीं तरी कुजबुजत होत्या. वरच्या मंडळींना ते काय बोलतात ह्याचा थांग पत्ता लागत नव्हता. त्यांचें आपलें चिलिमीचें आराधन आणि तंबाखूचें वर्णन चालू होतें. खालीं बसलेले तिघेही मात्र अगदीं एकावधान होऊन काय तें बोलत होते. त्यांच्या उत्सुकेतवरून आणि हावभावावरून ते ज्या विषयीं बोलत होते तो कांहीं तरी जिव्हाळ्याचा विषय असावा असें दिसत होतें. पण त्या तिघांपैकीं तिसरा मात्र अगदीं निरखून इकडेतिकडे पहात होता. किती तरी वेळ त्याला कांही दिसेना. तरी पण ज्या दिशेकडे आपले डोळे रोखले होते तेथून त्यानें कांहीं हलवले नाहींत. ते दोघे जरी त्याच्याच वयाचे होते तरी त्याला विशेष मान देत असावेत. थोडा वेळ गेला आणि–गांवाचा पाणोठा ज्या दिशेला होता तिकडून एक व्यक्ति येत असल्याचे त्या तिसऱ्या इसमाला दिसले. त्याबरोबर त्यानें त्या दोघांचें हात दाबले. त्याबरोबर एखादी कळ दाबावी त्याप्रमाणें त्यांचीं तोंडें बंद झालीं. पण ह्याहीपेक्षां आश्चर्याची गोष्ट कीं वरच्या मंडळींचें व्यसनांतलें लक्ष उडालें आणि एखादा बिनतारी संदेश यावा त्याप्रमाणें ती मंडळी-सुद्धां पाणोठ्याच्या दृष्टीनें पाहूं लागली. जिच्या आगमनाकरतां सर्वांनीं आपले डोळे वाटेवर आणून टाकले ती व्यक्ति अझून बरीच लांब होती.

खालीं बसल्यापैकीं एकजण अगदीं न राहून उद्गारला, “ अरे, ती आली वाटतं” पण हा ‘यतिभंग’ सहन न होऊन दुसरा उसळून म्हणाला, “ चांगली दिसते आहे येतांना तरी तुला आपले अझून वाटतंच आहे,–मुर्दाड लेकाचा ” ह्या अंजनानें त्या पहिल्याच्या डोळयांत खरोखरच प्रकाश पडला आणि ती व्यक्ति येत आहे हें त्याला दिसलें. तो तिसरा इसम मात्र अतिशय अधीर झाला. जिच्यावर आपलें जन्माचें सुखदुःख अवलंबून आहे अशी एखादी महत्त्वाची गोष्ट असावी, ती थोड्या वेळानें कळणार, आपण सुखी होणार किंवा कसें ह्याचा कायमचा निर्णय लागणार तेव्हां जो संशयात्मक काळ जातो आणि त्यावेळीं जशी जिवाची वर–खालीं

स्थिति होते तसें त्याला झालें. त्या येणाऱ्या व्यक्तीच्या प्रत्येक पावलागणीक त्याच्या मनाचा धीर सुटत होता. मध्येंच कुठेंतरी खडा बोंचला म्हणून ती व्यक्ति खाली वाकली तें पाहून तो तिसरा गृहस्थ अगदीं उठण्याच्या बेतांत आला. इतक्यांत मोठ्या प्रयासानें त्यानें स्वतःला दाबले आणि तो तसाच बसला. पण त्याचा जीव मात्र त्या व्यक्तीच्या पायांशीं घोटाळत होता आणि तिच्या पायाला जे श्रम होत होते त्या सर्वांचा इकडे मनानेंच तो अनुभव घेत होता. ती व्यक्ती अगदीं जवळ येतांच तर त्याचें सर्व प्राण जणूं डोळ्यांत एकवटले. ती स्त्री–होय ती व्यक्ति स्त्रीच होती!–मुकाट्यानें तेथून निघून गेली. भरलेल्या हंड्यांतून हिसळल्यामुळें पाण्याचें थेंब उसळून खालीं पडत होते. ती स्त्री मंद गतीनें जात होती. त्या सर्वांच्या दृष्टीसमोरून ती निघून गेली. पण तिच्या त्या जाण्यानें त्याचें मन तळमळूं लागलें. त्याला अगदीं रहावेना. त्यानें बरोबरच्या दोघांना खूण केली आणि ते तिघे त्या स्त्रीच्या विरुद्ध दिशेने चालूं लागले.

अंधार चांगलाच पडला होता, तरी वाट पायाखालची असल्यामुळें त्यांना चालतांना मात्र त्रास झाला नाहीं. जवळ जवळ दोन फर्लांग चालून गेल्यावर ते तिघे एका शेतापाशीं आले. कांटी बाजूला सारून तिघेही आत शिरले. एका कुडाच्या झोपडींतून दिव्याचा मंद प्रकाश मधून मधून येत होता. तिघे जाऊन त्या झोपडींत बसले. त्या तिसऱ्याची विमनस्क स्थिति अगदीं उघड दिसून येत होती. तो मनांतल्या मनांत कांहीं तरी ठरवीत होता. शेवटीं त्याचा निश्चय झाला आणि कांहीं स्वतःला तर कांहीं त्या दोघांना उद्देशून तो म्हणाला, " बस्–मी तिच्याबरोबर जाणार " तें ऐकून भिव्या म्हणाला, "मल्हारी–असं काय बरं करतां; ती कुठं जाणार-काय जाणार कांहीं माहीत नाहीं. अन् तुम्ही आपलें म्हणतां मी जाणार तिच्या बरोबर. मोठें नवल आहे!" तसा त्याचा जोडीदार रामा सांथ देऊन म्हणतो, "खरंच –ती अन् तिचा नवरा–" पण त्याचे शब्द अर्धे होतात तोंच मल्हारी उसळून म्हणाला, " तिचा नवरा–तो गद्धा तिच्याबरोबर जाणार ! तें कांहीं नाहीं. हें लग्नच मुळीं चुकीचें आहे!"

त्यावर भिवा डोळे मिचकावून म्हणतो, "अरे, असेल हिंमत तर काढ तिला घरांतून" तें शब्द ऐकतांच मल्हारीची चर्या फिरली. त्याच्या भुंवया

रागानें संकुचित झाल्या आणि तो खसकन् ओरडून म्हणाला, "भिव्या–भिव्या" एवढेंच म्हणून त्यानें उगारलेला हात मागें घेतला. त्या प्रकारानें ते दोघेही गप्प बसले. मल्हारी आपल्याच विचारांत गुंग होऊन गेला. थोड्याच वेळांत त्या तिघांची भाकर आली. त्यांनीं जेवणें उरकलीं. रामा आणि भिवा दुसऱ्या शेतांची राखण करायला निघून गेले. मल्हारी तेथें राहिला. मध्य रात्रींच्या सुमारास त्यानें आपला गांव सोडला.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं गांवांत जिकडे तिकडे शोध सुरू झाला. पाटलाचा मुलगा एकाएकीं नाहींसा झाला. अघल्या दिवसापर्यंत कामधाम करणारा मल्हारी एकदम कसा बिथरला? कांहीं तरी चेटुककरणी झाली खास. पाटीलबुवा दुःखी कष्टी होऊन ओसरीवर बसले होते. बरोबरीचा मुलगा नाहींसा झाल्यामुळें म्हाताऱ्याची कंबरच खचली. त्याला सगळा मुलाचा ध्यास लागला. आपला मुलगा केव्हां परत येईल हा एकच विचार आळीपाळीनें त्याच्या मनांत येई. बाहेर उन्हें पडून शेतकरी लोक आपापल्या उद्योगाला केव्हांच लागले होते. पाटीलबुवा शून्य नजरेनें समोर पहात होते. त्यांना आपल्या मल्हारीच्या मूर्तीवांचून सारें जग सुनें वाटत होतें. त्या त्यांच्या दुःखांत भर घालायलाच लक्ष्मी तेथें आली. तिनें लवून नमस्कार केला. ती उभी राहीली आणि सद्गदीत स्वरांत म्हणाली, "मामंजी येतें बरं मी" त्या बरोबर पाटीलबुवाच्या पोटांत खळबळून आलें. त्यांच्या तोंडांतून शब्द उमटेना त्यांनीं सद्गद स्वरानें आशिर्वाद दिला. "अष्टपुत्रा सौभाग्यवती हो! लक्ष्मी, चाललीस तूं! मल्हारी गेला–तूं जातेस; सारा गांव आतां मला म्हाताऱ्याला खायला उठेल. लक्ष्मी,–माझा मल्हारी तुला कुठें भेटला तर–सांग त्याला कीं म्हातारा तुझ्या वाटेकडे डोळे लावून बसला आहे! ये, मुली! देव तुझें कल्याण करील!"

लक्ष्मी त्या प्रेमळ आणि हळहळलेल्या म्हाताऱ्याचा निरोप घेऊन निघाली.पण सारा गांव तिच्या करतां हळहळत होता. लक्ष्मीचे गुणच असे होते कीं साऱ्या गांवाला तिची आठवण रहावी. तिच्या वियोगानें दुःख व्हावें. गांवांतल्या दीनदुबळ्यांना ती हौसेनें मदत करी, वृद्धांना कळकळीनें वागवी. त्यामुळें त्या म्हाताऱ्या लोकांचा तिच्यावर फार जीव असे. पण त्याहीपेक्षां लक्ष्मीला त्या अनुभवी वृद्धांनीं ज्या गोष्टी व प्रसंग सांगितले त्यामुळें तर

लक्ष्मीचा फारच फायदा झाला. लक्ष्मी आपल्या गुणांनीं त्या गांवांत एक शक्तीच होऊन बसली होती. तिच्या किंचित् नाखुषीला रिझवण्याकरतां गांवांतल्या कुणाही इसमाला वाटेल ते कष्ट पडले तरी त्याची दखल वाटत नसे. गांवांत कुणी पाहुणा आला तर लक्ष्मीचा त्याच्याजवळ आदरपूर्वक उल्लेख झाल्याशिवाय रहात नसे.

लक्ष्मीचे आईबाप दोघेही वारकरीच होते. त्यांच्या मुखांतून स्रवणारी भक्तिगंगा लक्ष्मीच्या रूपानें त्यांच्याजवळ रहात होती. लक्ष्मी घरकामांत जशी दक्ष होती, वृद्धांना संतोष देण्याकरतां राबत होती, त्याचप्रमाणें देवावरची तिची श्रद्धा विलक्षण होती. तिचा गोड गळा होता आणि त्यांतून निघणाऱ्या भक्तिमय भजनांनीं तिचीं मातापितरें इहलोक विसरून जात. तिच्या एकेका सुराबरोबर गोपाळाचे गोकुळ आणि विठ्ठलाचें वैकुंठ त्यांच्यासमोर उभे राही. अशा त्या भाग्यशाली कुटुंबांत दुःखाचा प्रवेश त्यांनींच शोधलेल्या सदोबाच्या रूपानें झाला.

लक्ष्मीच्या आयुष्यांतला पतिरूपी समास अत्यंत त्रासदायक झाला. सदोबाच्या स्वाभाविक गुणांपेक्षां आपल्या अदृष्टाला पाहूनच लक्ष्मीच्या आई-बापांनीं तिला सदोबाला दिली. तिच्या म्हाताऱ्या आईबापांना स्वतःला जसा पैशाचा लोभ नव्हता तसाच जावयाजवळ पैसा असावा हा हव्यासही त्यांनीं धरला नाहीं. तरी मुलीच्या सुखाशेनें धुंद होऊन तिला खाण्यापिण्याची ददात पडूं नये म्हणून चांगलें घर पाहून दिलें. पण सदोबा असे छंदीफंदी निघाले कीं त्यांनीं लग्न झाल्यापासून लवकरच असेल नसेल त्याचा उच्छेद सुरू केला. आपल्या निशापाण्यांत पैसा खलास होत होता तरी लक्ष्मीचा पायगूण वाईट असा स्वतःचा ग्रह सदोबानें करून घेतला. स्वतःच्या वाढत्या दारिद्र्याबरोबर त्याचा लक्ष्मीविषयींचा द्वेषही वाढूं लागला.

बिचारी लक्ष्मी ! ती मुकाट्यानें सारं सहन करीत होती. आपल्या आईबापांना ती भेटायला येई तेव्हां प्रसन्न मुद्रेनें येई. तिच्या मुखावरचें तें निष्पाप गोड स्मित पाहून आईबापांना पोर सुखांत आहे असें वाटे. अशा स्थितींत सदोबानें एक नवीनच सौदा केला. खूप पैसा मिळवायचा, घरावर अक्षरशः सोन्याचीं कौलें चढवावयाचीं असा चंग त्यानें बांधला—कुणीतरी त्याच्याकडून बांधवला. सदोबानें आपल्या सासऱ्याला

मोठ्या दमांत सांगितलें कीं आपण आतां सातासमुद्रांच्या पलीकडे जाणार. तिथें आपण खूप मोठा व्यापार करणार आणि फावड्यानें पैसे ओढून आणणार. तो काय सांगत होता त्याचा त्याला स्वतःला तरी अर्थ कळत होता किंवा नाहीं ह्याची शंकाच आहे. लक्ष्मीला जेव्हां त्या गोष्टी कळल्या तेव्हां तिला फार वाईट वाटलें. लक्ष्मी जाणार हें कळतांच गांवांत एकच चर्चा सुरू झाली. कुणी म्हणत, " सदोबा गंजड–दिलें कुणाला कांहीं लिहून. कशाचा कपाळाचा व्यापार करतो ! " तर दुसरे लक्ष्मी जाणार, आपल्या गांवची मूर्तिमंत लक्ष्मी जाणार म्हणूनच कष्टी झाले होते. गांवांतली तरुण मंडळी तर अतिशय उद्विग्न झाली. त्या तरुणांपैकी कुणी लक्ष्मीच्या गुणावर तर कुणी तिच्या रूपावर अनुरक्त होते. त्या प्रत्येकाला वाटत होते कीं लक्ष्मी आपली बायको व्हावी. त्यांनीं आपापसांत थट्टा करावी. पण त्या दुर्दैवी तरुणांपैकीं एकाच्याही गळ्यांत लक्ष्मीची माळ पडली नाहीं. सर्वांपेक्षां मल्हारीला फार वाईट वाटलें. त्याचें चित्त संसारांतून उडालें; त्यानें सगळा लक्ष्मीचा ध्यास घेतला.

लक्ष्मी गांव सोडून जाणार तो दिवस एकदांचा उजाडला. तिच्या आईबापांचा विरहवेग जोरानें सूर्याच्या रथाबरोबर चढूं लागला. लक्ष्मीच्या आईनें उठल्या बरोबर आपल्या मुलीला प्रेमानें न्हाऊं घातलें. खरोखर हिंदू लोक ह्या न्हाण्याला जें महत्त्व देतात तितकें इतरत्र कोणीही देत नसतील. काळी सांवळी स्त्री सुद्धां केवळ न्हायल्यामुळें यक्षिणीची कांडी फिरल्याप्रमाणें मोहक दिसूं लागते. मुलीच्या डोक्यावर ऊन पाण्याची धार ओततांना माता ममतेनें स्नेहजलाचें सिंचन करीत असावी असें वाटतें. केसांची गुंतागुंत सारखी करतांना तिला मुलीचा संसार केसासारखा सरळ व्हावा असेंच वाटत असेल. एक आणि दोन अशा हजार गोड कल्पनांनीं मातेचें हृदय भरून जात असेल. त्यांत लक्ष्मीच्या आईला तर विशेषच कौतुक ! आधींच स्त्रियांचें अंतःकरण मुलीकडे अधीक ओढ घेतें. त्यांत एकुलती एक मुलगी. शेजारच्या घरांत जरी मुलीचें सासर असलें तरी नुसतें सासर तें. येवढ्याच जाणीवेनें मातेचें हृदय हळुवार बनतें. पण त्याहीपेक्षां आश्चर्याची गोष्ट ही कीं आपला पोटचा गोळा दुसऱ्याला देतांना त्याच आधीं कठोर बनतात. मुलीला सासरीं पाठवतांना आईच्या मनाचा

जो विलक्षण गोंधळ होतो तो कांहीं निराळाच. महाकाव्य लिहायला घेणाऱ्या नवख्या कवीला वाटतें कीं ही कल्पना आधीं लिहूं कीं तें रुपक प्रथम घालूं. ओळ प्रासयुक्त लिहावी कीं विनायमकाचें गरीबी लेणें साजून दिसेल ? तसेंच मुलीच्या आईला वाटतें कीं मुलीचें फराळाचें आधीं करावें कीं तिचीं लुगडेंचोळीं बांधावीं. तिला न्हाऊं घालावें कीं नुसतेंच गळयांत गळा घालून तिच्याशीं बोलत बसावें. ह्या साऱ्या गोंधळांत मनाचे व्यापार अंतःप्रवृत्तीच्या जोरावर कसे बिनचूक चालतात ! लक्ष्मीच्या आईनें मुलीबरोबर खाण्यापिण्याचें पदार्थ दिले; सणासुदीला नेसायला नवें लुगडें चोळी घेऊन दिली. आणि नंतर तिनें आपली विठोबारखमाबाईची मूर्त लक्ष्मीला दिली. ती मूर्ती देतांना तिचा कंठ गहिंवरला. सकाळपासून तो गहिंवरलाच होता. मायेची लाट कंठापर्यंत सारखी उसळया मारीत होती. तिचे कण डोळयावाटें बाहेर उडत होते. लक्ष्मीला मूर्त देऊन तिची आई म्हणाली, " बाळ—जेवणाच्या आधीं नियमानं देवाला पाणी घालीत जा बरं ! विठाईमाउली तुला कुठेंही अंतर देणार नाहीं !" लक्ष्मीनें नुसती मान हलवली. बोलण्यासारखी तिच्या मनाची वाट मोकळी नव्हतीच. त्या वाटेवर विरहाचे कांटेकुटे होते तर मातृप्रेमाचे गुलाब तेथेंच फुलले होते. संकट शांतपणें सहन करायचें ह्या निश्चयाची रखवाली पण त्याच वाटेवर होती. अशी ती गुणाची लक्ष्मी घरांतून तर निघाली. लक्ष्मीच्या आईनें मुलीची ओटी भरली, खण नारळ तिच्या हातीं दिला. कपाळीं कुंकवाचा मळवट भरला. लक्ष्मी उठली आणि तिनें आपल्या आईला नमस्कार केला. नेत्रांतून गंगायमुना चालल्या होत्या. आईनें तिला मिठी मारली. ताटातूट—माय लेकरांची ताटातूट—होतांना निर्गुण परमेश्वराला सुद्धां पाझर फुटेल मग इतरांची काय कथा ?

लक्ष्मीच्या आईनें तिला कुंकू लावलें. तिचें सौभाग्य लेणें चढविलें. अखंड सौभाग्य हा मानवी कल्पनेनें सुरूं केलेला सांप्रदाय आहे. अज्ञेयाच्या अथांग सागरांतल्या लहरीचा अर्थ लावावयाला तयार झालेल्या शहाण्या माणसाची ती वृथा कल्पना आहे. असें जरी आहे तरी त्या स्वसुखजन्म कल्पनेला आधार देण्यांतच सामान्य जन स्वतःला धन्य समजतो.

लक्ष्मी घरांतून निघाली. तिचें अंतःकरण ह्या वेळीं किती तरी गोष्टींनीं

भरलें होतें. एका श्रेष्ठ कवीनें मुग्धेचें जें वर्णन केलें आहे तें लक्ष्मीच्या बाबतींत अत्यंत सार्थ होतें. तो कवी म्हणतो, "मुग्धे, तुझें सौंदर्य एखाद्या अपक्क पण रसरसणाऱ्या फलाप्रमाणें आहे." लक्ष्मीची तशीच स्थिती होती. तिच्या जीवन मार्गावर कित्येक गोष्टी तिची वाट पहात तिष्ठत होत्या. कोणी सुखाचे सोबती तर कुणी दुःखाचे दावेदार तिच्या येण्याकरतां उत्सुक झालें होतें. कुठें अहेतुक प्रेमाची आणि आदराची रमणीयता सहल करीत होती, तर कुठें कठोर मनांची भगभग चालली होती. लक्ष्मीचा तो प्रवास अरबी भाषेतील गोष्टींतल्या एखाद्या राजकन्येप्रमाणें होता. तिचें स्वरूप कमनीय होतें. तिचें स्वभाववैभव राजाला लाजवणारे होते. संकटांना सतावून सोडणारा शांतपणा तिनें आईच्या दुधाबरोबरच प्राशन केला होता. शीलाचा खंबीरपणा तिच्या नाजूक कातडीखालीं लपवला होता तरी त्यानें दुष्टांच्या हृदयाची तारांबळ उडवली असती.

लक्ष्मीला पोंचवून वेशीपासून लोक परतले. पण त्यांचीं मनें आणि शुभ आशीर्वाद लक्ष्मीची पाठराखण करीत होते. मनासारखा प्रवासी नाहीं. अज्ञात भूमीच काय पण अनंत आकाश सुद्धां त्याच्या प्रवासाला अपुरें पडतें. लक्ष्मी वाट चालत होती. सदोबा आतां आपल्याला कुठलें तरी राजपद मिळणार अशा तोऱ्यांत, मिशीची मिजास राखीत, बडबडत करीत चालले होते. त्या जोडीकडे पहातांच परमेश्वर विरोधाचा भोक्ता आहे हें पटतें. सात्विक लक्ष्मीचा तत्त्वाचा जोडीदार कोण तर हमाल व्हायला चाललेला सदोबा !

दैवाला कोणता खेळ आवडेल त्याचा नेमच नाहीं !

---

# प्रकरण ३ रें

## ' मार्गस्थ '

' गुलाम ' ही आगबोट समुद्राच्या स्थीर पाण्यावर मोठ्या ऐटीनें आपला मार्ग आक्रमीत होती. बंदर सोडून त्या बोटीस आज बरोबर एक

आठवडा झाला होता. आतांपर्यंतचा प्रवास जसा सुखाचा झाला तशाच स्थितींत पुढील प्रवास होणार अशा एक प्रकारच्या आत्मविश्वासानें-तोऱ्यानें ती बोट चालली होती. नव्यानें संसार सुरू करून त्याचा बेत ठाकठीक जमला म्हणजे एखादी हौशी तरुणी ज्याप्रमाणें किंचित् अभिमानानें, कांहींशी पुढील बेतांच्या मनोरमतेनें गढून जाऊं लागते; तशी ती बोट चालली होती. त्या बोटीचा बाह्य देखावा—त्या तरुणीची वरवर दिसणारी गडबड दोन्ही ठीक दिसतात; पण बाहेरच्या देखाव्याला फसूं नये म्हणतात. तरुणींचें बाह्य स्वरूप कितीही प्रशांत दिसलें तरी तिच्या अंतरंगाचा ठाव कोणालाच नसतो. त्या 'तरुणीचा पति'—तिकडच्या खुद्दांची स्वारी सुद्धां—वरच्याच रुपानें भुलते आणि फसते. तिच्या हास्यानें रंगते, तिच्या मधूर बोलांनीं गुंगते. पण आपल्या मातापित्यांचा, बंधुभगिनींचा त्याग करून केवळ पतीला रमविण्याकरतां, त्याचा इटकुलामिकुटला संसार थाटण्याकरतां ती झटत असते. अशा वेळीं जन्मदात्या मातेच्या आठवणीनें कदाचित् तिच्या डोळ्यांच्या कडा ओलावत असतील, अंतःकरणाच्या ऊर्मी तेथल्या तेथेंच जिरत असतील, ह्याची त्या रंगेल पतीला, स्वतः म्हणजे संसार अशा स्वार्थरम्य कल्पनेंत विहार करणाऱ्या त्या नवऱ्याला चुकून सुद्धां जाणीव होत नाहीं.

अशा किती तरी गोष्टी असतील कीं त्यांना सूर्यप्रकाश तर नाहींच पण मानवी मनाचा सुद्धां प्रकाश मिळूं नये. 'गुलाम' बोटीचा तळमजला अशाच प्रकारचा होता. तेथील जागेच्या अणूरेणूंची व्याप्ति संपेपर्यंत मानवी जीवांचे अणूरेणू तेथें खेचून भरले होते. स्त्रीपुरुष हा भेद जसा परमेश्वराजवळ नाहीं, जसा आईबापाजवळ नाहीं, तसाच तितक्याच प्रेमळपणाचा निःपक्षपात त्या ठिकाणीं वावरत होता.

त्या आगबोटीच्या अंतरंगाची खरी कल्पना येण्यास प्रत्यक्ष तिथें जाऊन त्या लोकांत मिसळावयलाच हवें. त्याशिवाय वर्णन करणें म्हणजे स्फूर्तीच्या भरांत स्वर्ग आणि घरा ह्यांचें साम्य दाखविण्यासारखेंच अव्यवहारतेचें होणार आहे. त्या आगबोटीच्या 'डेक'वर एक गृहस्थ इकडून तिकडे फेऱ्या घालीत होता. सागरानें जितका शांतपणा धारण केला होता, तितकाच शांतपणा त्या गृहस्थाच्या चेहेऱ्यावरही होता. तो गृहस्थ मधून मधून

सभोंवार पसरलेल्या अथांग जलाशयाकडे पाही, तर केव्हां खालीं अगदीं तळमजल्याला असलेल्या मानवी वसाहतीकडे पाही. सागराच्या पृष्ठभागावर बारीकशी छटा येऊन जाई. त्या गृहस्थाच्या चेहेऱ्यावरची सुरकुती किंचित् मोडता घेई. दोघांची गंभीरता ह्या चळवळीनें क्षणभर मोडल्याचा भास होई. पण ती चळवळ संपतांच दोघांच्या मुखावर गांभीर्य पूर्ववत् विलसूं लागे. सागराच्या उदरांत चाललेल्या जीवनकलहाची साम्यभावनांची तुलना तो कशाशीं तरी करी आणि मनांतच उपहासानें हंसे. त्याच्या त्या तल्लीन स्थितीचा भंग करायला कोणीही तेथें समर्थ नव्हता. कारण नोकरचाकर त्याच्या बाजूनें वागतांना आपला प्राणच जणूं आपल्या पायाखालीं अंथरला आहे असें समजून जपून वागत. तळमजल्याला बसलेल्या माणसांचे कांहीं ध्वनी वर येत पण त्यांच्याकडे लक्ष देण्याइतकी किंवा त्यांत स्वारस्य मानण्याची त्या गृहस्थाची तयारी नव्हती. तो आपल्याच विचाराशीं समरस होऊन खेळत होता आणि ते विचारही त्याला खेळवीत होते. दोघांना परस्परांची सोबत मोठी रम्य वाटत होती ह्यांत शंका नाहीं. त्याचे विचार त्याला नेहमींप्रमाणें सांगत होते आणि तोही मोठा खूष होऊन ऐकत होता. ते विचार म्हणत होते, " माणसांची जात निराळी मानतात एवढेंच; बाकी पशु आणि माणसें सारखींच. शिंगाचा आणि पायांचा म्हणजे कांहीं फरक नव्हे. माणसांतल्या माणसांत तरी कुठें साम्य असतें ! तसेंच हें आहे " त्याला तें सगळें पटत होतें. ते त्याचे आवडते विचार होते. लहान लहान माशांचा जसा बुजबुजाट असतो तितकाच तिरस्कारणीय, गलिच्छ माणसांचा बुजबुजाट माजून राहिला आहे असें त्या गृहस्थाला वाटे. आणि खालीं तळमजल्यावर जो प्रकार चालला होता त्याचा विचार केला तर त्या गृहस्थाच्या वाटण्यांत तथ्य थोडें फार असावें असें वाटतें. तो उभा होता तेथून त्याला खालचा सर्व प्रकार दिसत होता. तळमजल्याला अगदीं मध्यभागीं एक मराठा आपली चिलीम घेऊन बसला होता. जवळच त्याची तरुण स्त्री बसली होती. तो तरुण मराठा चिलमीचे दम भरीत होता आणि हंसत खिदळत त्या स्त्रीला कांहीं तरी बोलत होता. त्याच्या भोवतीं गराडा घालून बसलेले लोक हंसत होते, तो तमाशा पहात होते. त्या पठ्याला मध्येंच काय लहर

ाली, त्यानें त्या स्त्रीचे दोन्ही कान धरून तिला गदगदां हलविलें आणि ांडानें ' विठाल–विठाल ' म्हणण्यास सुरवात केली. नंतर तिच्या पाठीवर ातानें ताल धरून विठ्ठल नामाचा गजर सुरू केला. तें संकीर्तन ऐकून ंवतालच्या आचरटांनीं टाळया वाजवल्या. जो तो तोंडानें 'बेस–सदोबा ई छान ' असे उत्तेजनपर शब्द बोलूं लागला. बाजूला एक मुसलमान सला होता. तो जवळ सरकूं लागला. त्या स्त्रीला तो सगळा प्रकार असह्य ंत होता, पण ती असहाय्य होती. ती मुकाट्यानें जें जें होईल तें तें हात आणि रुदन करीत होती. त्याचवेळीं दुसऱ्या कोपऱ्यांत एक तरुण सला होता. त्याला तो प्रकार पाहून अतिशय वाईट वाटत तें. त्याच्या अंतःकरणाला ती गोष्ट लागून, झाला प्रकार ाच्या मनाविरुद्ध, तो केवळ असमर्थ म्हणूनच त्यानें ऐकूं दिला ासें त्याच्या मुद्रेवरून दिसत होतें. त्यानें आपला चेहेरा फिरवला आणि ळमजल्याच्या अंधारांत त्याचे डोळे इंगळासारखे लाल होऊन चमकूं ागले. डेकवर उभ्या असलेल्या गृहस्थानें तो सर्व प्रकार पाहिला आणि ागर्दी संथपणें तो तळमजल्याच्या पायऱ्या उतरूं लागला. त्याच्या आगम-ाबरोबर जिकडेतिकडे शांतता पसरली. चिलमीच्या दमांत असलेला दोबासुद्धां ठिकाणावर आला. प्रत्येकाला धाक पडला कीं, आतां काय ाणार. 'किसन आला. किसन आला' असे मूक ध्वनी प्रत्येकाच्या हृद-ाला भीतीनें धडका देऊं लागले. किसन–तो राजशाही गृहस्थ–एक क्षण ांबला आणि त्यानें हांक मारली 'इस्माईल' ! त्या हाकेसरशी एक व्यक्ति ा गर्दीतून पुढें आली आणि खालीं वाकून कुर्निसात् करून हात जोडून ऽभी राहिली. त्या जोडलेल्या हातांत आणि लवलेल्या मानेंत जें सामर्थ्य ोतें त्याची पूर्ण जाणीव आजूबाजूच्या लोकांना होती. इतकेंच नव्हे तर ेसनच्या एका शब्दासरशी ते जोडलेले हात आपल्याला हात जोडावयाला ावतील ह्याचीही भयप्रद जाणीव त्या लोकांना होती.

किसननें इस्माईल म्हणून हांक मारली; सभोंवारच्या 'गुलाम' सृष्टीवर ंजर टाकली, अगदीं कुत्सितपणें तो स्वतःशींच हंसला आणि तोंड फिर-्न तो आपल्या वाटेनें तोंड फिरवून परत फिरला. त्याबरोबर इस्माईल ःखाद्या आज्ञाधारक कुत्र्याप्रमाणें त्याच्या मागोमाग चालूं लागला.

इकडे त्या तळमजल्यावरच्या लोकांची मोठी चमत्कारीक स्थिति झाली. एखादी भयप्रद गोष्ट ऐकून झाल्यावर सुद्धां ज्याप्रमाणें कितीतरी वेळ ती बातमी ऐकणारे रहातात तसें जरी किसन व इस्माईल दोघे–त्या लोकांच्या भीतीचे 'तैमूर नादोर' तेथून निघून गेले होते; तरी ते लोक स्तब्धच होते. थोडा वेळ गेल्यावर त्यांच्यांत पुन्हां चलनवलन सुरू झालें, आणि खोट्या नाण्याप्रमाणें त्यांचा आवाज निघूं लागला. सदोबा आतां पुढें सरसावले. त्याच्या प्रतिष्ठितपणाचा फायदा इतर लोक चांगलाच घेत असत, आणि एखाद्या गाढवाप्रमाणें तोही पण खूप चढून जाई. विशेषतः स्वतःची बायको लोकांच्या दृष्टीनें जितकी हास्यास्पद होईल तितकें त्याच्या शौर्याला स्फुरण येई. त्याच्या एकंदर वर्तनाचें सार–ध्येय पाहिलें तर एकच होतें. लक्ष्मीचा शक्य त्या तऱ्हेनें छळ करावयाचा, इतकेंच नव्हे तर तिची विटंबना करायची हा एकच पुरुषार्थ सदोबा 'धर्मेच अर्थेच कामेच' आचरीत होते. आटोक्याबाहेर गेलेल्या एखाद्या यंत्राप्रमाणें सदोबा भडकले होते. त्यांच्या गतीला मर्यादा नव्हती, स्नेहाला रस्ता नव्हता. अशा नरपुंगवाच्या हातीं लक्ष्मीसारखी गाय सांपडली होती. ती बिचारी सारा छळ साऱ्या विटंबना सहन करीत होती. उलट कधीं तोंडांतून शब्दही ती काढीत नव्हती. जणूं कांहीं शारीरिक छळ तिच्या मनाला जागें करूं शकत नव्हता. तिच्या थोर मनानें कुठली तरी एक गोष्ट पक्की धरून ठेवली होती. जोपर्यंत ती गोष्ट विटंबनेला पात्र झाली नव्हती तोपर्यंत सदोबाच्या छळाचा तिच्यावर परिणाम होत नव्हता. मात्र अगदीं मनांतल्या मनांत तिला अशी अंधुक जाणीव होती कीं, केव्हां तरी त्याहि गोष्टीचा निकाल करायला आपला नवरा चुकणार नाहीं. त्या प्रसंगाकरतां ती सदोदीत सावध असे. झोपीं गेलेल्या मातेचें मन जसें जागृत राहून आपल्या पाडसाभोंवती अखंड पहारा करीत असतें; तशीच लक्ष्मीच्या मनाची स्थिति होती. तें मन अखंड जागृत होतें. त्या मनांत अगदीं नकळत एक दिव्य शक्ति जन्माला आली होती. त्या दिव्य शक्तीचें बाळपण जरी लक्ष्मीला जड गेलें, तिचें पोषण करतांना जरी लक्ष्मीला अनेक खस्ता खाव्या लागल्या तरी लक्ष्मीनें त्याची दरकार बाळगली नाहीं. ती शक्ति जसजशी वाढत चालली तसतसें एखाद्या गर्भवतीप्रमाणें लक्ष्मीच्या अंगावर तेज चढत चाललें आणि

तिच्या डोळयांत तर जणूं त्या तेजाचा सतत तेवणारा सांठाच तयार झाला. लक्ष्मी सहसा कुणीकडे पहात नसे; पण जेव्हां पाही तेव्हां ज्या माणसाकडे पाही तो माणूस त्या नजरेनें हतबुद्ध होई. त्या नजरेनें त्याला चटकन् कळे कीं 'हें प्रकरण साधें नव्हे.' ह्या स्त्रीची टवाळी काय पण उपमर्दाचा एखादा आविर्भाव आपल्याला पार रसातळाला पोंचवण्यास कारण होईल अशी त्याची खात्री होई.

नव्या परिस्थितींत लक्ष्मी पडल्यापासून हळूंहळूं एकेक धडा शिकत होती. परक्यासमोर नवऱ्याविषयीं ती केव्हांही अनादर दाखवीत नसे. आपल्याभोंवतीं कोणकोण माणसें फिरतात, वावरतात ह्याचा ती उपजत काळजीनें विचार करी. तिला आधुनिक शिक्षणाचा गंधही नव्हता तरी पण तिच्या मनाचे व्यापार कसे चालतात ह्याचा जर एखाद्यानें ग्रंथ लिहिला तर आधुनिक शिक्षणानें सुधारलेल्या ( ! ) कित्येक मुलींना तो एक अभ्यासाचा विषय होऊन बसेल. अशा स्थितींत लक्ष्मीचें लक्ष तीन व्यक्तींनीं वेधलें होतें.

त्या तीन व्यक्तींपैकीं पहिली व्यक्ति म्हणजे मिलिंद. त्याचे डोळे सदोदित लक्ष्मीभोंवतीं पहारा करतांना दिसत. त्या नजरबंद पहाऱ्याची लक्ष्मीला पूर्ण जाणीव होती. ती कुणाशीं बोलत नसे, तसेंच मिलिंदाबरोबर तिचें भाषण होत नसे. नाहीं म्हणायला अगदीं पहिल्या दिवशीं बोटीवर चढतांना लक्ष्मीबरोबर तिच्या शक्तिबाहेर असलेलें सामान पाहून त्यानें होऊन त्यांतला मोठा बोजा घेतला. लक्ष्मीला अर्थातच संकोच वाटला. ती त्या अनाहून सहाय्यानें गोंधळली आणि नुसतें 'भाऊ' एवढेंच म्हणाली. त्या एकाच शब्दांत आभार-प्रदर्शन आणि हृदयाविष्करण दोन्ही दिग्दर्शित झालीं. मिलिंदाच्या कानाला तो शब्द जितका गोड लागला तितकाच त्याच्या हृदयाला पटला. त्या एका शब्दांत दोघांनीं न सांगतां न बोलतां परस्परांचें नातें ठरवून टाकलें. मिलिंद तरी निदान त्या शब्दाची इज्जत सांभाळण्यांत विशेषच दक्ष राही.

दुसरी व्यक्ति म्हणजे इस्माईल ! त्याच्या वागण्यांतला सरळपणा लक्ष्मीला विशेष पटला. तो खरोखरीच्या अंतःकरणानें सरळ होता किंवा नाहीं हें अल्प काळांत तिला कळणें कठीण होतें. चांगलें आणि वाईट ही

निवड न करतां तो आपलें काम सरळ करी. पोराची मान कापायला सांगा अथवा एखाद्याचा जीव वाचवावयाला सांगा, इस्माईल दोनही गोष्टी कां व कशें याचा विचार न करतां करीत असे. लक्ष्मीनें इस्माईलला प्रथम पाहिलें तेव्हां एखादें चोरटें मांजर दुधाच्या भांड्याजवळ टपून बसतें तसा तिला भास झाला. इस्माईलनें वर नजर करून तिच्याकडे पाहिलें नाहीं. पण सावज आणि शिकारी ह्यांचा जसा एक संकेत असतो तसाच कांहींसा तो प्रकार होता. लक्ष्मीला उगीच आपली त्या इस्माईलची भीति वाटूं लागली.

किसन बादशहा ! सारी प्रजा राजाला ओळखते पण राजा कुठें त्या प्रजेला ओळखतो. तशा सारखीच स्थिति त्या बोटीवर होती. तेथें प्रत्येकाला किसन बादशहा ही व्यक्ति माहीत होती. ' बादशहा ' ह्या एकाच शब्दानें किसनच्या बहुतेक गुणांचा व दोषांचा निर्देश होत होता. किसन लहरी होता. ऐषआरामी होता, संपन्न होता, सामर्थ्यवान् होता. फार काय; होत्याचें नव्हतें आणि नव्हत्याचें होतें करणारा होता. निदान त्याच्या मनाला तसा विश्वास वाटत होता. त्याची हुकमत त्या आगबोटीवर इतक्या कडक रीतीनें चाले कीं, प्रत्येकाच्या प्राणाचें पान त्याच्या नुसत्या नजरेनें हाले. किसन आणि लक्ष्मी ह्या दोघांत कमी बोलणारा कोण अशी जर पैज लावतां आली असती तर तिचा निकाल ऐकायला कल्पान्तासारखा कंटाळवाणा काळ घालवावा लागला असता. आणि लक्ष्मीला जरी माहीत असलें तरी लक्ष्मीला किसननें अजून पाह्यलें नव्हतें. पण लक्ष्मीनें किसनला पाहिलें होतें. त्याच्या जबरीच्या व छळाच्या गोष्टी तिनें बोटीवरच ऐकल्या होत्या. कदाचित् त्या बोटीवर असा शिरस्ताही असेल कीं, नवीन भरती केली कीं त्या गोष्टी हळूंच सोडून द्यावयाच्या ! हवेच्या लहरीप्रमाणें त्या गोष्टी प्रत्येक मजुराच्या कानावर जात. तो मजूर त्या गोष्टी घेई आणि मुकाट्यानें पुढच्या प्रसंगाकरतां स्वतःला तयार करी. जगायचें एवढेंच ध्येय त्याच्यापुढें असल्यामुळें तें जीवन कुत्र्याच्या मोतीचें आहे ह्याचा विचार करावयाला त्याला फुरसतच नसे. तो विचार करण्याची त्याला ताकद नसे. लक्ष्मीनें ज्या गोष्टी ऐकल्या त्यांत तिला स्वतःला कांहींच वाटलें नाहीं. नवऱ्यानें केलेला छळ तिच्या अंगवळणी पडलाच होता. बादशाही थाटाचा

किसन आणि मूर्तिमंत दारिद्र्य व असहाय्यता ह्यांची प्रतिमा लक्ष्मी ह्या दोन व्यक्तींचें एकमेकांसन्निध येणें ह्यांत दैवाची उत्कट विरोधप्रियता दिसून येई. तितकीच अद्भुत घटनेची चतुरता होती.

लक्ष्मी ह्या तिघांचा जसा विचार करी, किंवा त्या तीन व्यक्तींचें अस्तित्व त्या जवळ नसतांही तिच्या मनाला पटत असे, त्याचप्रमाणें त्या तीन व्यक्ति लक्ष्मीविषयीं विचार करीत असतीलच किंवा काय तें सांगणें कठीण आहे.

मिलिंद प्रेमाच्या डावांत फसला आणि नंतर त्याच्या मनानें अत्यंत लोकविलक्षण मार्ग घेतला. बहुतेक प्रेमवेड्यांना आपल्या प्रियकरणीच्या रूपाची स्मृतिमदिरा गुंगवून टाकते. जगांतले आवश्यक व्यवहार करण्यांत सुद्धां त्यांना कमीपणा वाटतो. सीध्या मार्गानें जाणें म्हणजे आपल्या प्रेम-मूर्तीचा अनिर्वचनीय अपमान करणें अशीच त्यांची ठाम समजूत होऊन बसते. पण मिलिंद त्या रुळलेल्या मार्गापासून वळला. आशेप्रमाणेंच जीव-नांत निराशा ही सुद्धां एक शक्ति आहे असें त्याला वाटलें. अहेतुक आयुष्य तरी कसे जातें हा एक हेतू त्यानें मनांत धरला आणि जगाचें विराट–स्वरूप पहावें म्हणून तो त्या जगाच्या पायीं लागला. त्यानें साध्या मजुराचा पेशा स्वीकारला. त्या पेशाच्या सुरवातीलाच त्यानें हिंदुस्थानाला रामराम ठोकला. निराशेनें स्वीकारलेल्या मार्गांत शुभशकुनाची मिलिंदानें अपेक्षा केली नाहीं. पण विचित्र दैवानें त्याला त्याच्या नव्या वेषांतरांत लक्ष्मी दाखवली. अत्यंत गूढ अशा शक्तीनें खेंचला गेल्यामुळें तो त्या दर्शनांत रमला. आतांपर्यंत अहेतुक वाटणारें जीवन त्याला एकदम रम-णीय नसलें तरी कर्तव्यपूर्ण वाटूं लागलें.

त्याला पटलें " जग ही उतारूंची बाजारपेठ आहे. प्रेम हें मानण्यावर आहे, मनावर अवलंबून आहे. असहाय्य जीवांविषयीं कर्तव्य करणें हेंच तत्वा प्रेमाचें उदात्त रूप आणि ' लक्ष्मी ' हीच त्या कर्तव्याची अधिष्टात्री देवता ! ! "

मिलिंद लक्ष्मीचा विचार ह्या दृष्टीनें करी. इस्माईल आणि किसन त्यांचे आचार–विचार ओघानें येतील तसतसे दिसतील !

---

# प्रकरण ४ थें

## 'नवी परिस्थिती'

कांचनद्वीपांत येऊन मिलिंदाला जवळ जवळ महिना होऊन गेला होता. ह्या नव्या परिस्थितींत आल्यापासूनच स्वावलंबन ही सर्वांत महत्वाची बाब आहे हें त्याच्या मनांत पूर्णपणें ठसलें होतें. त्याच्या 'कोठ्यांत' त्याला एकट्याला रहायला पुरेशी जागा होती आणि तो सडाफटिंग असल्यामुळें साहजिकच त्याचा 'कोठा' म्हणजे येणारा जाणाराला दोन (!) मिनटें बसण्याची अथवा टेकण्याची जागा झाली होती. संध्याकाळचा अंधुक प्रकाश पडायला सुरवात झाली. मिलिंदानें आपलें जेवण आटोपून रस्त्याच्या कडेला तो येऊन बसला. एका किंचित् फाटक्या सदऱ्याची दुरस्ती करणें हें त्याचें ध्येय (!) होतें. त्याला अनुसरण्याकरतां सुइ व दोरा दोनही वस्तू त्यानें एकमेकांजवळ आणल्या. पण सुईच्या नाकांतून दोऱ्याचा प्रवेश कसा व्हावा हा एक त्या ध्येयाच्या मार्गांतला मोठा बिकट प्रश्न होता. एकदां दोनदां—अंकाला जसा अमर्यादपणा तसा मिलिंदाच्या प्रयत्नाला अपयश येत गेलें, आणि पुढें पुढें तर त्याला असें वाटूं लागलें कीं, कदाचित् प्रयत्न केला तर ह्या सुईच्यां नेढ्यांतून उंटाचें शरीर समावून जाईल पण हा दोरा कांहीं जाणार नाहीं. सुई आणि दोरा ह्यांच्या तपशीलांतला हा विरोध मिटणार केव्हां ह्याचा विचार करीत मिलिंद हताश होऊन बसला. तो आपल्याच नादांत गुंग होता, त्यामुळें अगदीं जवळून आलेल्या हास्याच्या ध्वनीनें तो दचकला. त्यानें वर मान करून पाहिलें तों रंगू हंसत उभी होती. मिलिंदाची व तिची दृष्टादृष्ट होतांच ती म्हणाली, "मिलिबाबू-अगदीं आपल्याच नादांत! घरची आठवण होती व्हय?" मिलिंदानें एकदां हंसून तिच्याकडे पाहिलें आणि तो म्हणाला, "रंगूबाई—घरची आठवण यायला मला घरच कुठें आहे! मी एकटा आहें—जिथें जाईन तिथें माझें घर--" ह्या मिलिंदाच्या शब्दांनीं रंगूला विषाद वाटला. आपण उगीच ह्याला नसत्या गोष्टीची आठवण करून दिली असें वाटलें. त्याचें मन दुसरीकडे लागावें

म्हणून तिनें विचारलें, " बरं पण ही एवढी खटपट कशाची चालली आहे?—" मिलिंद हातांतला सुईदोरा बाजूस ठेवीत म्हणाला, " कांहीं नाहीं. जरा सदऱ्याला शिवण मारायची होती. म्हणून दोरा ओंवीत होतों, पण कांहीं केल्या तें जमेना, म्हणून बसलों होतों ! आपलं नशीबच असं !" हें ऐकून रंगूला पुन्हां हंसू आलें. सुईदोरा ओंवतां येईना म्हणून हताश होणाऱ्या मिलिंदाचें तिला मनःपूर्वक हंसू आलें. तिनें त्याच्यापुढून तो दोरा व सुई घेतली आणि एका क्षणांत ओंवून दिला. मिलिंदानें आतां सदऱ्याला टांके मारायला सुरवात केली. पण तेंही नीट जमेना. रंगू रस्त्यावरच बसून राहिली. मिलिंदाच्या त्या स्वदेशी उद्योग धंद्या (!) कडे पहात असतांना तिला एक प्रकारची मौज वाटत होती. आपली फजिती दुसरं कोणी पहात आहे ह्या जाणिवेनें तर त्याची अधिकच त्रेधा तिरपिट उडाली. फाटका सदरा शिवतां शिवतां त्याच्या हाताला कित्येक वेळां सुई बोचत होती त्यामुळें कित्येकदां त्याच्या भुवईच्या जागच्या जागीं एकतर्फी निषेधाचा ठराव पास होई. शेवटीं मिलिंद ह्या सव्यापसव्याला कंटाळला आणि त्यानें सदरा खालीं ठेवला. तोंच सदरा उचलून रंगूनें सरासरा टाके मारले आणि ती हंसत त्याच्याकडे पाहूं लागली. स्वच्छ पडणाऱ्या उन्हाप्रमाणें रंगूचें हास्य होतें.

साऱ्या कांचनद्वीपांत ज्या कांहीं ठळक व्यक्ति होत्या त्यांत रंगूचा दर्जा बराच वरचा होता. ती जातीनें महारीण होती पण अंगच्या कर्तबगारीनें तिनें कांचनद्वीपांत स्वतंत्र स्थान संपादन केलें होतें. परिस्थितीच्या तडाक्यांत सांपडून तिलाही कित्येक बरीं वाईट कृत्यें करावीं लागलीं. मिलिंद कांचनद्वीपांत आल्यापासूनच त्याच्याविषयीं तिला एक प्रकारचा ओढा वाटूं लागला आणि मिलिंद जरी आपण होऊन तिच्याशीं प्रथम बोलत नसे तरी तिनें त्याची ओळख काढली.

ती रोज नेमानें जरी त्याच्याकडे येतजात नसली, तरी ती त्याचा 'शोध' मात्र नेहमीं ठेवी. आजही मिलिंदकडे ती त्याच उद्देशानें आली होती. मिलिंदाकडे यायला तिला आणखीही एक बलवत्तर कारण होतें आणि तें म्हणजे लक्ष्मी व मिलिंद ह्यांचा असलेला परस्पराविषयींचा आदरभाव. लक्ष्मी आणि रंगू ह्या एकाच 'लाईनमध्यें रहात होत्या आणि कामाच्या

वेळीं दोघींचीही रोज गांठ पडे. आधीं रंगूचा मनमुक्त बोलणारा स्वभाव आणि त्यांत लक्ष्मीसारखी अबोल मुलगी त्यामुळें जणूं कांहीं तिच्या वाचिक शक्तीला स्फूर्ती–ईर्षा येई. त्या बोलण्यांतच एकदां लक्ष्मीनें मिलिंदाविषयीं तिला सांगितलें व तो त्याचा चांगुलपणा ऐकून तर रंगूला मिलिंदाविषयीं अधिकच आपलेपणा वाटूं लागला. रंगू जितकी अशिक्षित होती तितकीच मनुष्य स्वभावाची पारख करण्यांत ती तरबेज होती आणि त्यामुळें मिलिंदाचें कांहीं तरी चुकलें आहे, हरवलें आहे आणि त्याचमुळें तो असा निराश होऊन ह्या मार्गाला आला असावा असा कयास तिनें बांधला. वास्तविक ती कुणाशीं ममतेनें वागायची म्हणजे एक आश्चर्यच. साऱ्या कांचनद्वीपात ' किसनचीं ' कुटीण म्हणून तिची प्रख्याती होती. ह्यामुळें जो तो तिला भिऊन वागे. तिच्या अति बोलक्या स्वभावामुळें बहुधा तिच्याशीं बोलायला कुणी टिकत नसे. फार काय पण उलट तिच्याशीं गुप्तपणें शत्रुत्व धरणारेच बहुतेक असत.

मिलिंदाचा सदरा शिवून झाला आणि रंगू जायला निघणार इतक्यांत मिलिंदानें तिला हळूंच व भीत भीत प्रश्न केला, "रंगूबाई, लक्ष्मीची काय हालहवाल आहे ?" तो प्रश्न ऐकतांच रंगूनें आपल्या एकाच भुंवईला किंचित् मुरड घातली आणि जायला उभ्या असलेल्या स्थितींतच तिनें म्हटलें, " वरून तर बरी दिसते पण मला कांहीं तिचें चिन्ह ठीक नाही दिसत. " इतकें म्हणून तिनें निश्वास सोडला. त्यावर मिलिंद काकुलतीला येऊन म्हणाला, "कां तिचा नवरा तिला कांहीं कमी जास्त बोलतो का ?–"

त्यावर कांहीं विचार करीत रंगू म्हणत, " हा नुसता बोलता तर कांहीं अंगाला भोंकं नसतीं पडलीं–पण गांजा पितो आणि पैसे नसले म्हणजे तिचा नाहीं नाहीं तो छळ करतो. एकदां–परवांची गोष्ट. मी अशीच चाललें होतें त्यांच्या दारावरून. तर आपला हातीं जळतं लाकूड घेऊन हा नवरा त्या लक्ष्मीला हळूं हळूं चटके देत होता. तिला पुरतं जाळून टाकता तरी बरें झालं असतं. मी पुढें झालें आणि त्याला चांगलाच हासडला–तेव्हां गेला मेला भागूबाईसारखा पळून. असा आहे मेला चांडाळ. निसंतान होईल त्याचं " असें म्हणून रंगूनें काडकन कानावर बोटें मोडलीं. लक्ष्मीच्या हालअपेष्टांचें वर्णन करतांना तिच्या अंगांत कशाचा तरी संचारच झाला

असावा. तिच्या पोटच्या पोरीचाच छळ होतो आहे अशा भावनेनें ती तो प्रकार सांगत होती. त्या तिच्या आविर्भावांत एक प्रकारचा जिव्हाळा होता. मिलिंद सुद्धां किंचित् काल तें वृत्त ऐकून मनांत हलला आणि त्याच्या तोंडून सहज उद्गार निघाले, "अरेरे. गरीब बिचारी लक्ष्मी! त्यावर रंगू कांहीं बोलली नाहीं. तिच्या मनांत त्या प्रसंगाचा खोल ठसा बटला होता आणि–स्त्रीच्या दृष्टीनें ती कांहीं तरी उपाय सांपडल्यास पहावा म्हणून विचार करीत असावी असें दिसलें. तिच्या मनाचा थांग तेव्हां लागणें शक्य नव्हतें.

मिलिंदाला मात्र विनाकारण चुटपुट लागून राहिली. आपला सदरा शिवीत असतांना त्याला एका प्रख्यात कवितेची आठवण झाली. त्या गाण्यांत एक बिचारी अनाथ स्त्री दुसऱ्याचे कपडे शिवून आपली उपजीविका चालवीत होती. तिचा प्रत्येक टांका म्हणजे तिच्या पोटाला चिमटा घेऊन दिलेला टांका होता. आणि अशा शिवणीचे कपडे अंगावर घालून फिरणें म्हणजे गरीबगुरीबांच्या आतड्यांनीं व रक्तानें शिवलेले आणि रंगवलेले कपडे अंगावर घालण्याइतकेंच क्रूरतेचें आणि मनुष्यहीनतेचें होतें. असा त्या कवितेचा मतितार्थ होता. लक्ष्मीचा होत असलेला छळ पाहून अथवा ऐकून त्याला तिची स्थिति अत्यंत अनुकंपनीय वाटली. पण त्या स्थितीला कोणाचाच उपाय नव्हता. विधियुक्त संस्कारानें नवरा झालेल्या पुरुषाच्या हातीं जर सर्वाधिकार दिले गेले आणि त्याचा असा दुरूपयोग होऊं लागला तर करावयाचें काय? एका चांगल्याकरतां अनेक वाइटांचा स्वीकार खुशाल करावा लागतो हें तरी चांगलें काय?

मिलिंदाला पुन्हां एकदां रंगूनें त्याच्या विचारांतून जागें केलें. ती आपल्याजवळ उभी आहे ह्याची जाणीव तो जवळजवळ विसरला होता. त्याच्या अंतःकरणावर लक्ष्मीचें करूण चित्र अस्पष्ट रेखांनीं आखलें जात होतें. चित्राला रंगदारपणा नव्हता आणि जिवंतपणा नव्हता. रंगूनें पुन्हां लक्ष्मीचीच गोष्ट काढली. ती म्हणाली, "मिलिंदबाबू–तुम्ही लक्ष्मीचें भजन ऐकलें आहे कधीं? मिलिंद ह्या प्रश्नानें जागा झाला आणि तसाच आश्चर्यचकित झाला. त्यानें लक्ष्मीला भजन करतांना ऐकलें नव्हतें. पण त्याची मनोमन खात्री होती कीं, लक्ष्मीला अशक्य असें ह्या जगांत कांहींच नाहीं."

त्या प्रश्नाचें उत्तर द्यायचें म्हणून त्यानें प्रश्न केला, " पण ह्या कांचनद्वीपांत देव कुठें आहे तर भजन करायचें ?" त्यावर रंगू म्हणाली, "पण लक्ष्मी जवळ स्वतःचे देव आहेतना ! अशी एक बारीक मूर्ति आहे. असेल अंगठ्याएवढी. एकदां मी सहज तिला भेटावें म्हणून रात्रीची गेलें; तर आपली त्या मूर्तीला उजव्या मांडीवर ठेवून लक्ष्मी कांहीं तरी गुणगुणत होती. मला काहीं तितकें स्पष्ट ऐकूं आलें नाहीं; पण एकदांच तिचा आवाज चढला आणि त्यानें माझ्या काळजाचें काय झालें"—रंगूच्या अंगावर खरोखर कांटाच उभा राहिला. लक्ष्मीच्या मूक हृदयानें आपल्या भक्तिवीणेवर छेडलेल्या सुरानें रंगूच्या हृदयाला जोराचा धक्का दिला. त्या एका सुराबरोबर रंगूच्या सुसवृत्ति जाग्या झाल्या. तो दिव्य सूर पुन्हां ऐकायला मिळेल का म्हणून तिनें पुष्कळ वाट पाहिली पण तिचें मनोवांछित पूर्ण झालें नाहीं. भरल्या ताटावरून माणसाला उपाशीं उठवावें तसा तिला मनोमय उपास घडला. अर्धवट जागें झालेलें हृदय रंगूला स्वस्थता वाटूं देईना. रंगूनें आजपर्यंत अशी अस्वस्थता अनुभवली नव्हती. पण त्याच बरोबर त्या अस्वस्थेंतली गोडी ( ! ) अननुभूत होती. एखाद्या गोष्टीचें दुःख वाटून त्यांत, त्या दुःखांत गोडी वाटावी हा अनुभव अजब होता. रंगूचें मन त्या अनुभवानें गोंधळून गेलें होतें. तिला त्या अनुभवाचें पृथःकरण करण्याइतकें सामर्थ्य नव्हतें. तिचें मन आजपर्यंत उपजीविकेच्या धोपट मार्गानें चालत होतें. त्या मार्गावर तिला बरीं वाईट कृत्यें करावीं लागलीं पण त्यांचा बरेवाईटपणा तिच्या पोटांत दुखला नाहीं. पण ह्या नूतन अनुभवानें मात्र तिच्या पोटांतल्या आंतड्यांना पीळ पडूं लागला. आंतड्यांना पीळ पाडणाऱ्या वेदनांत सुद्धां सुखाचा बारीक रेशमी धागा असतो ह्याचा तिला विस्मय वाटला. तिला कळेना--हा पीळ प्रेमाचा आहे.--ही आतडयांची धडपड आजपर्यंत न मिळालेल्या जिव्हाळ्याकरतां आहे, ही मनाची तळमळ मातेच्या मनाची आहे. 'सर्वांठायीं आपण' ह्या दिव्य पण गूढ संवेदनेची आहे. पाप्यांतला पापी, कठोरांतला कठोर सुद्धां ह्या मनस्तापाची झळ लागतांच गारद होतो. रंगु त्या दिव्यक्षणाच्या स्मृतिरंगांत दंग असतांच तिला कोणीशी हांक मारली. त्याबरोबर ती त्या तंद्रेतून जागी झाली. तिनें हांक मारणाऱ्या व्यक्तीचा आवाज ओळखला.

मिलिंदानें कुणी हाक मारली म्हणून पाहिलें तों इस्माईल ! त्या हाकेसरशीं रंगु मिलिंदाचा निरोप घेऊन निघाली, आणि इस्माईल व ती दोघेही लवकरच रात्रींच्या अंधारांत दिसेनाशीं झालीं. मिलिंदानें वर पाहिलें तों आकाश लक्षावधी तारकांनीं नटलें होतें. पण त्या तारकांचा एकमेकांशीं चाललेला संवाद त्याला कळत नव्हता. इस्माईल आणि रंगू ह्यांचा परस्पर संबंध काय असेल तोही त्याला माहीत नव्हता. त्यामुळें रंगूसारख्या स्वतंत्र वृत्तीच्या स्त्रीनें इस्माइलच्या हांकेसरशी निघून जाण्यांत काय गूढ असेल हेंही त्याला कळेना. लक्ष्मीचा असा छळ का होतो हेंही त्याला कळेना आणि त्याहीपेक्षां ह्या अनेक न कळणाऱ्या गोष्टींचा आपण ध्यास कां घेतां हेंच त्याला कळेना. अज्ञाताला ज्ञात करणें हाच मानवी जीविताचा ध्यास असावा काय ह्या विचारांतच त्याला झोपेची गुंगी आली. त्या सुप्त स्थितींत तो आत्म्याच्या जागृतीचा प्रश्न सोडवूं लागला असेल काय ?

---

## प्रकरण ५ वें

### ' एकेकाचें मन '

बहुरत्ना वसुंधरा हें तत्त्व एकापेक्षां अनेक अर्थांनीं प्रत्ययास येत असतें. बहुश: मानव जातीकडून ह्या बाबतींत जो एक ठरावीक स्वरूपाचा पक्षपात दाखवला जातो त्यामुळें मानवी स्वभावाचें साधर्म्य मनाला पटतें. मानवजातीनें आपल्या लाडक्या ' रत्नांचाच ' इतिहास उराशी जतन करून ठेवावा आणि आपल्या रूढी तुडवून झालेल्या अन्यायांचें परिमार्जन करण्याचा प्रयत्न करणारांना हद्दपारीची शिक्षा द्यावी हाच तो पक्षपात होय. मराठे आणि मुसलमान ह्यांच्या इतिहासाचा भाग लिहितांना गुणगौरवाची पूजा मुसलमानांच्या रिसायतीवर बांधली जाते आणि शिव्याशापांची मुंडावळ गरीब बिचाऱ्या ' भवानीच्या ' कपाळीं लटकते, हा अनुभव ख्यात आहे. तरी पण त्यांतही आश्चर्याची गोष्ट ही कीं,

मुसलमानांना प्यारा असलेला हा पक्षपात मराठ्यांना प्रतिकूल असूनही त्यांना आपला 'चालतो.' अशाच प्रकारचा कांहींसा पक्षपात जगातल्या पराक्रमी पण दुष्ट पुरुषांच्याविषयीं आढळून येतो. उगवत्या सूर्याला नमस्कार करणारें जग कांहीं काल ह्या कली–पुरुषांच्यापायीं विनम्र होतें. पण इतिहासाच्या सांपळ्यांत धरून त्याच कलीपुरुषावर निसंकोचवृत्तीनें घडघडीत खोट्यानाट्या गोष्टींचा आरोप करण्यांत त्याच जगाचे कृतघ्न वारसदार मोठे तरबेज असतात. आपणांकडे इतिहासकाराची श्रेष्ठ भूमिका आली ह्या एकाच आधारावर 'दुष्ट म्हणजे आजन्म व मरणांत दुष्ट' असा एक शिष्टसंम्मत अभिप्राय रूढ केला जातो. परंतु एखादा तैमुरलंग मानवजातीचा द्वेष्टा कां बनतो? त्याच्या तीव्र लोकविद्वेषाला लोकच कारण आहेत किंवा कसें ह्याचा विचार करण्याची आवश्यकता कुणालाच वाटत नाहीं. फार काय, अशा त्या तैमूरलंगाच्या सैन्यांत असलेल्या एखाद्या भाडोत्री मुडदेफरासाचा मुलगा जरी इतिहासकार झाला तरी तो सुद्धां आपल्या बापाच्या अन्नदात्यावर 'दुष्ट' असा छाप मारायला कचरत नाहीं आणि 'निःपक्षपाती' असें गौरवपूर्ण प्रशंसापत्र पुढील पिढीकडून मिळण्याची निंद्य लालसा बाळगायला कमी करीत नाहीं.

इतकी कृतघ्न असलेल्या मानवजातीनें आपल्या उद्धाराची आशा करणें म्हणजे आकाशानें भरीव बनून पृथ्वीच्या स्पर्धेला उभें रहाण्यासारखेंच हास्यापद आहे.

'किसन' आपल्या बंगल्याच्या सोप्यांत वर उध्दृत केलेले विचार करीत हळू हळू फिरत होता. सकाळीं अकराचा सुमार असेल. जेवण तयार होण्याची किसन वाट पहात होता. ते विचार त्याच्या डोक्यांत नव्यानें आजच आले होते असें नसून तें पूर्णपणें त्याच्या रक्तांत भिनून गेले होते. त्याच्या रक्ताचें अभिसरण जितकें नित्य व नियमीत होतें तितकेंच तें विचार त्याच्या डोक्यांत कायम वास्तव्य करून होते. एखाद्या अंधाऱ्या जुनाट घुमटाप्रमाणें त्याच्या डोक्याची स्थिति होती. मानवी मनाला प्रफुल्लीत करणारा परस्परांच्या सहानुभूतीचा सूर्यप्रकाश त्याला कधींच मिळाल्यासारखा दिसत नव्हता. त्याचे विचार म्हणजे त्या अंधारांत स्वतःला टांगून घेणारी वटवाघुळे होतीं. स्वतःचीच विष्टा खाऊन त्याचे विचार पुष्ट होत,

आणि आपणापेक्षांही ओंगळ व हीन अशा अपत्यांना जन्म देत. वहि-वाटीच्या हक्कानें वारसदार झालेल्या त्या विचारांनीं किसनच्या डोक्यांत एक वसाहतच स्थापन केली होती. 'मोकळें रान' मिळाल्यामुळें ते 'वसाहतवाले' स्वतःला इष्ट अशा सुधारणा वारंवार घडवून आणीत. प्रथम पाहुणे म्हणून येऊन आजच्या घटकेला त्यांनीं किसनला आपला 'गुलाम' बनवला होता. स्वखुशीनें स्वीकारलेल्या त्या गुलामगिरींत किसन काळ कंठीत होता आणि आपल्या राज्यांत—कांचनद्वीपांत हजारों मजुरांच्या गुलामगिरीवर कुबेराला लाजवणाऱ्या लक्ष्मीचा संचय करीत होता. किसनचा भव्य प्रासाद म्हणजे त्या लक्ष्मीचा अल्पांशानें प्रभाव दाखवणारें मूर्तरूपच होतें. किसन त्या भव्य प्रासादाच्या पायऱ्या उतरूं लागला.

त्या पायऱ्यांच्या समोर एक भक्कम दरवाजा होता. लोखंडी गज व पट्ट्या ठोकून त्या दरवाजाच्या मजबुतींत भर टाकण्यांत आली होती. दरवाजाच्या दोन्ही बाह्यापासून सुरू होऊन सगळ्या घराला प्रदक्षणा घालून त्या घराचें रक्षण करणारा एक दगडी कोट होता. त्या कोटांत आणि घरच्या भिंती ह्यांच्या मध्यें पुष्कळ जागा मोकळी सोडली होती. माणसांविषयीं असलेल्या द्वेषाप्रमाणेंच किसनच्या मनांत फुलांविषयीं अढी असावी असें नव्हतें. कारण मोकळ्या जागेंत टिकठिकाणीं चक्रें तयार करून फुलांच्या व इतर दिखाऊ पानांच्या कुंड्या ठेवल्या होत्या. इतकेंच नव्हे तर, एकंदर मांडणीवरून त्या बागेचा मालक अभिरुचीसंपन्न असावा असें सहज दिसून येई. बारीक रेती घालून फिरण्यासाठीं एक मोकळी वाट ठेवण्यांत आली होती. कोटाला ठिकठिकाणीं बाहेरच्या भागाची पहाणी करतां यावी ह्या उद्देशानें लहान लहान गवाक्षें ठेवण्यांत आलीं होतीं. घराच्या मागील बाजूस एक भली मोठी विहीर असून तिच्यावर 'पंप' बसवण्यांत आला होता. विहीर सोडून थोडे पुढें गेलें कीं एक उच्छ्वास लागे. वरून एकच रूंद फळी टाकलेली असे आणि त्या फळीला कडीकुलपाच्या बंदोबस्तांत रहावें लागत असे. पुढील मुख्य दरवाजाखेरीज बाहेर जाण्याला इतरत्र कुठेंही दरवाजा नव्हता. मात्र किसन कित्येकवेळां बाहेर पडत असे तरीही तो मुख्य दरवाजाचा उपयोग करीत नसे. किसनविषयीं ज्या

कित्येक रहस्यमय गोष्टी कांचनद्वीपांत प्रचलीत होत्या त्यापैकींच त्याचें अनपेक्षीत मार्गानें घरांत येणें व जाणें ही गोष्ट होती. किसन त्या उच्छ्वासापाशीं थांबला. कुलुपाला हात लावून तें बंद असल्याबद्दल त्यानें खात्री करून घेतली आणि तो पुढें चालूं लागला. जवळच घरांत येण्याकरतां पायऱ्या होत्या तेथून तो वर चढला. घराच्या मागील बाजूला एक रुंद सोपा होता. आंत शिरतांच उजव्या हाताला स्नानगृह होतें. त्याच्या समोरची जागा मोकळीच होती. स्नानगृहाला लागूनच एक भव्य दिवाणखाना होता. किसन तेथें आला. इतक्यांत जेवणाची वर्दी घेऊन नोकर आला. किसन जेवण करण्यास निघून गेला.

त्याचवेळीं मजूर सुटण्याची घंटा झाली होती आणि किसनच्या घराच्या पुढच्या दरवाजापाशीं दोन व्यक्ति येऊन थडकल्या. मिलिंद मुकाट्यानें चालत होता. आणि एखाद्या हिंस्रपशूप्रमाणें त्याच्याकडे क्रोधाविष्ठ नजरेनें पहात त्याच्या मागून इस्माईल चालत होता. दोघेही जण बाहेरच्या व्हरांड्यांत येऊन पोहोंचले. मिलिंदाच्या डोक्याला खोंक पडून त्यांतून रक्ताचे थेंब हळं हळूं गळत होते. त्याच्या वस्त्रांना सुद्धां त्या रक्तानीं रंग चढला होता. ग्लानीमुळें मिलिंदाला उभें रहाणें शक्य नव्हतें म्हणून तो एका खांबाशीं बसूं लागला. त्याच्या हालचालीवर पूर्ण लक्ष असलेला इस्माईल अगदीं तीव्र पण हळूं आवाजांत म्हणाला, "सूवर–एखाद्या राजाप्रमाणें आरामांत बसतोस काय? खडे रहो–कामांत चुकारपणा करून वरती मौजा मारायला हा काय हिंदुस्थान आहे होय! चल ऊठ. अदबीनें उभा रहा. इतक्यांत हुजूर येतीलच!" बिचारा मिलिंद हतबल होऊन उभा राहिला तरी तो एवढे म्हणालाच, "खानसाहेब, माझा कांहीएक अपराध नसतां तुम्ही मला छळतां आहांत हें कांहीं योग्य नव्हे. हा अन्याय होतो आहे!" त्याबरोबर चिडून जाऊन इस्माईल म्हणाला, "पागल, हळूं बोल ना. तुला मजुरीचें काम होत नव्हतें तर आलास कशाला मरायला इथें? तुला काय वाटलें कीं इथें तूं आलास कीं हुजूर तुझ्यावर खूष होऊन तुला एखादी बेटी देऊन घरजावई करतील! तुम्ही हिंदू बडे मिजासखोर. पण आमच्या हुजूरांच्या अमदानींत तुम्हाला काम कसें करावें ही नीट समजतें! टवाळ-

खोरासारखें आपल्या देशांत हिंडायचें तें सोडून इथें लोकांच्या मागें उपव्याप उत्पन्न करायला आलास कां ?" तो प्रश्न करतांना कांहीं तरी आंतरीक तळमळीनें अथवा संशयानें इस्माईलच्या कपाळावरची शीर अधीक स्पष्ट दिसूं लागली. त्याच्या नजरेंत मत्सराचें जलाल पाणी खेळूं लागलें. थोडा वेळ गेला. त्या अवधींत कुणीही एकमेकांशीं बोलले नाहीं. इस्माईल मधूनच किसन येणार त्या दरवाजाकडे पहात असे. मिलिंदानें एका बोटानें आपल्या कपाळाची जखम दाबून धरली होती आणि आपण आज सोशीत आहोंत ह्यापेक्षांही सहस्रपट निष्ठुरतेनें आपल्या कित्येक बांधवांना छळलें जात आहे ह्या विचारानें खिन्न होऊन तो उभा होता आणि त्या इतरांविषयींच्या विचारांत स्वतःच्या जखमेचें दुःख कसें तरी सहन करीत होता.

किसनचें जेवण संपलें व तो बाहेर आला. त्याला पहातांच इस्माईलनें अदबीनें सलाम केला. थोडया वेळापूर्वींचा त्याचा मगरूरपणा पार नाहींसा झाला होता. बाजूला उभ्या असलेल्या मिलिंदाकडे किसनचें लक्ष गेलें. इस्माईल बोलूं लागला, "हुजूर, हा हरामखोर ढोंग करून घेरी आणतो आणि काम बुडवून फुकटचा पगार घेतो. राईचा पर्वत करून लोकांना फसवण्यांत मोठा हुशार आहे. ही ह्याच्या डोक्याला लहानशी कुठे खोंक आहे तो पहा कसा चेहरा केला आहे त्यानें. आणि सरकार--" आपला स्वर किंचित हलका करून इस्माईल म्हणाला, "लोकांच्या बायकावर ह्याची नेहमीं नजर असते. बडा काफीर आहे." किसनचें लक्ष त्या जखमेकडे व ती धारण करणाऱ्या शांत मुखाकडे लागलें होतें. 'घेरी' ह्या एकाच शब्दानें किसनच्या स्मृतीला झटका बसला. 'मुंबईस आपल्याला अशीच घेरी आली असतां--!' किसन पुढें विचार करण्याकरतां थांबला नाहीं. त्यानें नोकराला हांक मारून पाणी मागितलें. एका खुर्चीवर मिलिंदाला बसण्यास सांगून त्यानें त्याची जखम धुतली. कसलीशी भुकटी लावून वर स्वच्छ पट्टी बांधून तो इस्माईलला म्हणाला, "जा--ह्याचा इनसाफ मग करूं. तूर्त तूं जा." किसनच्या बोलण्याचें व त्याहीपेक्षां विलक्षण अशा कृतीचें इस्माईलला अत्यंत आश्चर्य वाटलें. त्याचा स्वतःच्या डोळयावर विश्वासच बसेना. तो किसनकडे नुसता पहातच राहिला. त्याची अशी पुरेपूर खात्री होती कीं किसन मिलिंदाला कांहीं तरी जबर सजा ठोठाव-

णार ! पण तसें कांहीं करण्याचें सोडून किसन स्वतः मिलिंदाची शुश्रषा करूं लागला. इस्माईलला कळेना कीं सर्वांना कर्दनकाळ वाटणारा किसन कोणत्या जादूनें वश होऊन मिलींदाच्याच बाबतींत आपला क्रूरपणा विसरला.

किसनचा हुकूम होताच इस्माईल जाण्यास निघाला. जातांना त्यानें एक क्रोधपूर्ण कटाक्ष मिलिंदाकडे टाकला आणि तो निघून गेला. इस्माईल जातांच किसननें मिलिंदाकडे पाहिलें आणि स्वतःला अगदीं अपरिचीत अशा आवाजांत त्यानें विचारलें, "आपण—मला ओळखतां ?" मिलिंदानें खिन्नपणें हसून नुसतीच मान हालवली. पण तसेंच त्याच्या लक्षांत आपला उद्धटपणा येऊन तो कांहींसा शरमून म्हणाला, "होय—हुजूर !" बस् एवढेंच ! पण त्या दोन शब्दांत मनाचा मानीपणा पूर्णपणें व्यक्त झाला होता. किसनला नेहमींच्या संवयीला विरुद्ध असा जबाब ऐकून राग आलाच. त्याच्या शब्दाला असा प्रतिजाब आजपर्यंत साऱ्या कांचनद्वीपांत कधींही मिळाला नव्हता. तरीपण ती मानखंडना कशी तरी सहन करून तो म्हणाला, "त्यावेळीं अहेतुक साहाय्य आपण केलें.त्याचा मोबदला म्हणून माझा पाहुणचार आज आपण घ्या." नंतर किसननें नोकराला हांक मारली व मिलिंदाकरतां एक स्वच्छ सदरा व धोतर आणण्यास सांगितले. मिलिंदाजवळ तें देत असतां तो म्हणाला, 'आपण स्नान करा म्हणजे सगळें स्वच्छ होईल.' मुकाट्यानें मिलिंद स्नानकरण्याकरितां स्नानगृहांत गेला. त्याला त्या सगळ्या पाहुणचाराचा अर्थच कळेना. किसन इतका दयार्द्र केव्हांपासून झाला हें त्याला कळेना. सामान्य माणसाप्रमाणें जगाच्या व्यवहाराकडे पहाणारा तो एक साधा तरुण होता. मानसशास्त्राचें सिद्धांत अभ्यासित करून जगांतलीं विरोधी कोडीं सोडवण्याचा कटु प्रसंग त्याला त्याच्या आजपर्यंतच्या जीवनांत आला नव्हता. किसनच्या ह्या नव्या आचारानें जितका इस्माईलला धक्का दिला तितकाच मिलिंदाला चटका लागून राहिला. स्नान करीत असतां त्याचें मन त्या नव्या आश्चर्यांत न्हावून निघत होतें. किसनची कृपा कशाची असावी ह्याचा विचार करतां करतां त्याच्या मनांत एक दारूण शंका आली. भयंकर शिक्षा ठोठावण्यापूर्वीं अपराध्याला वागवण्याची रीत असते ती तर ही नव्हे ?

या शंकेनें मिलिंदाला भीति वाटली पण त्या बरोबरच जगण्यासारखें तरी आपल्याजवळ काय आहे ? ह्या विचारानें त्याची खिन्नता वाढली. स्नान उरकून तो बाहेर आला. किसन वाटच पहात होता. मिलिंदानें आपलें केंस धुतले होते तिकडे किसनचें प्रथम लक्ष गेलें आणि अगदीं हळूंच तो म्हणाला, " हें बरें नाहीं केलें तुम्ही !" मिलिंदाला त्या शब्दांचा बोधच होईना. त्याला वाटलें किसन आपण केलेल्या अपराधाविषयींच म्हणाला. म्हणून तो कांहींशा आर्जवी स्वरांत म्हणाला, " पण माझा अगदीं नाइलाज झाला आणि मग मला घेरी आली. मी पुष्कळ प्रयत्न केला पण मला माझें शरीर सावरेना. कामांत कसुरी करून फुकटचा पगार घ्यावा असें मला मुळींच वाटत नाहीं. " मिलिंदाच्या त्या बोलण्याचा किसनवर काय परिणाम झाला तें सांगणें कठीण. तो त्यांवर एवढेंच म्हणाला, " माझें बोलणें तुम्ही म्हणतां त्या गोष्टीला उद्देशून नव्हतें. तुम्ही डोक्यावरून आंघोळ केलीत हें त्या जवळच असलेल्या जखमेच्या दृष्टीनें बरें केलें नाहीं इतकेंच माझें म्हणणें–पण चला आतां वेळ गमावूं नका. " दोघेही आंत गेले. मिलिंदानें जेवण सुरू केलें. जेवण चालूं असतां कुणीच एकमेकांशीं बोललें नाहीं. किसन मात्र मिलिंदाकडे सारखा पहात होता. मिलिंदाला काय हवें नको, एवढेंच पहाण्याइतकीं साधी ती दृष्टी नव्हती. एकदोनदां मिलिंदानें त्याच्या दृष्टीला दृष्टि दिली आणि नंतर त्या भेदक नजरेपुढें त्याला हार खावी लागली. किसन इतका निरखून आपणांकडे कां पहातो ह्याचा त्याला थांग त्याला लागेना.

पश्चिमेच्या बाजूची खिडकी उघडी होती. तिच्यांतून वाऱ्याच्या मंद लहरी येत होत्या. मिलिंदाचे ओलसर कुरळे केस त्या लहरींनीं भुरभुर उडत होते. त्या केंसावरून येणाऱ्या वायूच्या लहरी किसनच्या हृदयांत शिरून कांहीं तरी त्या सांगण्याचा प्रयत्न करीत असाव्यात. किसन एकाग्रतेनें त्या केशगुच्छाकडे पहात होता. मिलिंदाचा चेहरा गोड होता त्यांत शंका नाहीं पण किसन मात्र त्या चेहऱ्याकडे सौंदर्य–शोधनाच्या नजरेनें पहात नव्हता.

एखाद्या हरवलेल्या बहुमूल्य वस्तूचा अगदीं ध्यानींमनीं नसतां लाभ व्हावा, अथवा तिच्या सारखीच दुसरी वस्तु दिसावी आणि नंतर आपल्या

हरवलेल्या वस्तूची आठवण होऊन जशी मनाला हुरहुर लागते तशीच ह्यावेळीं किसनची स्थिति झाली. अनेक वर्षें लुप्त झालेल्या अथवा सुप्त झालेल्या एका फार बलवत्तर अशा आकांक्षेला बांध घालण्याचा किसन आज प्रयत्न करीत होता. ती आकांक्षा जणू कांहीं आपल्या आजवरच्या अवहेलनेनें चिडून जाऊन किसनच्या कठोर अंतःकरणाला धाडधाड धडका देत होती आणि क्षणाक्षणाला आपल्या सहज धर्मापासून परावृत्त झालेलें तें अंतःकरण त्या आवेगानें हादरत होतें.

मिलिंदाचें जेवण संपतांच किसन त्याला बसायच्या मोठया दिवाणखान्यांत घेऊन गेला. तो दिवाणखाना उत्कृष्ठ प्रकारें सजवला होत होती. उत्तम उत्तम कोंच, आरशे, व पोषाख ठेवण्याकरतां सुंदर आरशाची कपाटे वगैरे उंची सामानानें त्या दिवाणखान्याचा भाग व्यापून टाकला होता. तें सामान लावण्यांत व चित्रांची निवड करण्यांत, पूर्वी बागेच्या बाबतींत जी उच्च अभिरुची दिसत होती तीच येथेंही दृग्गोचर होत होती मुंबईसारख्या वैभवशाली शहरांत राहून पहावयास मिळणार नाहीं अशा त्या दिवाणखान्याची सजावट पाहून मिलिंद तर दिपून गेला.

किसननें मनांत कांहीं एक ठरवलें आणि तो मिलिंदाला म्हणाला, "आपण हें मजुरीचें काम आतां सोडून द्या. तुमच्यासारख्या माणसानें आपला देश सोडून या ठिकाणीं कां यावें हें जरी चमत्कारिक दिसत असलें तरी मला त्याच्याशीं कांहीं कर्तव्य नाहीं. ह्यापुढें तुम्ही साधें कारकुनीचें काम करीत जा आणि तुमचें ऑफिस येथें बाजूच्या खोलींत ठेवलें जाईल, तेथें बसून तुम्ही आपलें काम करीत जा. मजुरांची हजेरी—पत्रांची उत्तरें देणें व नवीं पत्रें लिहीणें आणि येथून पाठवण्यांत येणाऱ्या मालाची नोंद करून हिशेब ठेवणें एवढीं कामें तुम्हांला करावीं लागतील. तुम्हीं जा आतां."

मिलिंदानें आपली अनुमति दर्शविली व किसनचे मनःपूर्वक आभार मानून तो जाण्यास निघाला. बंगल्याच्या पायऱ्या उतरत असतां मिलिंदानें एकवार मागें वळून पाहिलें, किसन खिन्न दृष्टीनें आपल्याकडेच पहात आहे हा 'चमत्कार' पाहून मिलिंदाला पुन्हा परत पहाण्याची इच्छा झाली नाहीं. आश्चर्यचकित होऊन तो आपल्या बिऱ्हाडाकडे निघाला.

मिलिंद निघून गेला तरी कितीवेळ किसन विचार करीत उभाच होता त्याच्या मनःचक्षुंपुढें फार जुन्या काळची स्मृति–चित्रें सरकूं लागलीं. त्या चित्रात फिकटपणा आणि तिखटपणा दोन्ही एकत्रित होती. स्मृति जितकी वृद्ध होते तितकीच ती तापदायक होते. कारण त्या स्मृतीचा रंगदारपणा जुनेंपणामुळें अनुभवतां येत नाहीं उलट आपल्या महत्वामुळें ती स्मृति नष्ट होत नाहीं. अशा दुहेरी स्थितींत सांपडून अंतःकरणाची स्थिति एखाद्या करवतीवर ठेवल्याप्रमाणें होते. त्या करवतीनें अंतःकरण कापलें जातें आणि सर्व दुःखाचा मोबदला म्हणून फोल उरते. मोठ्या प्रयासानें किसननें ती त्रासदायक स्मृति डोळ्याआड केली आणि विश्रांतीसाठीं तो आंत निघून गेला.

मिलिंद आपल्या बिऱ्हाडाकडे चालला होता. उन्हाचा कडाका मी म्हणत होता. बहुतेक मजूर जेवण करून विश्रांति करतां म्हणून लुटकले होते. विचाराच्या भरांत रस्ता चूकून मिलिंद दुसऱ्या गल्लीनें शिरला. ह्याच पट्टीला लक्ष्मी रहात असे. मिलिंदाच्या ध्यानीं लवकरच आपली चूक आली पण ती इष्टापत्तीच समजून लक्ष्मीच्या घरावरून गेल्यास तिचा शोध घेत-ल्यासारखें होईल ह्या विचारानें तो तसाच पुढें चालूं लागला. किसन विष-यींच्या त्याच्या आतांपर्यंतच्या विचारांना आपोआपच खंड पडला. लक्ष्मीच्या घराजवळ येतांच तो थबकला. त्याच्या कानावर पुढील शब्द आदळले. सदोबा मुक्ताफळें उधळीत होते आणि गरीब बिचारी लक्ष्मी नवऱ्याच्या त्या रत्नांचा आपल्या हृदयांत संचय करीत होती. कशावरून तरी कातवूंन सदोबा रागानें म्हणत होते, “मला पहिल्यापासून तुझें लक्षण दिसतंच आहे. म्हणून तर तुला इतक्या लांब आणली. ओळखीच्या माणसांत कधींच माझे तीनतेरा करून मोकळी झाली असतीस ! पण नाहीं. इथेंही तुझा धिंगाणा चालूंच आहे. शिनळकी करायची खोडच लागली. काय त्या पोऱ्याकडे एवढें निरखून पहात असतेस. तुझें गांठोडें आपल्या डोक्यावर त्यानें घेतलें म्हणून कांहीं तुझा नवरा तर नाहींना होत तो? त्याचा हात धरून तरी जा एकदांची म्हणजे माझे पितर आणि तुझे पितर दोघांचा नीट उद्धार होईल. नांव लक्ष्मी पण ढंग एखाद्या–”

पुढें मिलिंदाला ऐकवेना. लक्ष्मीचा चाललेला तो ' उद्धार ' त्याला सहन होईना. तिचें तें गृहसौख्य पाहून व ऐकून त्याचें अंत:करण भरून आलें. स्वतःच्या डोक्याला झालेल्या जखमेची त्याला विस्मृति झाली. तो तसाच पुढें सरकला. आपल्या प्रेमाची निराशा झाली म्हणून आपण रडतों--कढतों, आणि लक्ष्मी तिला कांहींच कां सुखाची अपेक्षा नसेल ? तिला असें वाटतच नसेल काय कीं आपल्या नवऱ्यानें आपल्याशीं प्रेमानें वागावें ? इतर सारे मजूर कोणी आपल्या पोराला खेळवण्यांत तर कुणी आपल्या ' कारभारणीशीं ' 'रंगमज' करण्यांत दंग असता, त्याच वेळीं लक्ष्मीच्या अंतःकरणाला जाळीत जाणारे शब्द ऐकण्याची पाळी तिच्यावर यावी ? ह्या विचारानें अत्यंत दुःख वाटून मिलिंद निरुपायानें आपल्या खोलीकडे चालला होता.

---

# प्रकरण ६ वें

## ' छळ '

" लक्ष्मी, चलतेसना बाई !"

एवढें म्हणून रंगूनें आपली पाटी डोक्यावर घेतली आणि ती लक्ष्मीच्या जवळ येऊन उभी राहिली. रंगूच्या हांकेबरोबर लक्ष्मीनें आपली पाटी डोक्यावर घेतली आणि दोघी बरोबर चालूं लागल्या. नव्यानें अंतःकरणें एकमेकांशीं मिळूं लागलीं म्हणजे बहुधा आपल्या प्रिय माणसाचा आणि त्याच्या गुणांचा विचार करीत रहाणें हाच नित्याचा व्यवसाय होऊन बसतो. रंगूच्या बाबतींत तसेंच झालें. लक्ष्मीकडे तिचें मन ओढ घेऊं लागल्यापासून कांहीं नवाच प्रकाश तिच्या मनांत पडत चालला. तिला दिवसानुदिवस लक्ष्मीचें वेड लागूं लागलें आणि लक्ष्मीच्या भक्तिमय गाण्यांत ती अधिकाधिक तन्मय होऊं लागली.

त्या दोघीजणी परत चालल्या होत्या त्यावेळीं सूर्य पश्चिमेकडे कलला होता. त्याची तिरपी किरणें हळूंहळूं आपल्या घराची वाट चालत

होतीं. दिवसाच्या कर्तव्यांतून मुक्त झाला अशा अर्थाचा सूचक दैदीप्यमान तेजानें संध्यावात मंद मंद वहात होता. उगवत्या चंद्रकोरीनें जग कसें मुग्ध होतें त्याचप्रमाणें दिवसभर आपल्या विश्वावर अंमल चालवणाऱ्या प्रतापी सूर्याचें मावळते वैभव पाहून जगावर एक प्रकारची मोहिनी पडते. त्या वैभवरत्नाची शेवटचीं किरणें एखाद्या सरांतील मोत्याप्रमाणें अंगावरून ओघळून जात असतांना एक प्रकारच्या निराशेची निशा सर्व जगभर पसरते. मंत्रमुग्ध स्थितींतून जागें व्हावें आणि सर्वस्व हिरावलें गेलें असा प्रत्यय यावा त्याप्रमाणें जगाची स्थिति होत होती. मावळत्या किरणांचा ताबा मोठ्या नाखुषीनें बिचारें जग सोडीत होतें. वाटेनें जातांना लक्ष्मीचें लक्ष वारंवार त्या मावळत्या रविकिरणांकडे जात होतें. अगदीं भोळेपणानें तिला आपलें वाटे कीं सूर्याचीं किरणें देवाकडे जातील. पृथ्वीवर दिवसभर राहून जर त्या किरणांना देवाकडे जातां येतें तर आपल्याला कां जातां येऊं नये ? अशी शंका तिला येई. धारेवरून जसें पाणी जातें, त्याचप्रमाणें आपले प्राण जर ह्या किरणांच्या मधून देवाच्या पायापाशीं ओघळून पडतील तर किती बरें होईल ! देवाचे पाय असतील तरी कसे ? सोन्याची नगरी आपल्या भक्त सुदामाला देणारा देव किती ऐश्वर्यसंपन्न असेल ? त्याच्या चरणीं कुबेराची धनदौलत लोळत असतां त्याचें लक्ष मात्र आपल्या गरीब भक्तांकडे नसावें ? त्या संपत्तीचा कांहींच हव्यास त्याला नसावा ?

आणि आपण—लक्ष्मीच्या मनांत असे तुटक विचार येत होते. इतक्यांत रंगू तिला म्हणाली, " लक्ष्मी—अशी मुकाट्यानें चाललीस तर सोबत कशी बरं व्हावी ? कांहीं तरी बोल. नाहीतर तोंडानें एखादें गाणें म्हण म्हणजे पाऊल जरा झपझप उचलेल ! अंधार पडत चालला आहे. बरोबरचीं माणसें केव्हांच पुढें गेलीं. "

त्यावर लक्ष्मी म्हणाली, " रंगूबाई, देवानें तुम्हांला कशी गोड वाणी दिली आहे. तुम्ही एकदां बोलूं लागलां म्हणजे आपलं ऐकतंच रहावसं वाटतं. तुम्ही बोलत असलां म्हणजे मग तुम्हांला थांबवून आपणच बोलायचं तें नाहीं मला बरं वाटत. तुम्ही आपल्या बोला, मी ऐकते. "

उसन्या अविर्भावानें रंगू म्हणाली, "हें ग काय तुझं लक्ष्मी—एखा-द्यार्शी अबोला धरल्यासारखं करायचं आणि वरती त्याला हिणवायचं. बरीच ग! पण मला कळतं बरं. मी तुझ्याशीं इतक्या ह्यानें वागतें तेंच मुळीं चुकतं. मला कां कळत नाहीं लक्ष्मी कीं तुझी माझी कांहीं बरोबरी नाहीं. पण काय करायचं बाई—एखाद्या माणसाला आपला हाच गुण. दुसऱ्याला आधीं वेड लावावें आणि मग बसावं तोंड मिटून! कर्म माझं दुसरं काय!"

लक्ष्मीला रंगूच्या त्या शब्दामुळें वाईट वाटलें, ती अगदीं आर्जवी स्वरांत म्हणाली, "असं कांहीं भलतंच नका बरं मनांत आणूं रंगूबाई! तुम्ही माझ्यावर एवढी माया करतां आणि मी तुमच्याशीं अबोला धरील असं कसं बरं मानतां! अशा परक्या ठिकाणीं माझ्यावर आईसारखें प्रेम करतां तुम्ही." लक्ष्मीला पुढें बोलवेचना. तिचा कंठ दाटून आला. आईची नुसत आठवण तिच्या सर्व शक्ति महिरून टाकण्यास समर्थ होती. रंगूनें एक निश्वास सोडला. आपल्या बोलण्याचा असा परिणाम व्हावा ह्याचें तिला मनःपूर्वक वाईट वाटलें. तिला स्वतःला पोरबाळ नव्हतें. मुलाबाळांचें कष्ट उपसून होणाऱ्या दुःखांत सुखाची सीमा असतें ह्याचा तिला अनुभव नव्हता. पोटचा गोळा दूर लोटायचा म्हणजे माउलीच्या जीवाला कसा पीळ पडतो ह्याची तिला जाणीव नव्हती. वत्सलतेच्या सर्व भाव—भावनांना ती बिचारी हतभागी स्त्री पारखी होती. कांचनद्वीपांत लक्ष्मी आल्यापासून मात्र रंगूच्या हृदयांतली वत्सलता हळू हळू जागृत होऊं लागली.

ज्याप्रमाणें दिवाकराच्या उदय—कालीं साऱ्या सृष्टींत, अवघ्या चरा-चरांत चैतन्याची एकच एक मधुर लकेर निनादत असते, त्याचप्रमाणें रंगूच्या अंतःकरणांत वत्सलतेचा उदय होण्यापूर्वी तिच्या रक्ताच्या प्रत्येक थेंबांतून प्रसन्न वृत्तीची उषा रसरंगानें नटून खेळूं लागली. लक्ष्मीच्या सान्निध्यांत रंगूला प्रथम नकळत आनंद होई. एखाद्या अर्भकाला आपल्या अस्तित्वाच्या अजाण जाणिवेनें जसा आनंद होतो तसाच आनंद रंगूला होत असे. कालचक्राच्या हरएक फेऱ्याबरोबर रंगूचें अंतःकरण लक्ष्मीकडे

अधिकाधिक निगडित होत चाललें आणि लवकरच त्या दोघींच्या मनांतलें अंतर पार नाहींसें झालें. आपल्या हृदयाचें असें बिनशर्त दान जरी रंगूनें केलें तरी लक्ष्मी मात्र आपल्या अधिष्ठानापासून चढली नाहीं. अकारण प्रेम करणाऱ्या रंगूचें ती मनःपूर्वक आभार मानी, फार काय आपल्या हातून त्या उपकाराची फेड व्हावी म्हणून ती प्रयत्नपूर्वक झटे पण रंगू-इतकें भावप्रवण तिचें हृदय होत नसे. संसाराच्या उन्हाळ्यांत वारंवार होरपळलें जाणारें तिचें हृदय शुष्क बनून गेलें होतें. भोंवतालच्या निकट-वर्ती जगांत आपण कुणावर मायाममता करावी असें वाटून त्याप्रमाणें वागण्याची तिची शक्ति नष्टप्राय झाली होती. आईबापावरचें तिचें प्रेम प्रेमाचे ते विषय जवळ नसल्यामुळें निरुपयोगी होऊन पडलें होतें. तिला आपल्या आईची आणि बापाची वारंवार आठवण होई. निरानिराळे प्रसंग तिच्या मनापुढें उभे रहात आणि प्रत्येक प्रसंगांत आईबापाची पाखर आपल्यावर आहे ह्याचा तिला प्रत्यय येई. प्रत्यक्ष भेटीचें सुख तिच्या नशिबीं नसलें तरी तिच्या आईबापानीं तिला आपली आठवण म्हणून दिलेली विठोबाची मूर्ति तिला सदोदित त्यांच्या उज्वल स्मृति--सुखांत ठेवी. आपल्या अत्यंत दरिद्री संसारांतून श्रद्धा व त्याग हीं दोनच रत्नें लक्ष्मीला तिच्या आईबापानीं अंदण म्हणून दिलीं होतीं. सुखाचा समय येतांच त्या सुखाचा त्याग करून लक्ष्मी सुखाचा उपभोग घेणारापेक्षां सुखी होई आणि दुःखाच्या वणव्यांत श्रद्धाजलाचें सिंचन करून ती सुरक्षित राही. लक्ष्मीला सचिंत करील असें कांहींच कारण नव्हतें. कारण ज्या मनाच्या चवचाल चाळ्यांनीं सुखदुःखाची भुतें निर्माण होतात तें तिचें मनच अत्यंत खंबीर होतें. आईबापांच्या स्नेहपूर्ण वृत्तीनें ओथंबलेले तिचें मन पतीच्या ‘ अलौकिक ’ वागण्यानें चलित झालें नाहीं.

पण दैवसुद्धां तिच्या श्रद्धेची व समाधाशक्तीच कसोटीच पहावयास सिद्ध झालें होतें. दैवानें आपला डाव टाकला. लक्ष्मीच्या हृदयाला हल-वील अशी एक नवीच काळजी आतां निर्माण झाली होती. रंगूला त्या काळजीच्या कारणाची पूर्ण जाणीव होती. आपल्या अल्प शक्तीप्रमाणें योग्यसमयीं रंगू तें कारण एक ‘ समारंभ ’ करून ‘ जाहीर ’ करणार होती. तें कारण म्हणजे लक्ष्मीचें गर्भारपण ! कांचनद्वीपांत आल्यानंतर

लवकरच ईश्वरानें लक्ष्मीला आपला कृपाप्रसाद दिला. जगाला विटलेली लक्ष्मी त्याच जगाशीं स्वत:च्या रक्तमांसानें जखडली जावी हाच तो दैवाचा आडवा डाव होय ! !

आपल्या भावी अपत्याबद्दल लक्ष्मीला काळजी वाटत होती त्याचें कारण लौकिक दृष्टीहून भिन्न होतें. स्वतःच्या आयुष्याचें भेसुर चित्रपुढें उभें राहून लक्ष्मी क्षण काल खिन्न होई. आपल्या पोटीं पुत्र ‘ रत्न ’ आलें आणि जर त्या रत्नाची ‘ प्रभा ’ आपल्या नवऱ्याबरहुकूम फांकली–त्या रत्नानें जगांत येऊन आपल्या नवऱ्यानें जसा आपल्या जीविताचा खेळखंडोबा केला, तसाच दुसऱ्या एखाद्या स्त्रीचें आयुष्य निःस्सार करण्याचा पराक्रम गाजवला तर एकापरीनें तशा नाशाला आपणच कारण होऊं असें लक्ष्मीला वाटे. आपल्यामुळें आपल्या आईबापांच्या डोळ्यांतून अश्रूंच्या धारा वहातात त्याचप्रमाणें आपल्या पोटीं येणाऱ्या त्या मुलामुळें एखाद्या मुलीचें व तिच्या आईबापाचें शिव्याशाप आपल्या माथीं बसणार ! त्याच्या उलट आपल्याला कन्या झाली तर आपल्या सारखीच तिची अवस्था होणार ! एकूण आपला एकटीचा जीव अनेकांच्या दुःखांना कारणीभूत होणार ! लक्ष्मीच्या मनांतील उद्वेगाचे विचार प्रबल होत आणि तिला वाटे अशा दुःखसंभवी जीवाचा नाश झाला तर–सहज तसा नाश होत नसेल तर थोड्याशा हालचालीनें, समजा एखादा गळफास लावून, अथवा समुद्राच्या अथांग पाण्यांत कायमची बुडी मारून तो जीव नाहींसा करावा! इतक्या साध्या गोष्टीनें जर पुढील दु:खें टळत असलीं तर आपण त्या जीवाचा लोभ कां धरावा ? पण आत्महत्येचे ते विचार लक्ष्मीच्या भाविक मनांत फार वेळ टिकत नसत. तिला लगेच आपल्या शांत आणि वत्सल मूर्तींची आठवण होई. त्यांचें शारिरिक अस्तित्व महाराष्ट्रांतल्या एका खेड्यांत होते. तरी त्यांचे प्राण पिलांची चुकामूक झालेल्या पांखरासारखें मनींच्या हुरहुरीनें लक्ष्मीभोंवतीं भिरभिर फिरत होते. तोंडानें पांडुरंगाचें भजन चालू असतां मनांत मुलीचें बालपणचें गोजिरवाणें रूप आठवून, तिच्या नाना तऱ्हेच्या आठवणी काढून ते बिचारे मनाचें समाधान करून घेत होते. अपत्य विरहाचें दुःख देवावर भरवंसा ठेवून व कधींतरी परमेश्वर आपली सुशील कन्या आपल्याला भेटवील, आपले प्राण परत आणून

देईल अशी श्रद्धा बाळगून ते कसे तरी दिवस कंठीत होते. त्यांच्या त्या निरतिशय श्रद्धेचा अदृश्य पण अचुक परिणाम लक्ष्मीच्या मनावर होई आणि तिचे बेफाम विचार जागींच थांबत. शिवाय तिच्या भाविक मनांत दुसराही एक प्रश्न उभा राही. देवानें दिलेला जीव चुरडून टाकण्याचा आपल्याला काय अधिकार ? सर्व बाजूंनीं निरुपयोगी वाटणाऱ्या गोष्टींतून देव सृष्टीची उभारणी करीत नाहीं कां ? देवाचे अगम्य हेतु आपल्याला कळलें नाहींत म्हणून आपण समूळ आपल्या जीवांचा नाशच करावा कां ? असें करण्यात देवाच्या देणगीचा विपर्यास करण्यांत देवाचा अपमान नाहीं कां होत ? शेवटच्या कल्पनेनें लक्ष्मी आपल्या अंतःकरणांत आत्महत्येच्या विचाराला मुळींच थारा देत नसे.

उपरोक्त परस्पर विरोधी आणि त्रासदायक विचारांत लक्ष्मी वाट चालत होती. रंगूला लक्ष्मीच्या अबोल स्वाभावाची पूर्ण जाणीव होती. रंगूला जरी असें पुष्कळ वाटत होतें कीं लक्ष्मीनें सारखें आपल्याशीं कांहीं तरी बोलत रहावें तरीही आपल्याला त्रास झालेला पुरवला पण लक्ष्मीला जर त्रास होत असेल तर तिनें बोलूं नये असेंच रंगूला वाटे. वाट संपत आली आणि लुकलुकणाऱ्या दिव्यांच्या किरणांचीं ओझरतीं दर्शनें होऊं लागलीं. दोघींच्या घराचे रस्ते फुटत होते त्या ठिकाणीं दोघी आल्या आणि रंगू म्हणाली "लक्ष्मी जाते मी" तो निरोप घेतांना रंगूची कष्टद मनःस्थिति पूर्णपणें दिसून येत होती. तिच्या मनाची भूक लक्ष्मीच्या प्रेमानें भागत होती पण तिची शारिरिक भूक तिला स्वतःच्या हातानेंच भागवावी लागत होती. लक्ष्मीनें मानेनें हो म्हटले आणि त्या दोघी आपापल्या घराकडे वळल्या. लक्ष्मी घरापाशीं येऊन पोहोंचली बाहेरच्या पडवींत सदोबा आणि इस्माईल एकमेकांशी हंसत बोलत होते. दोघांच्या गप्पा अगदीं रंगांत आल्या होत्या. घरात दुसरी वाट नसल्यामुळें लक्ष्मीला त्या दोघांच्या अंगावरूनच जावें लागलें. तिच्या डोक्यावरची जड पाटी उचलून खालीं ठेवायला तर सदोबा हललें नाहींतच पण तोंडानें म्हणालें, "खानसाहेब बघितलात आमच्या घरचा मामला ! नवरा वाढुळ अन्नाच्या नांवानं शंख करीत आहे आणि आमची माणसें गावचीं धुणीं धूत फिरताहेत" तें शब्द ऐकून इस्माईल कांहींच बोलला नाहीं. त्यानें एकदां हातांतले पत्ते पिचिलें आणि तें समो-

रासमोर अर्धें अर्धें मांडले. मांडणी होतांच तो म्हणाला, "हें पहा पाटील, वरच्या टोकाला जें पान आहे त्याच रंगाचें दुसरें पान जें असेल तें लक्षांत धरून मग पैसे लावायचे. पुन्हां पिसून पुन्हा पानें मांडायचीं पुन्हां पहिला रंग असेल त्याठिकाणच्या कोपऱ्यांतलें पान धरायचें आणि त्यावर पैसे लावायचे ! पहिल्या पाळीला दुप्पट दुसऱ्याला चौपट आठपट सोळापट ! मी सांगतों त्या युक्तीनें खेळाल तर लक्षाधीश व्हाल. आहांत कुठें ?" खरो-खरच सदोबाला वाटूं लागलें कीं आपण आहोंत तरी कुठें ? आपण ह्या चार आण्याच्या डावावर लक्षाधीश होणार तेव्हां काय आपली करामत ! सदोबाला असें होऊन गेलें कीं ह्या आपल्या 'सद्गुरूला कुठें ठेवावें आणि काय करावें'

इस्माईलसारख्या सत्पुरुषाचे उपकार जन्मजन्म आपल्या हातून फिट-णार नाहींत. तरी पण अल्पस्वल्प कां होईना आपण सेवा करावी. सदो-बानें आपल्या परमपूज्य गुरुला ' घरीं ' आणलें होतें आणि त्यानें आपल्या घरीं ' दोन घास ' खावे म्हणून त्याला आग्रह केला. लक्ष्मी घरीं आली तेव्हा कोणी पाहुणा जेवणार आहे ह्याची तिला कल्पनाच नव्हती. रोजच्यासारखा तिनें आपला दोन माणसांपुरता स्वयंपाक केला. तिनें नवऱ्याचें पान मांडलें. सदोबा आंत आले आणि चकित होऊन म्हणाले, " हें काय एकच पान मांडलें. तुझा बाप बाहेर बसला आहे त्याला नाहीं वाटतें जेवायचं. " तीं मुक्ताफळें ऐकून बिचारी लक्ष्मी काय बोलणार ! तिनें मुकाट्यानें दुसरें पान मांडलें. कांहीं कारण नसतां आपल्या बापाचा ' उद्धार ' व्हावा ह्याबद्दल तिला वाईट वाटलें. सदोबा आणि इस्माइल जेवायला बसले. लक्ष्मीनें एकच वाढ केली, आणि तोंडावरून पदर घेऊन एका बाजूला ती उभी राहिली. जेवण संपत आलीं तेव्हां सदोबा मोठ्या नम्रभावानें आपल्या गुरुजीस म्हणाले, " खानसाहेब-गरीबाच्या घरची मीठभाकर आहे. गोड मानून घ्या. संकोच करूं नका. तुमच्यासारख्या देवमाणसांचे पाय कशाला आमच्या घराला लागणार. म्हणून म्हणतों, पोटभर जेवा. अग एक चतकोर भाकरी वाढ पाहूं ह्यांना खानसाहेबाना !" लक्ष्मीची स्थिती मोठी चमत्कारिक झाली. आग्रहाच्या जेवणाला पुरेल इतकें अन्न तिनें शिजवलें नव्हतें. आणि नवऱ्यानें तर भक्कम जेवण कर-

णारा पाहुणा आयत्यावेळीं पानावर आणून बसवला. दुर्वासऋषीनें साध्वी द्रौपदीचें सत्व पहाण्याचा प्रयत्न केला तेव्हां श्रीकृष्णासारखा भाऊ पांडवासारखे प्रतापी नवरे तिच्या सत्वाचें रक्षण करण्याला सज्ज होते. कांचनद्वीपासारख्या मजुरांच्या वसाहतींत कोण कुणाचा भाऊ ! लक्ष्मीचा नवराच दुर्वास होऊन तिचें सत्व हरण करूं लागल्यावर तिनें तरी कोणाचा धांवा करावा. ती मुकाट्यानें उभी राहिली. सदोबा आपली मल्लीनाथी चालवीत म्हणाले, " आमच्या आधीं जेवण केलं वाटतं. राम राम-ही बायको आहे का लाव आहे. मारे देवाला गार्णी म्हणतं आणि नवऱ्याच्या आधीं अन्न फस्त करून टाकलं ! "

"माझी मात्र आज अब्रू गेली. जाऊं द्या." इतकें म्हणून सदोबा उठले. दोघांनीं हात धुतले आणि बाहेर पडवींत येऊन बसले. लक्ष्मीचा छळ हा असा चाले. घरांत नसेल त्या पदार्थाची मागणी करावयाची आणि तो न मिळाला कीं, संतापून साऱ्या घरभर गोंधळ घालायचा. आपण 'इतका' पैसा मिळवतो आणि अगदीं साधे जिन्नस आपल्याला आपल्या घरांत मिळूं नयेत ह्याचें सदोबाला मोठें नवल वाटे. आपला एवढा पैसा जातो कुठें आणि कसा ह्याचा सदोबाला उलगडा होत नसे. आपली बायको आपल्याला चोरून पैसा साठवीत असली पाहिजे असें सदोबाच्या मनानें घेतलें. स्वतःच उभारलेल्या आरोपाचे गुन्ह्यांत रूपांतर करून अपराधी लक्ष्मीला सदोबा यथाशक्ति शासन करीत. आजही आपल्या कपाळीं नवऱ्याच्या हातचा तोच 'सुख–प्रसंग' आहे हें लक्ष्मी जाणून होती.

सदोबानें तयार केलेल्या 'चिलमी'चा आस्वाद घेत असतां इस्माईल म्हणाला, " पाटील आज मोठा मजा आला बुवा. तुम्ही कांहीं म्हणा तुमच्या बायकोचा हात गोड ह्यांत शंका नाहीं. "

त्या स्तुतीनें कदाचित आपली बायको बिघडेल अशा कल्पनेनें नेहमीं इस्माईलच्या शब्दाला मान डोलवणारे सदोबा त्या शब्दांचा इनकार करून म्हणाले, ' छे छे. खानसाहेब तिच्या हाताला कुठली आली आहे गोडी. अहो जन्मभर तिच्या हातचा स्वयपाक मी खातों आहे ना पण मला एक दिवस कांहीं असं वाटलं नाहीं. तिच्या हाताला गोडी आहे असं म्हणण्यापेक्षां तुमच्या तोंडाला रुची आहे असं कां नाहीं म्हणत ! '

इस्माईल त्यावर कांहींच बोलला नाहीं. आपण बोलून गेलों त्याचा खरा अर्थ ह्या पशूच्या मठ्ठ डोक्यांत उतरत नाहीं ह्याबद्दल त्याला समाधान झाले. माणसाची पारख करण्यांत कुशल असलेल्या इस्माईलनें सदोबाचें पाणी जोखलें. त्याच्या मुखावर समाधानाची सूक्ष्म छटा पसरली. चिलमीचा अखेरचा बार भरून दोघेही जुगारीच्या अडयाकडे जाण्यास निघाले.

इकडे बिचारी लक्ष्मी मोठया संकटांत येऊन पडली. क्षुधेनें तिचें प्राण कासावीस होते. पण पुन्हां जेवण तयार करणें म्हणजे अधिकच कष्ट पडणार, शिवाय स्वत:विषयीं व आपल्या आईबापाविषयीं जी मुक्ताफळें सदोबांनीं परक्या पाहुण्यासमोर उधळलीं त्यामुळें तिचें मन पार विटून गेलें. ज्या अन्नाकरतां आपल्या आईबापांच्या नांवाला कमीपणा येतो तेंच अन्न कशाला पोटांत ढकला! एकवेळ अन्न पोटांत न गेलें तर कांहीं विशेष होत नाहीं ! शारीरिक दु:खाचे आणि भावनांचे संयमन करावयाला ती पूर्णपणें शिकली होती. तिनें सगळा पसारा आवरला आणि शांत मनानें हातीं आपल्या चिपळया घेऊन ती बसली. इतक्यांत रंगू आली. आल्याबरोबर अतिशय उत्सुकतेनें तिनें प्रश्न केला, "झालं जेवण !" आपल्या प्रश्नाचें उत्तर काय येणार ह्याची तिला पूर्ण अटकळ होती. तरीपण आपल्या कल्पनेच्याविरुद्ध उत्तर यावें अशी बलवत्तर इच्छा होती. लक्ष्मीच्या उत्तरावर तिनें आपल्या मनांतल्या कांहीं तरी कोडयाचें उत्तर ठरवून ठेवले होते. लक्ष्मीनें सहजपणें उत्तर दिलें, "होय." त्या दोनच अक्षरांनीं रंगू विव्हळ झाली. तिची अपेक्षा खरी ठरली पण त्यामुळें तिला अतोनात दु:ख झालें. तिनें एक निश्वास सोडला. किंचित् कांपऱ्या आवाजांत ती म्हणाली, "आज तुमच्या घरीं पाहुणा जेवायला होता. तरीसुद्धां स्वयंपाक होऊन तुमची जेवणंसुद्धां झाली !" नंतर किंचित् थट्टेच्या स्वरांत ती म्हणाली, "भारीच चपळ आहांत." तें ऐकून लक्ष्मीला वाईट वाटलें. आपण उगाच प्रतारणा करून आपली आस्थेनें चौकशी करणाऱ्या रंगूला खोटें सांगितलें. स्वतःची चूक दुरुस्त करण्याच्या इराद्यानें ती म्हणाली, "तसं नाहीं हो रंगूबाई" पण त्या शब्दांनीं रंगूचें समाधान झालें किंवा नाहीं हें कळणें कठीण आहे. रंगू त्यावर कांहींच बोलली नाहीं. ती लक्ष्मी-

कडे पहात तेथेंच बसली. लक्ष्मी उपाशी आहे ह्याबद्दल तिची खात्री झाली शारिरीक त्रासाविषयीं इतकी बेफिकीरी लक्ष्मीच्या मनांत कां असावी हें तिला कळत नव्हते. दुःखावर स्वतःच्या असीम शांतपणानें विजय मिळ-णाऱ्या लक्ष्मीचें दिव्यत्व तिला पुन्हां एकवार जोरानें पटलें. त्या दिव्य शक्तीला मूकवृत्तीनें आणि विनम्र भावानें मनांतच नमस्कार करून ती म्हणाली, "एवढं नको मनाला लावून घेऊंस. लक्ष्मी ! तुझ्याच मनांत नसलें जेवायचं तर कोण बरं तुला आग्रह करून जेवायला भाग पाडणार ! तुझ्या सारख्या माणसांच्या जिभेंत देवानें अमृताचा झरा ठेवलेला असतो. मग तुम्ही कशाला खाल भिकार अन्न? माझं ऐकत असलीस तर पहा. थोडा भात खा !" लक्ष्मीनें तिला पुन्हां नाहीं म्हटलें असतें तर त्यामुळें रंगूला अतिशय वाईट वाटलें असतें हे उघड आहे. रंगू थोडी थांबून म्हणाली, "समज लक्ष्मी तुझी आईच इथं असती तर तूं उपाशी आहेस हें कळून तिला काय बरं वाटलं असत? तुझी आई जरी येथून दूर असली तरी तिच्या पोटात ह्यावेळीं बघ तुटत असेल तुझी आठवण येऊन !" आतां लक्ष्मीला रंगूला नकार देणें शक्य नव्हते. तिनें पुन्हां चुलीला पेटत घातलें आणि भाताचें भांडे चुलीवर ठेवलें. रंगू तिला सोबत करीत होती आणि निरनि-राळ्या गोष्टी सांगून तिच्या मनाला विसर पाडावा म्हणून प्रयत्न करीत होती. लक्ष्मीला प्रथमच रंगूच्या गाढ प्रेमाची साक्ष पटली, आपली आई रंगूच्या रूपानें आपणाला आज भेटावी ह्या जाणीवेनें तिला नवऱ्यानें केलेला छळ उपकारकच वाटला. लक्ष्मीचें जेवण झालें. समाधानानें अंतःकरण भरून रंगू आपल्या घरीं जाण्यास निघाली.



# प्रकरण ७ वें

## ' स्मृति '

प्रेमाला हृद्रोग असें समजतात. प्रेम आणि रोग ह्यांच्यांत कांहीं साम्य आहे, ही कल्पना जर खरी धरली, तर तें साम्य कोणत्या प्रकारचें असावें ह्याविषयीं तर्कवितर्क करणें हें प्रेममूर्तीचा विचार करण्याइतकेंच रम्य ठरण्याचा संभव आहे. असाध्य रोगानें आणि अप्राप्त प्रेमानें मनुष्य सारखाच हताश होतो. रोगी माणसाचें सारें लक्ष त्या रोगाकडे व त्याच्या चढउतारावर असतें. प्रेमी मनुष्य नेहमीं आपल्या प्रेमविषयाचें चिंतन करण्यांत निमग्न असतो. कित्येक वेळां रोगांप्रमाणेंच प्रेमाला उतार पडत जातो. स्वानुभवानें मिलिंदाचे प्रेमाच्या बाबतींतले विचार वरीलप्रमाणें होते. त्याचें एका मुलीवर प्रेम जडलें. एखादा रोग जडावा त्याप्रमाणेंच तें प्रेमही जडलें. एका बाबतींत शरिराचा ढिलेपणा कारण होतो तर दुसऱ्या बाबतींत मनाचा कमकुवतपणा जबाबदार असतो. त्या मुलीचा व त्याचा वियोग होतांच मिलिंदाची प्रेमधुंदी उतरत चालली. कालचक्राचा एकेक फेरा फिरूं लागला तसतसा त्या विरहाचा तीक्ष्णपणा बोथट होत चालला. असें जरी होते तरी, शरीरांत ' घर ' करून राहिलेल्या एखाद्या कायम स्वरूपाच्या व्याधीप्रमाणें, अनुकूल परिस्थिति प्राप्त होतांच त्याच्या हृदयांतले ' प्रेम–जंतु ' जोर करीत. कुठल्याही गतदुःखाच्या स्मृतीइतकीच त्याची प्रेम–स्मृति त्याचें मन रिझवीत असे. आज सकाळीं उठल्यापासून त्याच्या मनांत ती स्मृति जागृत झाली आणि तिच्या नाजुक हालचालीनें मिलिंदाला हुरहुर वाटूं लागली. त्या स्मृतीची जड पावलें त्याच्या लुप्त भावनांच्या पाचोळ्यावर पडत चालली म्हणजे मिलिंदाचा जीव कासावीस होई. तो दिवस रविवारचा असल्यामुळें कामाला सुटीच होती. फक्त एकदां सकाळचें टपाल पाहिलें कीं त्या दिवसाचें काम संपलें. मिलिंद बाहेर पडला आणि आफिसांत जाऊन त्यानें टपाल पाहिलें. काम संपतांच थोडासा फेरफटका करून यावा ह्या उद्देशानें तो निघाला.

मुख्य मुख्य रस्त्याखेरीज ' फिरण्या ' करतां म्हणून कांचनद्वीपांत इतर

रस्ते तयार केलेले नव्हते. मात्र समुद्राच्या किनाऱ्याकडे जाण्याकरतां अनेक पाऊल वाटा पडलेल्या होत्या. तशा वाटापैकींच एक पसंत करून मिलिंद चालूं लागला. त्याचें मन जवळ जवळ शून्य होतें. पण थोडा वेळ गेल्यानंतर सभोंवारच्या सृष्टीनें त्याचें मन आपल्याकडे ओढून घेतलें, सकाळचा गार वारा सुटला होता पावसाळा संपत आला होता तरी एखादा दुसरा मेघखंड पहारेकऱ्याप्रमाणें ' आपल्या राज्यांत ' फेऱ्या घालीत होता. मध्येंच सूर्य झांकला जाई आणि त्यामुळें एके ठिकाणीं सावली तर दुसरीकडे ऊन असा चमत्कार पहावयाला मिळे. त्या दृश्याकडे पाहून मिलिंदाच्या मनांत ओझरतां विचार येऊन जाई. आयुष्य म्हणजे एक ऊनसावलीचा खेळ आहे. दुःखाच्या उन्हांतून सुखाच्या सावलींत जाण्याकरतां माणसाची सारखी धडपड चालूं असते. मिलिंद जसा आडवाटेनें जात होता तसेंच त्याचे विचारही त्याच्या मनाच्या भूमीवर आडवाटेनें फिरत होते. सृष्टीच्या साधेपणाचा मिलिंदाला केव्हां केव्हां चमत्कार वाटे. एखाद्या झाडाची डौलदार शाखा पुढें यावी आणि तिचा एकंदर झोंक असा दिसावा कीं ती जणूं स्वागतार्थ हात हालवीत आहे असें पहाणाराला वाटावें. जीवनानें फुललेल्या वृक्षाचें असें नयनमनोहर दृश्य दृष्टीला दिसतें ना दिसतें तोंच दूर अंतरावर उन्हांत असलेला पर्णहीन वृक्ष दिसावा. विरक्त योग्याप्रमाणें भस्मचर्चित अशी त्या वृक्षाची तपोमूर्ति पाहिली कीं मिलिंदाच्या मनांत नाना प्रकारचें विचार येत. रसहीन आयुष्य कंठण्याचें नशीबीं येणें म्हणजे दुर्दैवाची सीमाच होय. त्या वृक्षाची स्थिति किती केविलवाणी होती. वायूनें आपल्या मुठींतील धूळ त्या वृक्षाच्या अंगावर उडवून त्याची अवहेलना करावी. पावसानें सडसड अंग झोडपून काढावें. उललेल्या त्याच्या शरीरांत शिरून थंडीनें त्याला वेदना द्याव्या. चहूंकडून मानहानि आणि दुःख यांचाच नजराणा बिचाऱ्याच्या नशीबीं होता. त्या वृक्षाची अशी स्थिति कां व्हावी तें त्यागपूर्ण जीवन त्यानें कां कंठावें ? पानांच्या किलबिल आवाजाच्या संगीतांत आणि लतेच्या नाजुक आलिंगनांत वैभवपूर्ण जीवन घालवणें कोणीकडे आणि आजची स्थिती कोणीकडे ? निष्प्रेम आयुष्य इतकें भयंकर असत, इतकें खडतर असतें. मिलिंदाचे विचार वळले. थेट स्वतःकडे वळले. त्याच्या

अंतःकरणांतली प्रेममूर्ति त्याच्या मनःचक्षूपुढें उभी राहिली. त्याचें मन गतकाळाच्या स्मृति–पथावरून भटकूं लागलें. मनासारखा वेगवान प्रवासी नाहीं. त्या मनानें मिलिंदाला मुंबईच्या एका अगदीं गजबजलेल्या रस्त्यांत आणून सोडलें. गाडीघोडयांची गर्दी आणि माणसांची रहदारी यांतूनच तो आपला मार्ग आक्रमीत होता. आजूबाजूच्या कोलाहलाकडे त्याचें यत्किंचित्‌ही लक्ष नव्हतें. एका विशिष्ट व्यक्तीनें त्याचें लक्ष खेचून धरलें होतें. त्या तरुण मुलीच्या मागोमाग तो बेदिक्कत चालला होता. पायांत अडकून चालण्याचा त्रास होऊं नये म्हणून त्या मुलीनें आपले पातळाचे सोगे किंचित उचलून धरले होते. तिच्या किरमिजी रंगाच्या पातळाच्या चौकटी चुण्याचुण्या होऊन तिच्या दोन्ही पायांत इकडून तिकडे फिरकत होत्या. तिची चाल डौलदार होती. आईच्या पाठीशीं लाडिकपणें खेळणाऱ्या एखाद्या अल्लड बालिकेप्रमाणें तिच्या केंसाचा सैल अंबाडा मानेखालीं लोंबत होता. कानावरून वळसा घेणारे केस आणि त्याच्याच खालीं कानांच्या चाफ्यावर शोभणारी टपोऱ्या मोत्यांची कुडीं ह्यामुळें तिचें मुग्ध सौंदर्य अधिकच खुलून दिसत होतें. तिचे गाल–एक कीं दोन अनेक आकर्षणांनीं मिलिंदाचें मन त्या ‘ रमे ’च्या पायांत घोटाळत होतें. तिच्या प्रेमकटाक्षाकरतां त्याचा जीव वेडावला होता. तो झरझर चालूं लागला. त्यानें तिला उजवी घातली. किंचित्‌ मान वर करून कलत्या नजरेनें त्यानें तिच्याकडे पाहिलें. त्याला वाटलें कीं तिलाही आपल्या वर्तनामुळें बरें वाटलें असावें. निदान तिला राग आला नाहीं हें खासच ! आपली अवनत दृष्टि तिनें किंचित्‌ उचलून मिलिंदाकडे पाहिलें. त्या पापण्यांच्या उघडझापींत सगळ्या सृष्टीची उलथापालथ झाली. मिलिंदाच्या हृदयाला गुदगुल्या झाल्या. त्याचें सगळें शरीर आनंदानें उत्साहानें तुफान होऊन हेलकावे खाऊं लागलें. त्याची दृष्टी तरळूं लागली. एका रमणीनें आपणाकडे कटाक्ष टाकला–काय गोष्ट आहे ! मिलिंदाची छाती गर्वभरानें फुलून गेली.

स्मृतीनें मिलिंदाला दुसऱ्या रस्त्याला नेलें. कोलंबसाला अमेरिका सांपडल्याचा काय आनंद झाला असेल त्यापेक्षां कितीतरी पटीनें अधिक आनंद मिलिंदाला झाला. त्यानें अफाट मुंबईत एके दिवशीं एक मोठा ‘ शोध ’ लावला होता. अगदीं अचानकपणें त्याला ‘ तिचें ’ घर सांपडलें. झालें.

नवी बाहुली मिळाली म्हणजे एखादें मूल जसें प्रथम सदासर्वकाळ त्या बाहुली बरोबर खेळण्यांतच रमून जातें तीच स्थिति मिलिंदाची झाली. फावल्या वेळीं आपल्या प्रेम-मूर्तीच्या वसतिस्थानावरून 'चकरा' मारणें हा एकच उद्योग त्याला झाला. काळ-वेळाच्या रूढ बंधनानें त्याचें वर्तन कधींच बांधलें गेलें नाहीं. त्याच्या त्या 'सफरींत' मिलिंदाला निरनिराळया 'रत्नांचा' लाभ झाला. केव्हां ओझरतें दर्शन व्हावें तर केव्हां दर्शनावांचून नुसता 'तिचा' शब्दच ऐकूं यावा. अशा वेळीं सर्व प्राण कानांत गोळा होऊन बसत. केव्हां त्या दौऱ्यात त्याला बिलकूल यश येऊं नये. अशा वेळीं 'रिझर्व फंड' उपयोगांत आणून त्याला गुजराण करावी लागे. एकदां मात्र त्याला अनपेक्षित यश आलें. तो प्रसंग असा.

दुपारची वेळ होती. उन्हानें नुसता कहर उडवला होता तरी अंतःकरणांत धुमसणाऱ्या प्रेम—वन्हीनें बाह्य तापाचें मिलिंदाला कांहींच वाटत नव्हते. त्यानें आपला अर्ध्या बाह्याचा शर्ट घातला. निष्काळजीपणानें टोपी डोक्यावर 'ठेवून' दिली, हातांत बारीक छडी घेतली आणि तो घराबाहेर पडला. का कुणास ठाऊक पण त्याला पान खाण्याची लहर लागली. एका पानपट्टीच्या दुकानासमोर येऊन तो थांबला. पानवाल्यास 'एक पान-सुका कात' एवढें सांगतांच तो पानवाला पान तयार करूं लागला. मिलिंदाचें लक्ष सहजच समोरच्या आरशांत गेलें. त्याच्या तोंडून न कळत आश्चर्याचा एक उद्गार निघाला. आरशांतल्या स्वतःच्या प्रतिबिंबावर मिलिंद एकदम खूष झाला. किंचित् मागें सरून बसलेली ती टोपी तिच्या बाजूला कपाळाला शोभा आणणारा कुरळया केसांचा झुबका, त्या रेखीव भुवया, उन्हानें लाल झालेला चेहेरा सदऱ्याच्या बाह्यांतून दिसणारें गोंडस हात असा एकंदर थाट पाहून त्याला फार समाधान झालें. त्याला अगदीं मनःपूर्वक वाटलें कीं आपल्या ह्या 'वैभवांत' 'तिनें' आपल्याला पाहिलें तर ? तो तिच्या घराकडे वळला. दैव जणूं कांहीं त्याला संधी देण्याला टपूनच बसलें होतें. दुरूनच त्याला तिची मूर्ति दिसली. बाहेरच्या सज्ज्यांत ती पाठमोरी बसली होती. दुपारची वेळ असल्यामुळें चाळींत सर्वत्र शांतता दिसत होती. मिलिंदाला वाटलें कीं अशा भर मध्यान्हीं आपला नशीबाचा तारा अनुकूल असलाच पाहिजे.

' ती जर आपल्याशीं बोलेल तर '–कल्पना त्याच्या कानांत प्रीतीचीं गीतें गुणगुणूं लागली. तो चाळीच्या समोर जाऊन उभा राहिला. कुणाची तरी चाहूल लागून तिनें वळून पाहिलें. तिचे गोल डोळे मिलिंदकडे क्षणकाल पहात राहिले. तिचे ओंठ किंचित् विगलीत झाले. त्याला वाटलें तिनें आपल्याकडे पाहून स्मित केलें. पण छे ! उगीच मनाची फसवणूक नको ! ती खरोखरच आपल्याकडे पाहून हंसली असेल तर तोच प्रयोग पुन्हां एकवार करून पहावा म्हणजे नक्की समजेल. तो दोन पावले पुढें सरकला. हातांतल्या छडीचा हवेवर वार करून त्यानें बारीक ' गुं गुं ' असा आवाज काढला. त्या कृत्रिम ' मधु गानानें ' तिचें लक्ष पुन्हां वेधलें, तिनें त्याच्याकडे पाहिलें. त्यानें तिच्या नजरेला नजर दिली. ती उठून उभी राहिली मिलिंदाच्या काळजानें ठाव सोडला. त्यानें मान खाली घातली. एका कुलीन कुमारिकेशीं आपण हें अयोग्य वर्तन तर करीत नाहीं ना अशा शंकेनें त्याला शरम वाटली. सत्याचा कटु संदेश सांगणारा तो क्षण निघून गेला.

मनांत नाचणार उन्माद फिरून एकवार प्रबल झाला त्याच्या उसळीसरसें त्यानें वर पाहिलें. ती तेथें नव्हती. मनांतल्या मनांत तो खजील झाला. आशा निराशेच्या आंदोलनानें तो मूढ बनला तो जाण्याकरितां निघाला. त्यानें एक दोन पावले टाकली इतक्यांत दार वाजलें. त्यानें पुन्हां वर पाहिलें. ती दारांतच उभी होती आणि अनिमिष नेत्रांनीं त्याच्याकडेच पहात होती.

धन्य, धन्य, त्रिवार धन्य ! मिलिंद आपल्या त्या अलौकिक विजयानें बेहोष झाला होता आलेलें आणि हृदयांत साठवलेलें यश पुन्हां हिरावलें जाऊं नये म्हणून मागें न पहातां तो तडक चालूं लागला.

तो दिवस ! त्या दिवसाचें महात्म्य काय वर्णावें ! मिलिंदाला अस्मान् ठेंगणें झालें. कुणाजवळ तरी आनंद सांगावा आणि अशा रीतीनें दाम दुप्पट करून घेऊन त्या आनंदाच्या सागरांत यथेच्छ डुंबावें असें त्याला वाटलें. पण पुन्हां त्याच्या मनांत आलें कीं अशा वेळीं जाऊन कुणाच्या दुपारच्या झोपेचा कशाला भंग करा ! शिवाय दुसरी एक अडचण होतीच. आपण एखाद्या मित्राला आपला हा विजय सांगितला आणि त्याला त्याचें

कांहीं वाटलें नाहीं—कुठल्याच संवेदनेनें त्याचें चित्त हाललें नाहीं—तर, तर आपला उगीच विरस व्हायचा. छे छे अशा शुभ घटीला असा अपशकून नाहीं उपयोगीं ! ह्यावेळीं म्हणजे कसा आपल्याला पाठीवर घेऊन वाऱ्यावर नाचणारा एखादा जिगरदोस्त हवा ! हो, असेंच करावयाचें. तो विचार मिलिंदाला सर्वोत्कृष्ट वाटला. दुःखांत जसा माणसाला एकांतच प्रिय होतो तद्वतच कांहीं कांहीं प्रकारचा आनंद एकांतांतच उपभोगावा असेंच त्याला वाटलें.

मिलिंदानें तडक समुद्राचा रस्ता धरला आणि वाळवंट तुडवीत जाऊन एक दगडाची रास पाहून त्यानें आपला तळ तेथें दिला. समोर लांबवर समुद्राचें निळें पाणी दुपारच्या उन्हांत चमकत होतें. सागराच्या निळ्या रंगांतून मिलिंदाला आपल्या प्रेममूर्तीच्या निष्पाप नजरेंतला निळेपणा दिसूं लागला. समुद्राच्या चिमुकल्या लाटा दुडदुड धांवत येऊन दगडाला मिठी मारीत होत्या. दगडावर आपटणाऱ्या लाटाचा पांढरा स्वच्छ फेस पाहून त्या चिमुकल्या जीवाचा जणूं कांहीं तो यशध्वजच असावा असें त्याला वाटे. परदेशाचा किनारा पाहून आलेला सागर त्या चिमुकल्या लाटांच्या मुखानें आपल्या प्रवासांतल्या गमती पृथ्वीला सांगत होता. सागराच्या वृत्तीशीं मिलिंद हळूहळू समरस होऊं लागला. त्याला न कळत त्याचें मन भावनेंच्या भरांतून काव्याच्या ओळींत उतरूं लागलें. आजपर्यंत त्यानें काव्य पंक्ति जुळवल्या नव्हत्या. तरीपण प्रेम जसें सांगून येत नाहीं, संकट जसें इशारा देत नाहीं, त्याचप्रमाणें हृदयांत प्रतिमासुद्धां चोरट्या पावलांनींच आपला प्रवेश करते. परमेश्वरी कृपेच्या पावलांचा हळुवार मार अंतःकरणाला गुदगुल्या करतो. मिलिंदाच्या तोंडून स्वयंस्फूर्तीनें कांहीं ओळी बाहेर पडल्या. त्यावेळेपुरती त्या ओळींना त्याची त्यानेंच नीट 'चाल' लावली. आपल्या त्या पहिल्याच 'अपत्याच्या' स्मृतीनें मिलिंदाला आज सुद्धां वात्सल्याची उकळी आली. त्याला वाटतें की जिभेच्या पाळण्यांत घालून आपल्या त्या वाङ्मय अपत्याला पुन्हां खेळवावें. ओठांचे दोर दलवून तो गाण्याचा झोंका देऊं लागला. अंधुक आठवणीच्या धुक्यांत त्याचें अपत्य चुकलें. हताश होऊन मिलिंद अर्धवट राहिलेल्या स्मरणींचें मणी ओढूं लागला. मिलिंद गुणगुणूं लागला.

स्मित हास्य तियेचें। जिकडे तिकडे। दाही दिशांना तेज पडे।
क्षणभर हासे। क्षणभर भासे। दिसे दिव्य शांतता चहूंकडे।

मिलिंदाचे 'खंडकाव्य' अपुरें राहिलें. त्याची प्रतिभा गुप्त झाली. भरण संपताच जाते थांबले त्याप्रमाणें त्याचें गाणें थांबले. त्याच्या गोड विचारांना खंड पडला. पूर्वस्मृतींच्या निशेतून तो जागा झाला. फिरत फिरत तो समुद्राच्या काठानें चालला होता. एकवेळ समुद्राच्याच एका काठांशीं त्याची प्रतिभा जागी झाली होती. आज त्याच समुद्राच्या दुसऱ्या काठांवर त्यानें तिला अंगाई म्हटली. कित्येक दिवसांनीं प्रेमाचे विचार विकार त्याच्या मनांत उसळले. त्यांचा भर होता तोंपर्यंत मिलिंद असहाय्य होऊन ते नेतील तिकडे जात होता. स्मृतीची झूल चढवून स्वत:ला सजवण्याचा त्या विचारांनीं प्रयत्न केला. त्यांच्या जिव्हाग्रीं असणाऱ्या एका मधु-बिंदूच्या लालचीनें मिलिंद वेडावून गेला. पण थोड्याच वेळांत कांचन द्वीपांतल्या भेसूर परिस्थितीनें ती स्मृतीचीं आवरणें फाडून काढलीं. मिलिंदाचें प्रेम-विचार कुठल्याकुठें विलीन झाले. सत्य-सूर्याचा प्रकाश पडूं लागला. मिलिंदाच्या डोळ्यासमोर एक धीरगंभीर मूर्ति दिसूं लागली.

लक्ष्मी! तिची आठवण होतांच मिलिंदाचें हृदय थरथर कांपूं लागलें. तिचा होत असलेला अमानुष छळ आणि परमावधीच्या दु:खांत शांत समाधानानें तो छळ सहन करणारी तिची त्याग मूर्ति ह्यांचा एक समुच्चयानें विचार मनांत येऊन मिलिंद शरमला. त्याला तीव्र पश्चात्ताप झाला. बेचैन झालेले मन त्याला चाबकाचे फटकारे मारून त्याला सांगूं लागलें, किती मूर्ख किती स्वयंमन्य, किती स्वार्थसाधू तूं! चौकटीचें पातळ आणि गोरेगोरे पाय पाहून तुझें मन तिथें घोंटाळलें. एखाद्या उलू माणसासारखा 'प्रेम-प्रणय' करीत तूं आयुष्य घालवलेंस! आपलें मन आपले विकार ह्यांनाच जणूं तूं जगांतलें सार्वभौमत्व दिलेंस. दु:खानें पिडलेल्या जगाविषयीं तूं बेफिकीर झालास. स्वत:च्या कल्पनेनें उभारलेल्या पोकळ बुडबुड्यांत स्वत:ला बुडवून घेतलेंस. त्या रंगी बेरंगी आवरणांत स्वत:ला झांकून घेतलेंस. लक्ष्मीसारख्या मायबहिणी पशूंपेक्षांही नीचतेनें वागवल्या जातात त्याची दखल तुला वाटली नाहीं. फार काय जगांत जीवन इतकें

खडतर असेल ह्याची तुला कल्पनाही झाली नाहीं. एखाद्या जुलमी राजा-प्रमाणें आपल्या आनंदाचा जुलूम जगावर तूं केलास. तूं गुन्हेगार असून अहंमन्य सावाप्रमाणें मिरवतोस ! बाहुला बाहुलीच्या प्रेमाचें जोगवण करीत बसतोस. केवढा लाचारपणा—किती शरमेची गोष्ट !

आत्मप्रत्ययाच्या त्या फटकाऱ्यांनीं मिलिंद घायाळ झाला. जिवाचा भयंकर कोंडमारा होत आहे असें त्याला वाटलें. अश्रूरूपानें जर मनांतल्या संतापाला, मिंधेपणाला मोकळी वाट मिळेल तर किती बरें होईल. पण अश्रूमोचनाचें तें सुख त्याच्या नशीबीं नव्हतें. त्याचें दैव त्याला जड अंतः-करणाचा भार वहावयाला लावीत होतें. इतकेंच नव्हे तर तो अंतःकरणाचा भार सारखा वर्धमान होत होता. दिवसागणिक लक्ष्मीच्या जीवनांतली कटुता त्याला असह्य होत होती. अतिशय खिन्न होऊन तो मनाशीं म्हणाला, ' हें चक्र थांबणार तरी केव्हां ? '

निराशेचा टोला सहन न होऊन तो तेथेंच बसला, आणि अंतःकरणां-तल्या निरुत्साहाप्रमाणेंच दूरवर पसरलेल्या अथांग जलराशीकडे अन्य दृष्टीनें पाहूं लागला.

सागराची धडपड चालूंच होती. मिलिंदासारखे कोट्यावधी जीव आणि त्यांच्या निराशा त्या सागरानें पाहिल्या होत्या. खुळेपणानें रडणाऱ्या मान-वाकडे पाहून तो सागर उपहासानें हसत होता. सभोंवतालची सृष्टी प्रसन्न रहावी सुखी रहावी म्हणून स्वतःच्या अंगाची वाफ करून तो आपली त्याग-वृत्ति आचरीत होता. संकुचित दृष्टीच्या मानवाला सागराचा अलौ-लिक त्याग दिसत होता कां ?



# प्रकरण ८ वें

## ' भयंकर रात्र '

किसनला बादशहा हें उपपद एकापेक्षां अनेक अर्थानें लागत असे. त्याच्या ऐश्वर्याप्रमाणेंच त्याच्या लहरी अनेक प्रकारच्या होत्या. कांचनद्वीपांत तो आपली वाटेल ती लहर पुरवून घेत असे. गजांत वैभवांत फिरावें अशी त्याला लहर लागली कीं एखाद्या राजाप्रमाणें पोषाख करून तो खरोखरच हत्तीवरून स्वतःची मिरवणूक काढी. एका विशिष्ट दिवशीं तर तो सगळ्या मजूरांना सुटी देई. कुठल्या तरी एका प्रसंगाचा वाढदिवस तो साजरा करी. सगळ्या कांचनद्वीपांत तो दिवस उत्सावानें साजरा करण्याची सक्ती केली जाई. तेथें सुखांचा जुलूम होई तो असा. त्या एकाच दिवसाकरतां आपली दोन दिवसांची मजुरी खर्चावी लागे. अर्थात पुढील दोन दिवस अर्धपोटीं अथवा उपाशीं पोटीं मजुरांना काम करावें लागे. मजुरांचा छळ करण्याचे किसनचे अनेक मार्ग असून त्यांपैकींच हा एक होता.

कित्येक वेळां एखाद्या भणंगाचा पोषाख करून किसन रात्रीं मजुरांच्या वस्तींतून फिरे. प्रत्येक घरांतून निघणाऱ्या असमाधानाच्या आणि दुःखाच्या निश्वासांनीं त्याच्या मनाला ब्रह्मानंद होई. आपला तळहात उघडून तो पाही. मोठ्या ऐटीनें हातावर असलेल्या 'मत्स्या'कडे पहात तो पुढें चालूं लागे. हातावरच्या रेषांनीं आणि खगोलांतल्या नक्षत्रांनीं ऐश्वर्याची गंगा किसनच्या मस्तकावर आणून आदळली होती. गंगाधराप्रमाणें त्यानें त्या गंगेचा धक्का सहन केला होता. लवकरच आपल्या कर्तबगारीनें आपण त्या ऐश्वर्याला पूर्णपणें लायक आहोंत हें जगाला त्यानें पटवून दिलें होतें. अंगठींतल्या खड्याप्रमाणें राज्य असावें असें म्हणतात. किसनचें कांचनद्वीप तसेंच होतें. नजरेच्या टापूंत मावेल इतकाच कांचनद्वीपाचा विस्तार होता.

रात्रीचा अंमल पूर्णपणें सुरू झाला होता. आकाशाच्या व्यापक पसाऱ्या-

मध्यें नक्षत्राचें दर्शन कुठेंच होत नव्हतें. वाऱ्यानेंसुद्धां कुठें तरी पळ काढला होता. सगळी हवा कुंद झाली होती. आपल्या दिवाणखान्याला लागून असलेल्या एका लहानशा खोलींत किसन 'वेषांतर' करीत होता. सर्वांगाला पूर्णपणें झांकून टाकीत असा एक काळा बुरखा सर्व अंगाभोंवतीं त्यानें लपेटून घेतला, कमरबदांत दोन पिस्तुलें भरून स्वसंरक्षाकरतां त्यानें ठेवून दिलीं; आणि घरांतून तो बाहेर पडला. वाड्यांत जिकडे तिकडे शांतता होती. मुख्य दरवाज्याला कुलुप लावलें आहे कीं नाहीं हें त्यानें पाहिलें. नंतर वाडयाला उजवी घेऊन तो पूर्वी वर्णन केलेल्या उच्छावासा जवळ आला. एका लोखंडी गजानें त्यानें वरचें झांकण उचलून बाजूला ठेवलें. खिशांतला चोर–दिवा काढून त्याचा प्रकाश त्यानें पाडला. आंतल्या बाजूला पायऱ्या दिसत होत्या. तो खालीं उतरूं लागला. थोडयाच वेळांत उघडें असलेलें दार लावलें गेलें. किसन गुप्त मार्गानें वाडयाच्या बाहेर पडला. सगळ्या वाडयाच्या वाटेला बाहेरच्या बाजूनें त्यानें एक प्रदक्षणा घातली. नंतर तो मजूरांच्या वस्तीकडे वळला. त्यानें चालतां चालतां एकदां वर पाहिलें. आकाशांत मेघांची गर्दी जमत चालली होती. 'ठीक आहे.' एवढेंच शब्द अगदीं ओठांतल्या ओठांत पुटपुटून तो चालूं लागला.

थोड्या वेळानें तो एका पत्र्याच्या झोपडीजवळ आला. आंतून खूप मोठा गलबला बाहेर ऐकूं येत होता. हास्य, विकट हास्य, कडाक्याची भांडणें, भेसूर आरोळया असे भिन्न ध्वनी आळीपाळीनें येत होते. क्षणभर अगदीं मृतकळा आल्याप्रमाणें सर्वच शांत होई. नंतर पुन्हां एकदम स्फोट होई आणि पूर्वी निघालेल्या 'आवाजाची' सुधारून वाढवलेली आवृत्ति 'प्रसिद्ध' होई. संसारांतलें अमृत आणि विष त्या कोलाहलांतून वहात होतें. किसन एका पत्र्याच्या फटींतून आंतला प्रकार पाहूं लागला. आंतील दृश्य पाहून त्याच्या मुद्रेवर समाधान विलसूं लागलें.

एका मोठ्या मेजाच्या बाजूनें सात आठ मंडळी हातांत पत्ते घेऊन बसलीं होती. सर्वांचे एका फार मोठया राष्ट्रीय हिताच्या प्रश्नासंबंधीं अगदीं एकमत होतें. श्रीमंत होण्याकरतां जुगार खेळावें. हें सर्वांना पूर्णपणें तत्वशः व अक्षरशः पटलें होतें. आणि तपशीलवार ते तो कार्यक्रम अंमलांत आणीत होते. तेथें जमलेले बहुतेक जण सव्यसाची होतें. पत्त्याखेरीज प्रत्येकाजवळ कर-

मणुकीचें असें दुसरें एकेक स्वतंत्र साधन होतें. कुणाजवळ खाकी विड्यांचें बंडल पडलें होतें. देशी उद्योगधंद्याचें महत्त्व पटावें म्हणून आपल्या मित्र-मंडळींना तो उद्योगप्रिय एकेक बिडी देई. तर किंचित् तामसी वृत्तीचें बहाद्दर देशी उद्योगधंदे वाढावेत म्हणून विध्वंसक मार्गानें जाऊन विलायती ' सीझर 'ची पेटी आंतील पांढऱ्या विड्या ' पिऊन ' खलास करीत. पूर्वापार चालत आलेले वैभव जतन करून ठेवण्याच्या दिव्य महत्वाकांक्षेनें एखादा हौशी गडी ' चंची ' बाळगून होता. एखाद्या पंचहत्यान्या-प्रमाणें त्याच्या ' चंचींतील ' सर्व साहित्य सदासिद्ध असे व त्या त्याच्या सिद्ध–साहित्यानें तो आपली ' साहित्य–सम्राट ' होण्याची लायकी पटवून देत होता. व्यसनांत सुद्धां पक्षभेद करून पानतंबाखूच्या मवाळ व्यसनांपेक्षां स्वतःची ' उन्नति ' करणारे मदिरेसारखे जहाल व्यसन स्वीकारून कुणी आपल्या राजकारणाचा डंका पिटीत होतें. त्या सर्वांच्यावर ताण व एकमेवाद्वितीय असें सदोबा ' भगवान शंकरा ' चा ' रक्षा पंथ ' स्वीकारून गांजा परंपरेचे अध्वेर्यु बनले होते.

इस्माइलनें पत्ते पिंचले आणि वाटले. डाव सुरू झाला. प्रत्येकजण आपल्या व्यसनांचा यथाशक्ति आणि पूर्णभक्ति समाचार घेत घेत डाव खेळत होता. व्यसनांचा अंमल होतांच. शिवाय जुगारांत पैसे कमावून दारिद्य गमावण्याच्या ईर्षेचा अंमल प्रत्येकावर होता. अशा प्रकारच्या ' द्विसत्ताक राज्यपद्धतीच्या ' अमदानींत तो डाव रंगत होता. तशाही प्रलयकालच्या स्थितींत आपापले डोकें चालवून प्रत्येक गडी आपली शिकस्त करीत होता. कुणी कुणी बहादूरांनीं आपला ' पराक्रम ' पाहून आपल्या मागें आपलें व्रत अखंड चालवावें म्हणून आतांपासूनच मोफत शिक्षण देण्याकरतां आपली बाल–पिढी येथें आणली होती. तीं मुलेंही आपल्या ' बापजाद्यांचा ' पराक्रम लक्षपूर्वक पहात होतीं. स्वकुलाच्या अभिमानानें रक्तपात होईपर्यंत त्या बालवीरांत मारामाऱ्या झडत. सर्व देशच्यादेश एकाच कार्यक्रमाचा अंगीकार करून कार्य करूं लागल्याचा भास कांहीं वेळां उत्पन्न होत होता. बाप आणि मुलगा खांद्याला खांदा देऊन लढूं लागत. डावाची अखेर जवळ येत चालली. ईर्षा, द्वेष चढत चालले. रौद्ररसाचा प्रारंभ होणार असा रंग दिसूं लागला. प्रत्येक बाजूचे मार्क मोजले गेले.

पैसे वाटले गेले. सदोबाच्या वाटणीला दोन पैसे आले. गडी तेवढ्यांतच खूष होता. ज्याप्रमाणें हुषारीबद्दल बक्षीस मिळालें तर त्या बक्षीसाच्या आर्थिक किंमतीकडे लक्ष द्यावयाचें नाहीं तद्वतच जुगारांत किती पैसे मिळाले हा मुद्दा नसून जुगार खेळून पैसे मिळाले हीच महत्वाची गोष्ट मानायची असते. बहुतेक पैसे इस्माईलच्या बाजूला गेले. नाहीं तरी तो सगळ्या तेथें जमलेल्या खेळणारांचा गुरूच होता. इस्माईलनें सदोबाला डोळ्यानें खूण केली. 'धीर धर' एवढाच त्या खुणेचा अर्थ होता. सदोबा खंबीर होतेच. एक डाव संपून दुसरा पुन्हां सुरू झाला.

किसन तो सर्व प्रकार पहात होता. आपल्याच पायांनीं नाशाकडे चालत जाणाऱ्या मजुरांची ती धडपड पाहून त्याचें मनोरंजन होत होतें. त्याचें मन सदोबांच्या लीलांनीं वेधलें गेलें. पूर्वस्मृतीच्या अगदीं खोल दालनांत एका लहान मुलाची मूर्त किसनला दिसूं लागली. 'चहा'करतांना त्या मुलानें धारण केलेला रुद्रावतार आपणांला पहातांक्षणींच खाडकन् उतरला आणि त्याची भयंकर त्रेधा उडाली तो प्रसंग आठवून किसनला हंसू आलें. त्यानंतरची रात्र—! पूर्वस्मृतीचें तें दालन त्यानें झटकन् बंद केलें. स्मृतीरूपानें सुद्धां त्या रात्रीचा पुन्हां अनुभव घेण्याची त्याला भीति वाटत होती.

जुगाराच्या अड्ड्यापासून कांहीं अंतर चालून गेल्यावर किसननें एक शीळ घातली. त्या शिळेचा आवाज ऐकताच इस्माईल पत्ते अर्धेच टाकून उठला. तो धांवतच किसनजवळ आला. आपल्या ठरावीक अदबीनें किसनला त्यानें मुजरा केला. किसननें आपला हात पुढें केला. इस्माईलनें मुकाट्यानें एक पिशवी किसनच्या हातीं दिली. मजुरांनीं जिवापाड श्रम करून मिळविलेला पैसा अशा तऱ्हेनें-जुगाराच्या आडमार्गानें-पुन्हां किसनच्या तिजोरींत जाऊन पडत असे. अंधार दाट पसरला होता. त्या अंधःकारांतच मजुरांच्या रक्तशोषणाचें अमानुष कार्य उरकलें गेलें. लोकोपयोगी म्हणून दारूचे गुत्ते उघडले जावेत. सर्व प्रकारचे कर माफ असलेल्या लोकांनीं त्या ठिकाणीं जाऊन दारू प्यावी आणि स्वखुषीनें, माफ झालेला कर अन्य स्वरूपांत भरावा. किती अलौकिक करग्रहण हें ! तसलीच अजब युक्ति किसननें अंमलांत आणली होती. दलालांच्या मार्फत मजुरांना जुगाराच्या अड्ड्यावर

आणून, त्यांच्या मजुरींतला मिळेल तो भाग वसूल करायचा असा प्रघात किसननें कित्येक वर्षे सुरू ठेवला होता. त्याची ती युक्ति इतकी बेमालूम होती कीं आपण मिळविलेला पैसा युक्त्या योजून, जुगार, दारू, यांत ओढून नेऊन परत घेतला जात असतो. ती कारवाई असतें हें एकाही मजुराच्या लक्षांत कधीं आलें नाहीं. असो.

किसननें पैशाची पिशवी घेतली आणि तो तेथून निघाला. ती पिशवी देतांना इस्माईलची मनःस्थिति मोठी विलक्षण झाली. किसननें मिलिंदावर केलेल्या अनुग्रहापासून त्याची आजपर्यंतची अचल स्वामीनिष्ठा डळमळूं लागली होती. त्याची सूडबुद्धि जरी जागृत झाली नसली तरी त्याच्या मनांत असलेले किसनबद्दलचें मत बिघडूं लागलें. पण किसनसमोर वागताना तो फार सावधगिरीनें वागे. पैशाची पिशवी देतांना, आपल्या तोंडून भलताच शब्द जाऊं नये म्हणून त्यानें आपला खालचा ओठ घट्ट आंवळून धरला होता. इस्माईलच्या ओठाआड असलेले रहस्य रात्रीच्या अंधाराप्रमाणेंच किसनला अज्ञात राहिलें. किसन तेथून जातांच त्याला एक विचकट शिवी हांसडून इस्माईल पुन्हां जुगाराच्या अड्ड्याकडे परतला.

किसन पैशाचें ओझें घेऊन हळूहळू चालला होता. नभोमंडलांत पर्जन्याची सर्व पूर्व तयारी झाली होती. विजांचा सूचक प्रकाश मधूनच चमकत होता. पावसाचा एखादा दुसरा थेंब कुठें कुठें पडत होता. लवकरच पावसाची सर येणार असा रंग दिसत होता, तरी किसननें आपली गति कायम ठेवली.

मजूरांच्या वस्तींत ह्यावेळीं सर्वत्र शांतता दिसत होती. त्यांच्या करतां म्हणून बांधलेल्या खोल्यांचें स्वरूप अशा प्रकारचे होतें. प्रत्येक खोलीच्या पुढच्या व मागच्या भिंती पाऊण पुरुष उंचीच्या असत. त्या भिंती व छपर ह्यांच्यांत साधारणपणें तीन हातांची फट असे. त्यांतून वारा स्वैरपणें जात येत असे. उन्हाळाच्या दिवसांत जरी त्या वाऱ्यापासून सूख मिळे तरी पावसाळा व हिंवाळा ह्या दोन ऋतूत मजुरांचे हालच होत. साधारण उंचीच्या मनुष्याला बाहेर उभें राहून सहज पाहिलें तरी आंत काय चाललें आहे तें सहज व स्पष्ट दिसे.

किसनची गति मंद झाली. शरीरावरच्या नव्हे तर मनावरच्या ओझ्यामुळें त्याची गती मंद झाली. सदोबाला पाहातांच जें पूर्व-स्मृतीचें कपाट उघडलें गेलें

काळरात्रीनें गिळून टाकल्यासारखें दिसत होतें. त्या दिव्याच्या श्वासाप्रमाणेंच मलीन श्वासनिश्वास त्याच्या प्राणवायूंतून निघत होते. प्रत्येक श्वासाबरोबर आपल्या देहांतून कांहीं तरी गूढ निघून जात आहे असें किसनला वाटत होतें. आपल्याला दुःख होत आहे कीं आनंद होत आहे हेंच त्याला कळेना. चहूंकडून पाण्याचा मारा झाला म्हणजे जसा एखादा माणूस गांगरून जातो तसा किसन बावरा झाला. त्याच्या मृतवत् भावनांना चेतना येत होती पण त्या नवजीवनाला किसन अपरिचित होता. त्याला वाटत होतें कीं आपल्या भावना कधींच मरून गेल्या आहेत. पण जेव्हां त्याच्या भावना पुन्हां आपलें अस्तित्व दर्शवूं लागल्या तेव्हां किसनला वाटलें कीं मेलेल्या भावनांची तीं भुतें असलीं पाहिजेत. भुतांच्या संगतींत त्याला चैन पडेना. भीतियुक्त अंतःकरणानें तो तें गाणें ऐकूं लागला.

ती स्त्री शेवटचे चरण म्हणूं लागली. करुणामय स्वरांत ती म्हणूं लागली होती:—

तुका म्हणे आतां । पुरवी आवडी
वेगें घाली उडी । नारायणा ॥

किसनच्या बेचैन मनानें तेंच चरण उचललें. तो अडखळत स्वतःशीं कसाबसा म्हणाला—वेगें घाली उडी—! पण पुढचा शब्द? देवाचें नांव त्याच्या ओठांवर येईना. त्याच्या मनांतला भाव उमटेना. त्याचा श्वास जड जड येऊं लागला. त्यानें एक जोराचा प्रयत्न करून स्वतःला सांवरलें. त्याला वाटूं लागलें कीं हा मनाचा मार चुकवण्याकरता लांब पळून गेलें पाहिजे. तो तेथून निघाला. त्याच्या वृत्ति, त्याची इंद्रियें त्याच्या ताब्यांत नव्हतीं. दहा पांच पावलें तो गेला नाहीं तोंच त्याला कळून चुकलें कीं आपलें जड शरीर चाललें आहे पण आपलें मन—आपला प्राण—आपणांबरोबर येत नसून, कुठें तरी त्या स्त्रीच्या भोवतीं घोंटाळत आहे. आपला देह—प्राणहीन देह—किसनला घेरी आली, आणि तो खालीं पडला. कांचनद्वीपाचा धनी त्या तशा अंधारांत आणि पावसांत एखाद्या बेवारशी भिकाऱ्याप्रमाणें पडला होता. त्याच्या देहाची तर त्याला शुद्धच नव्हती. त्याचे प्राण ते तरी त्या देहाला धरून होते काय ? कोण जाणे !

# प्रकरण ९ वें

## ‘ भाऊ-बीज ’

दिवाळीचे दिवस जवळ जवळ येत चालले होते. पर्जन्याच्या सरत्या सरी पडून जात होत्या. सृष्टीसतीचा चार महिन्याचा प्रेमळ सहवास सोडून जातांना मेघराजाला फार वाईट वाटत होते. त्या चार महिन्यांतले निरनिराळे विहार आठवून तर अजूनही मेघाच्या कडा ओल्या होत. खळाळून वहाणारे निर्झर पाहून आपल्या नशीबीं हें सुख नाहीं. सृष्टीशीं हंसून खेळून रहाण्याचें सुख नाहीं ह्या विचारानें बिचारा मेघराज फिकट तोंड करून हळूहळू जाऊं लागे. त्याच्या अगदीं उलट स्थिति सूर्याची होती. चार महिनें झालेल्या कोंडमाऱ्यानें बावरलेला सूर्य आपली तेजस्विता दुप्पट तीव्रतेनें प्रगट करूं लागला. अश्विनांतले तें ऊन जेव्हां सृष्टीवर येऊन पडे तेव्हां तिची हिरवळ गुदमरून जाई. पण एखाद्या सासुरवासिनीप्रमाणें बिचारी सृष्टि पतीचा तो कोप मुकाट्यानें सहन करीत होती. मेघराजाबरोबर चार महिने केलेल्या स्वैर विहाराची प्रतिक्रिया सुरू झाली होती. ‘ भाऊ-बीजे ’ ची ओवाळणी म्हणून एखादी सर आपल्या तबकांत पडेल ह्या आशेवर सृष्टि आपला प्रपंच चालवीत होती.

लक्ष्मी सृष्टीसारखीच सासुरवासीनी होती. सृष्टीला चार महिने तरी सुखाचा पावसाळा मिळत असे पण लक्ष्मीच्या नशीबीं सदाचा उन्हाळा होता. तिचा सौभाग्यसूर्य नुसताच तळपत असे. पण खऱ्या सूर्याची जीवनशक्ति त्याच्यांत—सदोबांत नव्हती. दिवाळी जशी जवळ येत चालली तशी लक्ष्मीच्या हृदयांतली आईबापांची आठवण तीव्र होऊं लागली. दिवाळी म्हणजे माहेरीं जाण्याची कोण धांदल—केवढा उत्साह—किती किती आनंद आणि आपण हतभागी हें लक्ष्मीच्या मनाला पूर्ण पटलें होतें. आपले आईबाप ह्या दिवाळीला आपल्याजवळ नाहींत. आई आपल्याला किती प्रेमानें न्हाऊं घालीत असे, निरनिराळीं आपल्या ऐपतीनुसार पक्वानें करण्यांत तिची केवढी धांदल उडून जात असे, त्या धांदलींत नेमक्या ठरवलेल्या गोष्टींची विस्मृति पडून पुन्हां आठवण झाली कीं स्वतःच्या अजागळप-

णाविषयीं किती हसावें—अशा अनेक गोष्टी येणाऱ्या दिवाळीनें लक्ष्मीच्या अंत:करणांत पेटवून दिल्या होत्या. तिच्या आठवणी अधिक प्रज्वलित करण्याला अगदीं नजीकचे असें एक कारण घडलें होतें. तें म्हणजे लक्ष्मीला आलेलें तिच्या आईबापाचें पत्र होय. त्या पत्रांत विशेष असा मजकूर नव्हता. साहित्याच्या कसोटीनें, व्याकरणाच्या नियमांनीं कदाचित् त्या पत्रांत स्वत:ची कत्तल पाहिली असती पण लक्ष्मीच्या हपापलेल्या दृष्टीला त्या पत्रांतल्या प्रत्येक अक्षरावरून नजर फिरवितांना आईबापाच्या अंगावरूनच डोळे भरून पाहिल्यासारखा आनंद होई. शेंकडों मैलावर असलेल्या आईबापांनीं लक्ष्मीच्या विचारांचे स्पष्ट प्रतिबिंब त्या पत्रांत उठवलें होतें. दिवाळीचा विशेष उल्लेख करून ' पांडुरंग तुझें कल्याण करो ' एवढीच मंगल ओवाळणी लक्ष्मीच्या वडलांनीं तिला पाठवली होती. नव्या मनूंतील ' शूर शिपाया ' प्रमाणें शब्द पांडित्याचे रण माजवणें त्या अशिक्षित खेडवळाच्या शक्तीपलीकडचें होतें. पण त्याचबरोबर त्याच्या एका शब्दाला एका मंगलाआशीर्वादाला अशी धार होती कीं तिनें हजारों संकटांच्या राशी छिन्नविछिन्न करून टाकल्या असत्या. लक्ष्मीला त्या गोष्टीची मनोमन पूर्ण साक्ष पटली होती आणि म्हणूनच त्या मंगल आशिर्वादानें तिच्या हृदयांतल्या आठवणी खळाळून वाहूं लागल्या. त्याचप्रमाणें त्यांनीं कांचनद्वीपासारख्या परमुलुखांत निरंतरच्या सोबतीची साक्ष तिला पावली.

हौसेनें संसार करण्याचें सुख लक्ष्मीच्या नशीबीं नव्हतें. तरी तिनें घरांत असलेल्या सामानांतूनच दिवाळी साजरी करण्याचें ठरवलें. नवरा आपल्याशीं कसाही वागला तरी स्वकर्तव्यांत चुकूं नये अशा विचारानें ती निरंतर वागे. दिवाळीचा सण आपणच हिरमुसल्या मुखानें आणि मनानें घालवला तर नवऱ्याला तरी आपल्याशिवाय कोण गोड करून देणार ? त्याची तरी काळजी कोण वाहणार ? तेव्हां शक्य तितक्या तत्परतेनें ती दिवाळीचें साहित्य तयार करूं लागली. लक्ष्मी कांचनद्वीपांत आल्यापासून तिच्या शीलाचा सुवास मृगाच्या नाभींतील कस्तुरीप्रमाणें पसरत होता. कित्येक दिवस त्या बेटांतील मजुरांना त्या सुवासाचें उगमस्थान अज्ञात राहिलें. पण अज्ञात राहिलें म्हणूनच तें शील अधिक प्रभावशाली बनत चाललें, आणि त्या वाढत्या प्रभावानें लक्ष्मीच्या शेजारणींना तिच्यापायीं

आणलें ह्यांत नवल नाहीं. आपल्याकडे कांहीं कमीजास्त झालें तर त्यांतला अंश देवाला नैवेद्य दाखविल्याशिवाय खाऊं नये त्याप्रमाणें शेजारणी लक्ष्मीला तो अंश आणून देऊं लागल्या होत्या. लक्ष्मी प्रथम प्रथम त्या शेजारणींचा शिष्टाचार स्वीकारण्यांत संकोचूं लागली. पण पुढें पुढें तितकें तोडून वागणें तिच्या जिवावर येई आणि तिला शेजारणींचा भक्तिभावानें पुढें टेवलेला नजराणा स्वीकारणें भाग पडलें. शेजारणींच्या अंतःकरणांत लक्ष्मी विषयीं अशी निस्सीम भावना उत्पन्न करण्याला व नंतर वाढीस लावण्याला कारण अर्थातूच रंगू होती. रंगूनें आपल्या बडबड्या स्वभावानें लक्ष्मीच्या जाहीरातीचें काम मनःपूर्वक व चांगलें चालवलें होतें. लक्ष्मीच्या इवल्याशाही सद्‌गुणाचा ती पर्वत उभा करी आणि त्या वर्णनाच्या ओझ्याखालीं श्रोत्यांचा जीव गुदमरून जाई. तरी पण त्या श्रोतृवर्गाला ती आपत्ति इष्टच वाटे. असो.

दिवाळीच्या आधीं एकच दिवस लक्ष्मी गहूं निवडीत बसली होती. एकीकडे ती हातानें संसार करीत होती तर त्याचवेळीं दुसरीकडे मुखानें ती चिलियाबाळाचें गाणें गुणगुणत होती. त्या गाण्यांतल्या करुणरसानें तिचें अंतःकरण क्षणाक्षणाला गद्गद होई आणि गव्हावरचा तिचा हात ओल्या डोळ्यांच्या कडा पुसण्याकरतां वारंवार पदराकडे जाई. आपल्याच नादांत स्वतःला गुंगवून टाकण्यांत लक्ष्मी अत्यंत तरबेज होती. एखाद्या योग्याप्रमाणें तिनें बाह्य उपाधींतून अंतःकरण काढून तें ईश्वराच्या स्मरणांत अथवा गुणगानांत तल्लीन करण्यास ती शिकली होती. आतांही हीच तिची स्थिती होती. यावेळीं त्या तिच्या समाधीचा भंग रंगूनें केला. रंगूच्या हाकेसरशीं लक्ष्मीनें वर पाहीलें आणि स्मित हास्य करून तिचें स्वागत केले. वैभवानें नटलेल्या राजद्वाराच्या कमानींत होणाऱ्या स्वागतानें व्हायचा नाहीं इतका आनंद रंगूला त्या साध्या हास्याच्या स्वागतानें झाला. रंगू बसली आणि तिनें किंचित् थांबून हांक मारली, "लक्ष्मी" लक्ष्मीनें पुढ्यांतलें काम बाजूला केलें आणि तिनें आपली नजर रंगूकडे लावली. रंगू हांक मारून थांबली. तिला पुढें जें बोलायचें होते त्याचा ती विचार करीत होती. नव्हे, काय बोलायचें तें ठरवूनच ती आली होती तरी पण कांहीं शंका येऊन त्या ठरवलेल्या गोष्टीचा पुन्हां विचार करावा तसा विचार

करून ती म्हणाली, " नाहीं म्हटलं–तूं माझें एक मागणें कबूल करशील कां ?" रंगू आपल्या जवळ काय मागणार ह्याची कल्पना तिला येईना. पण पापाची कल्पनाही नसलेल्या तिच्या मनाला कसलीच शंका न येतां तिनें विचारलें ' काय ? ' त्या एका शब्दांत विशेष अर्थ नव्हता पण रंगूला तो शब्द आपल्या इच्छापूर्तीच्या हाटाला लावलेल्या अडसराप्रमाणें वाटला. आपली निराशा तर होणार नाहीं? ह्या विचारानें आशंकून ती म्हणाली, " मागणं कांहीं मोठंसं नाहीं–पण आपलं माझ्या मनाला भीति वाटते कीं मी मागावं आणि त्या मागण्याला नकार मिळाला तर ? " एवढेंच अर्धवट म्हणून ती थांबली. त्या औपचारिक प्रकारानें गोंधळून गेलेली लक्ष्मी हंसून म्हणाली, "रंगूबाई, तुम्ही मला इतक्या का ह्या समजतां ?–सांगाना तुम्हांला काय हवं तें ? माझ्या हातीं असलं तर मी खचीत तें देईन. " पण शेवटचें वाक्य उच्चारतांना ती स्वतःशींच हंसली. आपल्या हातांत काडीची-सुद्धां सत्ता नसतांना आपण किती निष्फळ आश्वासन देत आहोंत ह्या विचारानें तिला खेद वाटला आणि हंसूही आलें. रंगूनें आपली मागणी पुढें टाकली. रंगूनें विचारलें, " मग माझ्याकडे दिवाळीचे फराळाला येशील का? " पूर्वीचें अर्धवट म्हणणें रंगूनें पूर्ण केलें. इतक्या साध्या माग-णीला दूरचा प्रवास रंगूनें कां करावा, ह्याचें रहस्य ध्यानांत न येऊन लक्ष्मीनें तिच्या मागणीला रुकार तर दिलाच. पण तिनें रंगूला त्या रह-स्याचें कारण विचारलें. लक्ष्मीच्या रुकारानें आनंदलेली रंगू पुन्हां विचारांत पडली. नुकताच हस्तगत झालेला जरा आपणापासून हिरावला जातो कीं काय अशी तिला शंका आली. पण कांहीं झालें तरी लक्ष्मीशीं प्रतारणा करावयाची नाहीं ह्या निश्चयानें ती म्हणाली, " मला एवढें वाटलें त्याचें कारण–लक्ष्मी–तुझ्या ध्यानांत आलें असेल–मी–मी जातीनें महारीण आहें. आणि तूं " पण तिला पुढें बोलवलें नाहीं. आपण जातीनें नीच आहोंत, एवढेंच नव्हे तर लक्ष्मी येईपर्यंतचें आयुष्य आपण कसें घालवलें ह्या विचारानें तिच्या जिवाचा थरकांप झाला. निष्पाप लक्ष्मीच्या लक्षांत तिची ती स्थिति मुळींच आली नाहीं. ती हंसून म्हणाली, " एवढेंच ! "

त्या एकाच शब्दानें लक्ष्मी आणि रंगू ह्यांच्यांतला जातिनिर्बंधाचा अड-सर दूर केला गेला आणि कित्येक दिवसांपासून रंगूच्या अंतःकरणांत गुप्तपणें

दडून राहिलेल्या नीच भावनेला हांकलून दिलें. आतां रंगू आपलें मस्तक उन्नत करून जगाच्या हेटाळणीला हंसून आपला विजय मिरवण्यास समर्थ झाली होती. मातृ-वात्सल्याच्या स्वर्गीय भावनेला सामाजिक बंधनें कुठवर बांधू शकणार ? रंगूनें लक्ष्मीचा निरोप घेतला आणि अकस्मित व अपरिमित आनंदानें फुलून जाऊन ती आपल्या घराचा रस्ता चालूं लागली.

त्यानंतर लवकरच भाऊबीजेचा दिवस उगवला. महाराष्ट्रांतल्या कांहीं प्रेमळ भगिनी आपापल्या बंधुराजाचें स्वागत करण्याची मोरे झपाट्यानें तयारी करूं लागल्या. त्या स्वागतांत एकंदरींत त्या गढून गेल्यामुळें आंता त्या प्रेमळ ललनांना पोटच्या पोराचें रडणें ऐकूं येत नव्हतें—'तिकडच्या' स्वारीची 'सदान् सदाची' कुरकुर समजत नव्हती किंवा सासूच्या ललकाऱ्या आपल्याला असतील असें वाटत नव्हतें. पतीच्या पाठीस लागून 'दादाला' अगदीं आग्रहाचें पत्र धाडण्यापासून त्या पत्रांत 'तूं ये, तूं येच, तूं न आलास तर' च्या पुढें भावनेच्या भरतीची रेघ मारण्यापर्यंत मजल आणून ठेवल्यावर सगळया बहिणी पुढच्या स्वागताच्या तयारींत गढून गेल्यास नवल नव्हतें. दादा येणार, अगदीं हजार कामें असलीं तरी येणार अशा उत्कंठेंत आणि अपेक्षेंत कामाचा रगाडा उरकण्यांत श्रमाची जाणीव त्यांना होत नसे. एखाद्या श्रीमंत बहिणीला आपल्या गरीब भावाला सर्व प्रकारें सुख कसें देतां येईल, अशी गोड हुरहूर लागे. व्यसनाधीन नवऱ्याची चिंता अहोरात्र जिवाला जाळीत असताना भाऊबीजेच्या एकाच दिवसाकरतां मनाला आवर घालून भावाचें स्वागत करणारी एखादी उदात्तचरिता भगिनी पाहिली कीं मन गंहिवरून जातें. ह्या शेवटच्या विचारानें मिलिंदाच्या मनांत सकाळपासून खळबळ उडवली होती. आपल्या मुंबईच्या मानलेल्या श्रीमंत बहिणीची त्याला आठवण झाली. फटाका उडवतांना पोळलेल्या तिच्या बोटाला तेलपट्टी लावतांना डोळयांतून वहाणाऱ्या पवित्र गंगायमुना त्याला दिसूं लागल्या. त्याबरोबर नकळत त्याच्याही डोक्याच्या कडा ओल्या झाल्या. आपल्या प्रेम-शून्य आयुष्याची त्याच्या मनाला फारच खंती वाटूं लागली. आपण साऱ्या जगांत एकटें. अगदीं एकटें आहोंत. ह्या विचारानें त्याचें अंतःकरण मूक रुदन करूं

लागलें. मातृविहीन—बंधूविहीन—भगिनीविहीन अशा त्या रख-रखीत आयुष्याचा त्याला कंटाळा आला. कुठें तरी खऱ्या प्रेमाचा, खऱ्या सहानुभूतीचा शब्द ऐकूं यावा म्हणून तो धडपडत होता आणि निराश होऊन स्तब्ध बसत होता. त्याच्या स्थितीची कल्पना आणि अंतःकरणाची तळमळ इतरांना कळणें सोपें नव्हतें. नाहीं म्हणायला मल्हारी मात्र मिलिंदाच्या मनाची केंविलवाणी स्थिती जाणीत होता; व आपल्या-कडून शक्य ती उपाय योजना करीत होता. मल्हारीच्या त्या सहृदयतेमुळेंच मिलिंदाला असह्यतेच्या तिमिरांत आशेचा किरण दिसूं लागला. दोघेही एकमेकांकडे विश्रांतीच्या वेळीं येत जात आणि परस्परांच्या सहवासानें कांचनद्वीपांतल्या कठोर आयुष्याला शक्य ती मृदुता आणण्याच्या प्रयत्न करीत. आपल्या मानलेल्या बहीणीच्या आठवणीनें हळुवार झालेल्या मनाचा मिलिंद मल्हारीकडे निघाला. मानवी मन निरनिराळ्या प्रसंगीं निरनिराळ्या भावनेची भूक लागून व्याकूळ होत असते. तीच गत त्यावेळीं मिलिंदाची झाली होती. कोणीतरी स्नेह्यानें आपला हात जोरानें दाबावा, आपल्या अंगाशीं खूप दंगामस्ती करावी अथवा आपल्या बहीणीनें आपल्यावर रागवावें. कात-वून 'आपण पुन्हां तुझें तोंड पहाणार नाहीं' अशी प्रतिज्ञा करून आपल्याकडे रागानें सारखें पहात रहावें असं कांहीं तरी घडावें, असेंच त्याच्या मनाला तीव्रतेनें वाटूं लागलें. तो मल्हारीच्या खोलीजवळ आला आणि थबकला. दाराला लागलेलें कुलूप पाहून त्याची अत्यंत निराशा झाली. त्याच्या मनः-स्थितीची कल्पना ज्यांना जिव्हाळ्याचे मित्र आहेत त्यांनाच येणें शक्य आहे. मल्हारी जवळपास कुठें तरी गेला असेल तो इतक्यांत येईल अशा अपेक्षेनें मिलिंद तेथेंच दारापुढें बसला. थोडावेळ वाट पहावी आणि जावें ह्या विचारानें तो बसल्या बसल्या आजूबाजूंला पाहूं लागला. मल्हारीच्या खोलीसमोरच एक मजुराचें कुटुंब रहात होतें. त्या मजुराची ९।१० वर्षे वयाची मुलगी आ या लहानग्या भावाला पाटावर बसवून ओवाळीत होती. त्या लहान मुलाची मारे गडबड चालली होती. ओवळण्याकरतां हातांत निरंजन व त्याची बहीण आपला भाऊ आतां स्थीर बसेल अशा कल्पनेनें त्याला नीट बसण्यास विनवून सांगत होती. तिच्या मनाची स्थिति एखाद्या फोटो-ग्राफरप्रमाणें झाली होती. कॅमेऱ्याच्या पुढें लहान मुलाला फोटोकरतां बस-

वून त्यानें अगदीं हालचाल न करतां एखाद्या ‘ देवा ’ प्रमाणें बसावें म्हणून त्या फोटोग्राफरचा आटोकाट प्रयत्न चालू असतो. घड्याळाचा गजर, बाहुली, चिमणी वगैरे निरनिराळ्या साधनांचा उपयोग करून सुद्धां जेव्हां तें मूल स्थीर होत नाहीं तेव्हां मग त्या फोटोग्राफरला जें वाटतें अगदीं बरोबर तसेंच त्या बहिणीला वाटत होतें. मिलिंद मोठ्या कौतुकानें तें प्रेमळ दृश्य पहात होता. अगदीं अनपेक्षित रीतीनें तो मुलगा स्थीर बसला. बहिणीनें त्याला ओवाळलें आणि आपल्या भावाच्या डोक्यावर तिनें आपल्या चिमकुल्या हातानें अक्षता टाकल्या.

मिलिंदाची जागृत झालेली भावना अधिकच प्रबळ झाली. मल्हारीची वाट अधिक वेळ न पहातां तो उठला. एखाद्या मंत्रमुग्धाप्रमाणें तो चालू लागला. आपण काय करीत आहोंत ह्याचे त्याला जणूं भानच उरलें नाहीं. आपल्याच नादांत तो लक्ष्मीच्या घरासमोर येऊन उभा राहिला. तीन्हीसांजा होऊन अंधार पडला होता. द्वितीयेची चंद्रकोर दिसूं लागली होती. लक्ष्मी आपल्या संसारांत मग्न होती. मिलिंद दारांत जाऊन उभा राहिला. त्याचें अंतःकरण भरून आलें होतें. त्यानें कंपित स्वरांत हांक मारली “ ताई ! ”

लक्ष्मीनें चमकून पाहिलें. मिलिंद दारांत उभा होता. लक्ष्मी जरी कधीं मिलिंदाशीं बोलत नव्हती तरी रंगूकडून तिला मिलिंदाबद्दल जी माहिती झाली होती व ‘गुलाम’ बोटीवर जें अनाहुत सहाय्य त्यानें तिला केलें होतें त्यामुळें तिच्या मनांत त्याच्याबद्दल श्रद्धा आणि आदर होता. त्याची ती करुण हांक ऐकून लक्ष्मीला वाईट वाटलें. असें कोणतें बरें दुःख ह्या अभागी भावाला झालें असेल कीं ज्यामुळें तो आपल्या दारीं अशा वेळीं यावा? तिनें पाट मांडला. मिलिंद बसला आणि खालीं पहात तो म्हणाला, “ आपण माझ्यावर अक्षत टाका दुसरें मला कांहीं नको ”

लक्ष्मीनें मोठ्या आनंदानें त्याची विनंति मान्य केली. उपाशीं भावाला ओवाळूं नये म्हणून तिनें एका लहानशा ताटांत त्याच्यापुढें थोडें फराळाचें ठेवलें. बहिणीच्या हातचें विशेषतः लक्ष्मीसारख्या बहिणीच्या हातचें तें अन्न मिलिंदानें तेव्हांच खाऊन फस्त केलें. लक्ष्मीनें तबक तयार केलें. निरांजन लावलें. दाराकडे पाठ करून मिलिंद बसला होता. लक्ष्मीनें तबक

उचललें, कुंकवाचा तिलक तिनें मिलिंदाच्या कपाळीं लावला. पांडुरंगाच्या कृपेनें न बोलावतां आपल्या घरीं एक भाऊ चालून आला ह्याबद्दल तिला फार आनंद झाला. तिनें त्याला ओवाळलें आणि डोक्यावर अक्षता टाकल्या. इतक्यांत त्या दोघांच्या सात्विक प्रेमाच्या उरांत एखाद्या तीक्ष्ण खंजीराप्रमाणें घुसणारे शब्द त्यांच्या कानीं आले. दोघेही चपापलीं. त्याचा आनंद मावळला. लक्ष्मीनें तबक खालीं ठेवलें. दारांत उभे राहून सदोबा संतापून ओरडत होते, " बेशरम अवदसे—प्रत्यक्ष जाराला ओवाळण्याचें ढोंग करतेस-- "

सदोबाचे ते अनपेक्षित विषारी वाग्बाण ऐकून मिलिंदाला त्या बोलण्याचा अर्थच कळेना. त्याचें मस्तक सुन्न झालें. अंमलपाणी करून आलेले सदोबा आणखी पुष्कळ बडबड करीत होते. मिलिंद भारावलेल्या अंतःकरणानें निघून गेला. लक्ष्मीच्या उपयोगीं पडण्याचें तर दूरच राहिलें पण तिला आज अशा मंगल प्रसंगीं इतकें तीव्र दुःख देण्याला आपण कारणीभूत व्हावें असा काय आपण दैवाचा अपराध केला असावा ह्याचा उमज त्याला पडेना ! ते शब्द ऐकून लक्ष्मीच्या मनाला काय वाटलें असेल ? स्त्रियांना आत्मा नाहीं हीच गोष्ट तिनें आपल्या स्तब्धतेनें जगाला पटवून दिले असेल ! पण स्त्रियांचा छळ करायला सोकावलेल्या जगाला कुठें त्याची पर्वा होती म्हणा ! लक्ष्मीसारख्या साध्वींना छळण्याचें आपलें व्रत अबाधीतपणें जग चालवीत होतेंच !



## प्रकरण १० वें

### " प्रियाराधन "

मागील प्रकरणांत उल्लेखिलेला अत्यंत हृदयद्रावक प्रकार घडून कांहीं दिवस लोटले होते. त्या काळाच्या मंद मंद पावलांनीं लक्ष्मीच्या अंतःकरणाला उत्साहाचें दर्शन तर घडवलें नाहींच. तिच्या मनांतली देवभक्ति माणुसकीच्या सर्वस्वाची एकच एक दिव्य ज्योति कशाही झंझावातांत मंद पण

अखंडपणें तेवत होती. प्रत्यक्ष नवऱ्याकडून 'व्यभिचारिणी' अशा कटु, असत्य शब्दाची ओवाळणी आपल्याला घातली जाईल ह्याची लक्ष्मीला कधींही कल्पना नव्हती. आपला नवरा विलक्षण आहे, लहरी आहे, छाळिक आहे,पण म्हणून आपल्या शीलाविषयीं तो असें कांहीं कुत्सित बोलेल —अथवा त्याच्या मनांत अशी कांहीं घाण सांचली असेल असें तिला कधींही वाटलें नव्हतें. तेव्हां तो घाव तिला जितका अकल्पित होता तितकाच दुःसहही होता. लक्ष्मीच्या मनांत खूप खळबळ उडाली. श्रद्धा—कर्तव्य सारासार विचार वगैरे सर्व गोष्टींचें तिच्या हृदयसागरांत मंथन झालें. त्या मंथनांतून जें जें निघालें त्या सर्वांचा तिनेंच स्वीकार केला. मानवी विचारशक्ति तुटपुंजी असते. तिच्या पंखांनीं कितीही धडपड केली तरी ईश्वरीयोजनेच्या आकाशाचा अंत तिला कधींही लागणें शक्य नाहीं ही गोष्ट लक्ष्मीनें आपल्या अंतःकरणांत नीट ठसविली. एवढें अमोल विचाररत्न हातीं लागलें ह्याचा तिनें कधींही एखाद्या आधुनिक तुटपुंज्या अकलेच्या कवीसारखा अभिमान धरला नाहीं. 'ही माझी कल्पना' म्हणून ती चढून गेली नाहीं. जगाला थक्क करणाऱ्या कल्पनांचा उगम कोणत्या सदय चरणांपासून आहे ह्यांची पूर्ण जाणीव लक्ष्मीला होती. एकीकडे तिच्या मनाची अशी उदास स्थिति होत चालली होती तर दुसरीकडे तिच्या मनांत अत्यंत भयंकर विचार येत होते. सांप्रदायानें दिलेला मार्ग अनुसरतांना वाट्यास येतील ते हाल मुकाट्यानें सोसावे हें न्याय्य आहे. कारण नवऱ्याच्या वाटेल त्या शब्दांना—वर्तनाला मान तुकावून कोडगेपणानें जिवंत रहाण्यांत स्त्रियांचा खरोखरच कांहीं 'पुरुषार्थ' साधतो काय ? पति परमेश्वराच्या कोटीचा समजला जावा आणि स्त्री पशू समजली जावी इतका फरक खुद्द परमेश्वरानें दोन्हीं जातींत ठेवला असेल काय ? अशा प्रकारच्या कल्पना तिच्या मनांतील श्रद्धेला—पूर्व सांप्रदायाच्या अभिमानाला धडाधड धडका देत होत्या. लक्ष्मीनें आपल्या हृदयसागराच्या मंथनांतून निघालेलें हेंही कालकूट स्वतःच प्राशन केलें.

भाऊबीज होऊन दहाबारा दिवस झाले. दिवसेंदिवस लक्ष्मीच्या मनांतली खळबळ ओसरत चालली. रंगूच्या नजरेंतून अर्थातच लक्ष्मीचें दुःख सुटलें

नाहीं. पण तिनें त्या विषयीं उगाच चौकशी करून लक्ष्मीला त्रास देण्याचें मनांत आणलें नाहीं. मात्र कार्तिकी पौर्णिमेला चांदण्यांतलें डोहाळे जेवण करण्याचें रंगूनें ठरवलें. लक्ष्मीला तिनें आमंत्रण दिलें आणि त्या आनंदाच्या दिवसाची तयारी करण्यांत ती गढून गेली. कार्तिकी पौर्णिमा उगवली. संध्याकाळ झाली. पश्चिमेच्या अंगणांत शशांकाच्या आगमनाप्रीत्यर्थ संध्येनें गुलाल उधळून दिला. इकडे रंगूनें सुद्धा लक्ष्मीच्या केसांत भरण्यासाठीं थोडासा गुलाल एका तबकांत भरून ठेवला. घराकडे जाणाऱ्या पाखरांची मंजूळ किलबिल ऐकत असतांनाच रंगू लक्ष्मीच्या पायांचा आवाज ऐकूं येईल ह्या उत्कंठेनें तिची वाट पहात होती. त्या पक्षांच्या लगबगीप्रमाणेंच तिची धांदल उडाली होती. रानफुलांची एक सुंदर वेणी तिनें स्वतः हातानें गुंफून तयार केली होती. चंद्रबिंब आकाशाच्या क्षितिजावर आरूढ झालें आणि यौवनमत्ता नारीच्या मंद पण मोहक गतीनें ते वर वर चढूं लागलें. रंगू एकसारखी सारखी आंतबाहेर येरझारा घालीत होती. दारातूनच तिनें पाहिलें तों चंद्र पूर्ण प्रकाशानें चमकत होता. लक्ष्मीला बोलावणें जावें ह्या विचारानें तिनें सामानाची झांकपाक केली आणि तिनें दाराच्या बाहेर पाऊल ठेवलें. रस्त्याकडे पाठ करून तिनें दार लावलें आणि ती रस्त्याकडे वळली. तिच्या चेहऱ्यावर समाधानाची व आनंदाची एक बारीक लकेर येऊन गेली. लक्ष्मी रस्त्याच्या टोंकाला होती. मंदमंद पावलें टाकीत रंगूच्याच घराकडे ती येत होती. तिच्या त्या गतीकडे कांहीं वेळ तटस्थपणें पहात रंगू उभी राहिली. नंतर रंगूनें वर आकाशाकडे नजर फिरवली. चंद्रावरून एक फिकट मेघाचा तुकडा मोठया गडबडीनें धावत होता. आईच्या अंगाशीं हुस्त्या घेणाऱ्या अल्लड बालकाप्रमाणें तो मेघखंड शोभत होता. रंगूच्याजवळ लक्ष्मी येऊन पोहोंचली. 'आलात!' म्हणून कांहींसें चेष्टेनें कांहीं आनंदानें रंगूनें तिचें स्वागत केलें. दोघी जणी घरांत शिरल्या.

रंगूच्या घरांत लक्ष्मी आजच प्रथम शिरत नव्हती. रंगूची टापटीप व हौस ह्यांची तिला पूर्ण ओळख होती. तरीसुद्धां ती आज आश्चर्यचकित झाली. शिजलेल्या अन्नाचा सुगंध चहूंकडे पसरला होता. लक्ष्मीकरतां पाट मांडून बाजूनें सुंदर रांगोळी काढलेली होती. त्या रांगोळींत मधून मधून गुलाल, हळद वगैरे भरून शोभा वाढवण्याचा यशस्वी प्रयत्न

करण्यांत आला होता. चांदीच्या एका मोठ्या पेल्यांत तांदूळ भरून उदबत्त्यांचा मोठा थोरला घोस त्यांत लावून ठेवला होता. एका समईत पांच वाती मंदपणें तेवत होत्या; आणि ह्या सगळ्या प्रकारावर देखरेख करण्याकरतांच जणूं काय एका झरोक्यांतून चंद्रप्रकाशाचा एक झोत लक्ष्मीच्या पानाजवळ भिंतीवर पडला होता. ती सर्व व्यवस्था पाहून लक्ष्मीला अत्यंत समाधान झालें. तिचें दुःखी अंतःकरण जणूं काय अशा प्रकारचें समाधान मिळावें म्हणून धडधड होतें आणि किंचित्मात्र समाधान दृष्टीस पडतांच तें अंतःकरण त्यांतच रमलें.

रंगूनें लक्ष्मीला पाटावर बसवलें आणि तिनें तिचें ताट वाढून आणून तिच्यापुढें ठेवलें. दुसरें ताट घेऊन रंगू आपल्याबरोबर बसेल अशी लक्ष्मीची अटकळ होती पण रंगूनें जरा विचार करून हंसत सांगितलें, "तूं बैस. मला आज उपास आहे." त्यावर लक्ष्मी म्हणाली, "हें काय हो ! माझ्याकरतां कशाला केलांत खटाटोप ? मी एक शीतसुद्धां खायची नाहीं ह्या अन्नांतलें. तुम्ही वाढून घ्या. त्याशिवाय कांहीं चालायचं नाहीं." रंगूला मोठा पेंच येऊन पडला. काय केलें म्हणजे लक्ष्मीची समजूत पटेल हें तिला कळेना. बरें ती ज्या कारणाकरतां लक्ष्मीच्या बरोबर जेवणाचें नाकारीत होती त्या कारणाचा नुसता उच्चार लक्ष्मीपुढें केला तरी तिला मरणप्राय दुःख झालें असतें. मनुष्य प्रथम एखाद्या मोहांत पडावा आणि नंतर त्याला त्यांतून बाहेर पडण्याची उत्कट इच्छा असून बाहेर पडतां येऊ नये म्हणजे त्या माणसाची जशी तारांबळ उडते तशीच कांहींशी रंगूची स्थिति झाली होती. लक्ष्मीला कांहींच कारण न सांगतां तिची समजूत करणें जवळ जवळ अशक्य होतें हें रंगू पूर्णपणें जाणत होती. त्याचप्रमाणें सबब शोधण्यांत कालापव्यय करणें तर अगदींच अनिष्ट होतें. लक्ष्मी ठरावीक वेळापेक्षां अधिक वेळ आपल्या घरांत रहाणें इष्ट नव्हतें. अशा रीतीनें रंगूचा चोहोंबाजूनें कोंडमारा झाला. तिनें अधिक विचार न करतां आपलें ताट वाढून घेतलें आणि ती लक्ष्मीच्या समोर जेवायला बसली. दोघींचीं जेवणें सुरू झालीं. कां कुणाला ठाऊक, रंगूचें सारें लक्ष दाराकडे होतें. लक्ष्मी आज खरोखरच स्वतःच्या आनंदांत मग्न होती. तीव्र तपश्चर्येनंतर मधुर सुखाचा झुळझुळ वहाणारा झरा तपस्व्याच्या अंतः-

करणांत उत्पन्न होत असतो. तशीच स्थिति लक्ष्मीची होती. खडतर पति-सेवाव्रतानें तिच्या मनोभूमींतून एक दिव्य शक्ति निर्माण झाली होती. त्या शक्तीच्या जोरावर लक्ष्मी मनाची समता ढळूं देत नसे. त्या शक्तीच्या जोरावरच लक्ष्मी सदा प्रसन्न असे.

इकडच्या तिकडच्या गोष्टींत दोघींचीं जेवणें संपलीं. रंगूनें एक विडा लक्ष्मीला दिला. लक्ष्मीनें तो विडा चघळतानांच रंगूचा निरोप घेतला. दारांत लक्ष्मी उभी राहिली. रंगूनें कुंकवाच्या करंड्यांतून तिच्या कपाळीं कुंकू लावलें. लक्ष्मीच्या तोंडावर समईचा मंद प्रकाश पडला होता. तोंडांतल्या विड्यानें तिच्या ओठांना रक्तिमा आणला होता. तिच्या डोळ्यांत पावित्र्याचें अलौकिक तेज चकाकत होतें. रंगूला काय वाटलें कुणास ठाऊक, ती पटकन खालीं लवली आणि तिनें लक्ष्मीला—तिच्या मनोमन असणाऱ्या महालक्ष्मी—देवी समजून नमस्कार केला. रंगूचा कंठ रुद्ध झाला. पूर्वस्मृतीनें अथवा लक्ष्मीविषयींच्या प्रेमानें सद्गद होऊन तिनें मानेनेंच लक्ष्मीला निरोप दिला. लक्ष्मीच्या एकेक पावलाबरोबर रंगूचा श्वास तिला सोडून जात होता. ती अभागी स्त्री हताश होऊन लक्ष्मीच्या चंद्रप्रकाशाला शोभा आणणाऱ्या मूर्तिकडे अनिमिष नेत्रांनीं पहात राहिली. लक्ष्मी आपल्या वाटेनें जात होती. आपल्या सान्निध्यानें एक वत्सल अंतःकरण इतकें उचंबळून येत असेल ह्याची तिला कल्पना नव्हती. कवीच्या प्रतिभेप्रमाणें ती आपलेंच गूढ शोधण्यांत गुंग होती; आणि कवीच्या कल्पना विलासासारखीच परमेश्वरावरील श्रद्धेची बागशाही फुलवीत होती.

० ० ० ०

कुणाच्या तरी पायांतल्या बुटाचा करकर असा आवाज ऐकून रंगूच्या नेत्रांत चपलता उत्पन्न झाली. येणाऱ्या व्यक्तीची पाऊलें मोठ्या खुषींत पडत होतीं. आणि बुटाच्या करकर निघणाऱ्या आवाजाची साथ आपल्या खुलत्या दिलाला देत ती व्यक्ती येत होती. सरळ घरांत येण्यापूर्वी त्या व्यक्तीनें भिंतीवरून डोकावून आंत पाहिलें आणि नंतर दारांत बूट काढून ती व्यक्ति आंत आली. लक्ष्मीकरतां केलेला सगळा थाट आतां शेषरूपानें उरला होता आणि एखाद्या साम्राज्याच्या अवशेषाप्रमाणें लक्ष्मीचें उष्टें पान

विझत आलेल्या उदबत्त्या व फिकट झालेली गुलालरांगोळी आपल्या एकवेळच्या वैभवाची व त्यांचा उपभोग घेऊन त्यांना पावन करून गेलेल्या देवतेची साक्ष पटवीत होतीं. इस्माईल—ती व्यक्ती—येऊन बसला तो लक्ष्मीच्याच पाटावर बसला. रंगूच्या अंतःकरणांत चलबिचल उत्पन्न झाली. तिनें झटकन लक्ष्मीचें उष्टें ताट उचललें आणि दूर ठेवून दिलें. इस्माईलला वाटलें आज कांहीं तरी विशेष आहे. त्यानें उठून हातपाय धुतले आणि नवीन तयार केलेल्या ताटावर तो येऊन बसला. बाजूला रंगू बसली होती. मघाचेंच उष्टें ताट तिनें पुढें घेतलें आणि ती आपले अर्धवट राहिलेलें जेवण पुरें करूं लागली. इस्माईल आणि रंगू ह्यांच्या नात्यांचा उल्लेख मागें येऊन गेलाच आहे. रंगू आपल्या नशीबानें पुरी फसली. तिच्या घसरणाऱ्या शीलाला सावरून धरील अशी लक्ष्मी तिच्या पूर्ववयांत तिला भेटली नाहीं, आणि आज तिला ती लक्ष्मी भेटली तों ती आपले शील हरपून बसली होती. आज जसा इस्माईल तिच्याकडे जेवणास आला होता तसा लक्ष्मी कांचनद्वीपांत येण्यापूर्वी अनेक वेळां येत असे. त्यावेळीं रंगू किती उघडपणें किती प्रेमानें आपल्या त्या मानलेल्या वल्लभाचें स्वागत करीत असे. पण आज तिच्या हृदयावर कसलें तरी दडपण पडलें होतें. इस्माईलच्या दर्शनानें नाचणारे तिचे डोळे आज मुग्ध राहिले आणि हास्यानें प्रकाशणाऱ्या दंतपंक्ति कांहीं केल्या उघडेनात.

इस्माइलला हें नवें स्वागत जरा चमत्कारिक वाटलें. त्यानें आपल्या पानांतली एक पुरी रंगूच्या पानांत फेकली. त्याला वाटलें अशा उपायानें तरी रंगूचें तोंड उघडेल. पण त्याचा प्रयत्न निष्फळ ठरला. रंगूनें आपल्याकडून आनंदी होण्याचा प्रयत्न चालवलाच होता. पूर्वस्मृतीनें तिच्या हृदयावर जोरानें हल्ला करण्यास प्रारंभ केला. अज्ञानानें उपभोगलेलें सुख पुन्हां मिळावें म्हणून तिचें हृदय धडपडूं लागलें. तिनें मनांत चाललेली विरोधी विचारांची खळबळ कशीबशी दाबून टाकली. इस्माईलकडे पाहून ती हंसली. इस्माईल त्या भेदक हास्यानें चकित झाला. हातांतला घास त्याच्या हातांतच राहिला. आपल्या वल्लभेचें तें प्रशांत हास्यमुख पहात असेंच रहावें असें त्याला वाटून तो तिच्याकडे पहात राहिला. मेघ दूर गेल्यामुळें भेटणाऱ्या शशांककमलिनीप्रमाणें त्या दोघांची दृष्टादृष्ट झाली.

दोघांचीं जेवणें संपलीं. रंगूनें एक विडा इस्माइला दिला. तिचा हात थरथर कांपत होता. थोड्याच वेळापूर्वीं लक्ष्मीच्या हातीं असाच विडा दिला. त्या देवतेची आपण आतांच्या कृत्यानें विटंबना तर करीत नाहींना? अशी तिला भीति वाटली. पण संकटांत सांपडलेला मनुष्य जसा बुद्धिभ्रष्ट होतो तशीच ती इस्माईलच्या सान्निध्यांत बुद्धिभ्रष्ट झाली. इस्माइलनें आपल्या खिशांतून एक गळ्यांत घालण्याची सोन्याच्या मोठ्या मण्यांची माळ काढली आणि ती हातावर झेलीत तो म्हणाला, "रंगू, ही घे आजच्या दिवसाची भेट. आज माझी तब्बेत फार फार खूष आहे." रंगूनें माळ घेण्याकरितां हात पुढें केला तो हातांत घेऊन इस्माइल हंसत रंगूकडे पाहूं लागला. प्रियाराधन अशा रीतीनें सुरू झालें. इस्माईलनें आपल्या हातानें ती माळ रंगूच्या गळ्यांत घातली. नव्या अलंकारानें आपल्या प्रियकरणीला शोभा आली कीं तिच्या गळ्यांत पडल्यानें त्या अलंकाराला शोभा आली हें गुलाबी कोडें सोडवण्यांत इस्माइल गर्क होऊन गेला. बाहेर चंद्रप्रकाश प्रत्येक वस्तुमात्रावर सौंदर्याचा मुलामा चढवीत होता. परप्रकाशी चंद्राच्या सहवासांत प्रत्येक वस्तुला स्वतःचें विस्मरण पडत होतें. चांदण्याच्या डोहांत प्रत्येक जण गटांगळ्या खात होता. इस्माइल आणि रंगू हृदयाशीं हृदय मिळवून स्वतःला विसरून जात होतीं. खऱ्या प्रेमाच्या प्रभावांत जात, धंदा, वैभव ह्या सर्व बाह्य गोष्टी विरघळून जातात. ह्याची साक्ष जगाला ते पटवीत होते आणि स्वतःला पटवून देत होते.

इस्माईल जाण्यास निघाला तेव्हां चंद्र आकाशाच्या मध्यावरून अस्तमानाकडे कलला होता. रंगू दाराच्या बाहेर पडली. तिनें त्या अस्तंगत होणाऱ्या चंद्राकडे पाहिलें. आपलें इस्माईलवरील प्रेम असेंच अस्तास जात आहे कीं काय अशा प्रकारची शंका तिच्या मनांत उद्भवली. तिचें अंतःकरण खिन्न झालें. निर्जीव गोष्टींचा सहवास सुद्धां मनाला चटका लावून सोडतो तर मग प्रेमासारख्या दिव्य सहवासानें मनाची काय स्थिती होत असेल आणि त्या सहवासाचा अंत-अखेर होणार ह्या कल्पनेनें अंतःकरणाला किती वेदना होत असतील ह्याची कल्पना प्रेमी जीवच करूं जाणें. रंगू घरांत परतली तेव्हां आपल्या अंतःकरणांतला कांहीं तरी भाग बाहेर ठेवून आली.

आणि इस्माईल--! तो दुप्पट उल्हासानें रंगूच्या घरांतून बाहेर पडला. परत जात असतां त्यावेळीं इस्माईलच्या डोक्यांत कोणत्या प्रकारचे विचार चालले असतील ?—जुळवीत आणलेल्या डावांतला शेवटचा दुवा जुळला कीं फत्ते असें आपल्या मनांत तो ठरवीत होता. हातालगतच्या पण हातीं न आलेल्या यशानें तो शेफारून गेला होता. बुद्धीनें मिळवून दिलेल्या विजयाची निशा त्याला आतांपासूनच चढत होती. जातां जातां तो लक्ष्मीच्या घरावरून जात होता. तो किंचित काळ थांबला. शिकारी फासांत अडकवलेल्या सावजाकडे ज्या अभिलाषबुद्धीनें पहातो तशीच नजर इस्माईलनें त्या घरावर टाकली. मग त्या घरात त्याचें सावज कोण होतें हें कळणें शक्य नाहीं. सदोबा अथवा लक्ष्मी कीं दोघेही गुंफलेल्या त्याच्या जाळ्यांत सांपडणार होतीं ?

---

# प्रकरण ११ वें

## बायको वीक

प्रेमभंगामुळें उदास झालेला मिलिंद ज्याप्रमाणें स्वदेश सोडून निघाला तशीच कांहींशी मल्हारीची स्थिती होती. खेडेगांवांतलें आपलें वैभव व नातेवाईक सोडून लक्ष्मीकरतां 'सप्तसमुद्र' ओलांडण्यांत मल्हारीनें आपल्या एकनिष्ठ अंतःकरणाची प्रेरणा मान्य केली. प्रेमभंगामुळें उत्पन्न झालेल्या निराशेचा आणि दुःखाचा विसर पडावा म्हणून मिलिंद आपल्या प्रेमविषयापासून दूर पळाला. तर तितक्याच तत्परतेनें तशाच प्रकारच्या दुःखांत सतत राहून आपल्या प्रेमविषयाची सेवा करण्याच्या उदात्त हेतूनें मल्हारी लक्ष्मीबरोबर कांचनद्वीपांत आला. स्वतःला उच्च व सुशिक्षित समजणारा मिलिंद आणि प्रेम हा शब्द ज्याच्या भाषाकोशांत नसेल असा मल्हारी ह्यांच्या वर्तनांतला केवढा हृदयस्पर्शी फरक हा ! एक प्रेमाला सूख मानतो आणि त्यागाचा प्रसंग येतांच डोक्यांत राख घालून प्रेमतत्वाला

सोडून देतो तर दुसरा हंसतमुखानें त्या त्यागाला कवटाळून प्रेमाचा शाहीर बनून प्रेमतत्वाची सेवा करण्याकरतां सुखाचा व सर्वस्वाचा त्याग करतो.

लक्ष्मीच्या दुःखांत तिच्या उपयोगी पडावें म्हणून जरी मल्हारी प्रयत्न करीत असे तरी दैव असें विचित्र कीं मल्हारीस अद्याप तशी संधीच प्राप्त झाली नव्हती. उलट ज्या किसनचा मल्हारी तिटकारा करी त्याची शुश्रषा करण्याचा मात्र त्याच्यावर प्रसंग आला. अशा विरोधी दैवानें मल्हारीच्या अंतःकरणाला चटका लावला. मानवी सामर्थ्य घमेंडखोरांच्या दृष्टीनें केवढेंही मोठें असलें तरी त्याची वास्तविक किंमत सर्वसमर्थ परमेश्वरापुढें अत्यंत अल्प आहे असेंच मल्हारीला वाटूं लागलें. अत्युच्च बुद्धिसामर्थ्यानें रचलेल्या योजना झंझावातांत केरकचरा सैरावैरा उडून जावा त्याप्रमाणें परमेश्वरी सत्तेच्या झंझावातांत कुठल्याकुठें नाहींशा होतात आणि एकवेळ येथें अशा शक्तिकार्य करीत होत्या ह्याचा मागमूसही रहात नाहीं. ह्या कटु पण सत्य जाणीवेपुढें बिचारा मल्हारी नम्र झाला. लक्ष्मीची सेवा करण्याचा प्रसंग कधींतरी साऱ्या आयुष्यांत आपल्याला येईल ह्या गोष्टीची वाट न पहातां प्राप्तपरिस्थितींत जीवित कंठणें मल्हारीला भाग होतें. अशा विलक्षण मनस्थितींत असतांनाच एके दिवशीं संध्याकाळीं किसनचा कांहीं निरोप पोंचवण्याकरतां तो इस्माईलकडे निघाला. इस्माईलच्या खोलीपाशीं येऊन त्यानें पाहिलें तो खोलीला कुलूप होतें. निरोप सांगणें तर अवश्य होतें. तेव्हां कसेंही करून इस्माईलला धुंडाळून काढून निरोप पोंचता केलाच पाहिजे. कांचनद्वीपाची वस्ती तशी फारशी मोठी नव्हती. तेव्हां सगळया वस्तीला जरी चक्कर मारण्याचें मनांत आणलें तरी फार वेळ लागणार नव्हता. शिवाय वेळ लागला तरी किसनची शिस्त मोडणें म्हणजे स्वतःचा काळ ओढवून घेण्यासारखे होतें. अर्थात् मल्हारी इस्माईलच्या शोधार्थ तेथून पुढें निघाला.

बराच वेळ फिरल्यानंतर मल्हारी जुगाराच्या अड्यावर आला. मागें एकदां वर्णन केलेला धांगडधींगा जसाच्या तसा चालू होता. जुगाराच्या अड्यांत आधुनिक युगांतील समतेचें तत्व पूर्णपणें अमलांत येत असल्यामुळें त्याचे सु (?) परिणाम एक समयावच्छेदें करून तेथें दृष्टोत्पत्तीस येत असत. मल्हारी थोडावेळ बाहेरच उभा राहिला. इस्माईल सदोबा वगैरे

तहयात सभासद तेथें होतेच. मल्हारीनें इस्माईलला खूण केली. इस्माईल बाहेर आला. इस्माईलनें निरोप ऐकला. मल्हारी निघून गेला.

मल्हारीनें आणलेल्या निरोपामुळें इस्माईलला विशेष आनंद झाल्यासारखा दिसत होता. तो निरोप ऐकून त्यानें कांहीं तरी गोष्ट मनाशीं निश्चित ठरवली. आपण योजलेल्या बेताला खुदानें किती वेळेवर सहाय्य दिलें असें वाटून त्यानें कृतज्ञतेनें आकाशाकडे पाहिलें.

खेळ संपला आणि इस्माईलनें सदोबाला खूण केली. सदोबा उठले आणि इस्माईलबरोबर चालूं लागले. इस्माईलनें सदोबाला आपल्या खोलीवर नेलें. दार उघडून दोघे आंत गेले. इस्माईलनें आपली आरामखुर्ची उकलली आणि स्वतः त्यावर पडला. सदोबा जमिनीवर बसला. आपल्या दाढीच्या केसांना कुरवाळीत इस्माईल म्हणाला, "हं—पाटील—तुम्हांला आज मी मुद्दाम इकडे बोलावलं. कां ते आलंच असेल तुमच्या लक्षांत?" सदोबानें तें बोलणें ऐकलें, इतकेंच नव्हे तर आपल्याला ह्या घरीं येण्याचा मान कां देण्यांत आला हेंही त्याला कळलें. एखाद्या शरमिंध्या माणसाप्रमाणें त्यानें इस्माईलकडे पाहिलें. इस्माईलचे डोळे आसुरी आनंदानें नाचत होते. सदोबाच्या दृष्टींतला ओशाळेपणा ओळखण्याइतके ते डोळे ठिकाणावर नव्हते. सदोबाकडून जबाब येत नाहीं हें पाहून इस्माईलनें पुन्हां प्रश्न केला, "कां—आमच्यावर इतकी इतराजी केली? आम्ही कांहीं तुमचा नकळत गुन्हा केला असल्यास कसूर माफ करा. पण ह्याच्यापुढें—" सदोबा ज्या दत्ताला भीत होते तेंच संकट अक्राळविक्राळ रूप धारण करून येत होतें. आधींच भित्र्या असलेल्या सदोबाच्या मनाची भीतीनें किती गाळण उडाली असेल ह्याची कल्पनाच करावी. तें संकट सदोबाला विराटरूपासारखें सर्वत्र दिसत होतें. चहूंकडून आपण त्या संकटांत बुडालों जात आहोंत अशा भावनेनें त्यांचा दम कोंडल्यासारखा झाला. इस्माईलला कांहीं तरी उत्तर हें दिलेंच पाहिजे म्हणून ते म्हणाले, "पण मला कांहीं मुदत—?" सदोबांचे शब्द अर्धवटच राहिले. त्यांनीं मुदत म्हणतांच इस्माईलनें आपला पाय जमिनीवर जोरानें आपटून तोच शब्द इतक्या जोरांत उच्चारला कीं, हजारों ठिकाणाहून आलेल्या प्रतिध्वनीप्रमाणें त्या शब्दानें सदोबाच्या कानठळ्याच बसल्या. तो प्रतिध्वनी किंचित्

ओसरतो न ओसरतो तोंच शब्दांचा सडसड वर्षाव सुरू झाला. सदोबा त्या वर्षावांत एखाद्या खुरटून गेलेल्या झुडपाप्रमाणें कांपत होता. इस्माईल गर्जून ओरडला, "मुदत? अझून मुदत मागतां? शरम नाहीं वाटत मुदत मागायला ? तुम्ही आहांत कोण ? माणूस कीं हैवान ? इतके दिवस दम धरला तो? तुमच्याकडे पाहून, नव्हे, तुमच्या घरच्या माणसांकडे पाहून !" हे शब्द इस्माईल खेंचून बोलला आणि त्यांचा सदोबावर काय परिणाम होतो हें पहाण्याकरतां किंचित् थांबला. शांतिब्रह्म सदोबा ऐकतच होते. त्यांच्या शरिरांतल्या रक्त वाहिन्यांतलें रक्त संथपणें वहात होतें. आपल्या घराविषयीं कांहीं अश्लील वाङ्मय हा मुसलमान रचीत आहे हें त्यांना कळत होतें कीं नाहीं हें सांगणें मोठें कठीण आहे. भीतिखेरीज कोणताही विकार त्यांच्या चेहेऱ्यावर दिसत नव्हता. इस्माईल पुढें बोलूं लागला, "तुमच्या घरच्या माणसांकडे पाहून आम्ही गय केली. तुमचा संसार सुखाचा व्हावा म्हणून आम्ही तुम्हाला आमची विद्या शिकवली. जवळचा पैसा दिला. तुम्हांला जामीन राहिलों—त्या सगळ्याचें उपकार मोठे छान फेडतां. मराठ्याची जातच बडी काफर, असे आमचे बापजादे सांगत आले. मराठ्याच्या तोंडांत हात घालणें आणि वाघाच्या तोंडांत हात घालणें दोन्ही सारखेच-दोघे बेमान ! अंगांत धमक नव्हती, डोक्यांत अक्कल नव्हती, तर बापाचा पैसा कर्जाऊ घेतलास कशाला ? आणि आतां फिरून मुदत मागत! सूवर! हराम जादा! काफर!" तो अग्निवर्षाव एकदांचा थांबला. सदोबा बधिर होऊन गेले होते. आपल्या पितरांचा उद्धार आज एका यवनाकडून होत आहे, आपल्या धर्मपत्नि संबंधी अवाच्य शब्द उच्चारले जात आहेत ह्याचें सदोबांना कांहींच वाटत नव्हतें. किनसच्या क्रूरपणाच्या गोष्टी ज्याप्रमाणें सदोबांना माहीत होत्या त्याच-प्रमाणें इस्माईलच्या किसनच्या दुय्यम अधिकाऱ्याच्या क्रूरपणाच्या कथाही ते जाणून होते. तसाच प्रसंग आला. ह्या सैतानाचे पैसे आपल्याकडून न फिटले-तर—नको तो भयंकर विचार ! सदोबा गलित धैर्य होऊन त्यांनीं अक्षरशः इस्माईलचे पाय धरले, आणि केविलवाण्या स्वरांत ते म्हणाले, "खान-साहेब, आतां पुन्हां मी मुदत मागणार नाहीं. ही शेवटचीच मुदत. आठ दिवसाच्या आंत तुमचे पैसे व्याजासुद्धां परत करतों. एवढ्या खेपेला गय करा. माझी एकच वेळ परीक्षा पहा. नाहीं म्हणूं नका, खानसाहेब, मी तुमचे

पाय धरतों. पण तुम्ही भलतें कांहीं मनांत आणूं नका. माझी सगळी स्थिति तुम्ही जाणतांच. तुम्हीच माझे गुरु. तुम्हीच माझे आईबाप.” इस्माईल पुन्हां कडकला, “पागल, तुझ्यासारखा नादान मुलगा पोटीं येतां तर कापून काढला असतां! कधीं सोडला नसता. अरे ज्याला बापजाद्याच्या नांवाची इभ्रत वाटत नाहीं. औरतीच्या–पण जाऊं दे तुला सूवरला काय समजणार ह्या खानदानी गोष्टी? तूं बऱ्या बोलानें पैसे काढ. दुसरें कांहीं आम्ही जाणत नाहीं!” किती सत्य गोष्टी इस्माईल बोलून गेला. बापजाद्याची इभ्रत धरणें आणि वाढविणें म्हणजे केवढी नामुष्कीची गोष्ट हिंदू लोकांना वाटते. ह्याची त्या अविंधाला काय कल्पना? हिंदू जातींतल्या स्त्रियांचा दर्जा किती हीन मानला जातो, हें त्याला काय माहीत! सदोबाला दूषण देतांना केवढ्या वास्तविक सत्याचें–प्रखर टीकेचें दान त्यानें हिंदुसमाजाला केलें होतें! सुशिक्षित–सुसंस्कृत समजणाऱ्या हिंदू सुपुत्रांना डोके उघडून झोंपणाऱ्यांना बापजाद्यांची इभ्रत सांगण्यांत काय अर्थ?

सदोबाला काय बोलावें हें सुचेना. कोणच्या उपायानें प्रस्तुत आपत्ति टळेल हें त्याला कळेना. कोणत्याही गोष्टीचा विचार करण्याची संवय सदोबाच्या डोक्यांत कधींच नव्हती. किंबहुना विचार करण्यासारख्या कांहीं गोष्टी जगांत आहेत असें सुद्धां त्याला वाटत नसावें. त्या बिचाऱ्यावर जेव्हां विचार करण्याची–एवढेंच नव्हे तर तावडतोब विचार करून त्याप्रमाणें आचरण करण्याचा बिनतोड प्रसंग येऊन ठेपला, तेव्हां त्याची अत्यंत अनुकंपनीय स्थिती झाली. सर्व भेकड लोकांचा एकच मार्ग शरण जाणें तो तर सदोबा अमलांत आणून चुकले होते. त्याचा इस्माइलवर कांहींच परिणाम होत नव्हता. चारी बाजूंनीं वणवा पेटावा आणि त्यांत एखादें हरीण सांपडावें तशी सदोबाची स्थिती झाली. शेवटीं सदोबानें विचार करायचा असें ठरवलें. सदोबाचे विचार सुरू झाले. फार दिवस ठाणबंदी ठेवलेल्या घोड्याप्रमाणें सदोबांचा विचारवारु जागजागीं अडूं लागला. उलटसुलट फिरूं लागला. इतकेंच नव्हे तर आपल्या आवडत्या धन्याला आपणाला आजपर्यंत शीण न देण्याच्या उपकाराबद्दल लाथाच्या स्वरूपांत आभारप्रदर्शन करूं लागला. सदोबा विचार करून बोलले, “खानसाहेब, आपण म्हणतां तें खरं! मी आजपर्यंत मुदत मागायला नको होती. पण

तुम्हीं पहातांच आहां कीं मजजवळ तांब्याचा तुकडा ठेवून मी तुम्हांला कांहीं दिलें नाहीं असें कधीं झालं आहे का ? बायकोच्या अंगावरचे सगळे दागिने मी आपल्या ताब्यांत पूर्वीच नाहीं का दिले ? आतां तुम्ही असं करा..." " सदोबा आपला अत्यंत खोल विचार पुढें मांडूं लागले— " माझ्या पगारांतून फेड करून घेत जा—म्हणजे जाईल तेव्हांच फिटून सारं कर्ज ! "

" तर, तर, इस्माईल हेटाळणीच्या स्वरानें म्हणाला, " तसाच बडा अंमलदार आहेस किनई—हजार पांचशें रुपये दरमहा जसा कांहीं घरांत येतो—म्हणे माझ्या पगारांतून फेडून घ्या—पंचवीस टिकल्या पगार नाहीं अन् पांचशें रुपयांची फेड करतो—तें कांहीं नाहीं—तू वाटेल तें कर आणि माझे पैसे मोज—"

सदोबा पुन्हां विचार करूं लागले. एखादा नाठाळ विद्यार्थी अभ्यासांत चुकारतट्टूपणा करूं लागला म्हणजे ज्याप्रमाणें एकच धडा त्यास पांचदां दहादां लिहावा लागतो तशीच बिचाऱ्या सदोबाची स्थिति होती. आजपर्यंत त्यांनीं चुकवलेला विचाराचा धडा त्यांना पुन्हां पुन्हां गिरविण्याची शिक्षा देव करीत होता. सदोबा असहाय्य होऊन मुकाट्यानें ती शिक्षा भोगीत होते. आजपर्यंत चढत असलेला ( अर्थात् त्याच्या मतानें ) नशिबाचा तारा आतां गोते खाऊं लागला. साक्षात् लक्ष्मीसारख्या असणाऱ्या बायकोबरोबर ज्यांचा संसार होऊं शकला नाहीं अशा अभद्र गुणांचें तें बाळ कर्जानें नाडलें गेलें. इस्माईलसारखा सैतान आपल्या भक्ताची कसोटीच पहात होता. अगदीं शेवटचें म्हणून सदोबा म्हणाले, " खानसाहेब—मला तर कांहींच सुचत नाहीं—तुम्हींच सांगाना एखादा उपाय—तुम्ही म्हणाल तें मी ऐकेन—पण मला वांचवा हो—मला ह्या कर्जांत मारूं नका—" त्या अजागळ भक्ताचें तें स्तवन ऐकून इस्माईल फारच प्रसन्न झाला. त्यानें आपणापुढें अगतिक झालेल्या त्या वीराकडे (?) एकवार समाधानानें पाहिलें. त्याच्या मनाला फार फार संतोष झाला. टाकलेला डाव बरोबर जुळला ह्या विजयाच्या उन्मादानें त्यानें विकट हास्य केलें आणि तो म्हणाला, "—उपाय ? अगदीं सोपा—कर्ज फिटत नसेल तर—तर—वीक आपली बायको आणि हो मोकळा—"

# प्रकरण १२ वें

## ' मला काय त्याचें ? '

कर्जातून मोकळा होण्याचा अत्यंत सोपा उपाय इस्माईलनें सांगितला आणि सदोबानें ऐकला. घरांतल्या शेळ्यामेंढ्या विकायला सांगितल्या असत्या तर एखाद्यानें कदाचित् विरोध केला असता; कांहींसा सात्विक संताप त्याला आला असता पण सदोबा असले खंबीर कीं त्यांना प्रत्यक्ष आपली धर्मपत्नि विकायला सांगितली तरी त्यांनीं थोडासुद्धां विरोध केला नाहीं, किंवा त्यांच्या मनांत त्या विक्रय सूचनेनें विशेष गोंधळ माजला नाहीं.

तो उपाय ऐकून सदोबा इस्माईलच्या घरून निघाले. दारांपासून कांहीं हातावरून कुणीतरी इसम अंधारांत निघून गेल्यासारखा त्यांना वाटला. पण स्वत:संबंधीच्या भीतींत चूर असलेल्या सदोबांनीं तो कोण होता ह्याचा फारसा विचार केला नाहीं. ते घोपटरस्त्यानें आपले घर गांठीत होते. तो इसम त्यांच्या मागोमाग जात होता. सदोबाशीं कांहीं तरी बोलावें अशी त्याला फार उत्सुकता असावी. कारण एकदां दोनदां त्यानें तसा जलदीनें जाऊन सदोबाला गांठण्याचा प्रयत्न केला. पण कां कुणास ठाऊक, त्याचा विचार एकदम बदलला आणि तितक्या झपाट्यानें त्यानें आपला मार्ग बदलला. सरसर पावलें टाकीत तो मिलिंदाच्या खोलीजवळ आला आणि त्यानें जोरानें दारावर थाप मारली. आंतून मिलिंदानें दार उघडलें. मल्हारीला पाहून आश्चर्यानें मिलिंद उद्गारला, "कोण मल्हारी—ह्यावेळीं कुठें इकडे—" मिलिंद आणखी कांहीं विचारणार होता पण मल्हारीच्या मुद्रेकडे लक्ष जातांच तो थबकला. मल्हारीचा संताप—इतका थरास गेलेला संताप-मिलिंदानें अद्यापपर्यंत पाहिला नव्हता. मिणमिण जळणाऱ्या दिव्याच्या प्रकाशांत चेहऱ्यावरच्या रंगाची आलटापालट जरी ओळखूं येण्यासारखी नव्हती तरी पण स्थूलमानानें दिसणारे फरक सुद्धां स्तिमित करण्यासारखें होते. मल्हारीच्या नसानसांतून संताप खवळून वहात होता. नव्हे एखाद्या वेगवान जलप्रवाहाप्रमाणें धाडधाड उड्या टाकीत चालला होता. त्या संतापाच्या लहरी हातांतून निसटून जाऊं नये म्हणून

त्यानें हाताच्या मुठी घट्ट दाबून धरल्या होत्या. खोलींत शिरल्यावर कांहीं वेळ तसाच गेला. मिलिंदाचा प्रश्न मल्हारीनें ऐकला किंवा नाहीं हें सांगतां येत नाहीं, पण त्यानें एक तीव्र दृष्टीक्षेप केला आणि तिक्त स्वरांत तो एवढेंच म्हणाला, "नादान माणूस" भावनाप्रधान मिलिंदाला त्या शब्दांचा उलगडा झाला नाहीं, तरी पण मल्हारीच्या भावनांच्या प्रवाहाला तोंड फुटलें हें त्याला त्या दोन शब्दावरून दिसलें. मिलिंदानें मल्हारीचा हात हातांत धरला आणि मृदु स्वरांत तो म्हणाला, "मल्हारी—कुणावर आज तूं इतका रागावला आहेस? स्वत:ला का उगाच त्रास करून घेतोस?" त्या सहानुभूतीनें मल्हारीच्या उसळून वाहाणाऱ्या रागाला बांध घातला गेला. अकारण काळजी वाहाणाऱ्या मिलिंदाच्या मुखाकडे त्यानें तटस्थपणें कांहीं वेळ पाहिलें. लगन्त तो थोडा शांत झाला. त्यानें विमनस्कपणें उत्तर दिलें, "मिलिंद—कांहीं तरी भयंकर प्रकार घडणार एवढें खास—काय तें मला नक्की सांगता येत नाहीं, पण ह्या साऱ्यांचा संबंध तिच्याशीं आहे. तिच्याकरतां हें सगळं चाललें आहे. तिच्यावरच कांहीं तरी संकट ओढवणार." मल्हारीच्या ह्या उत्तरानें मिलिंद अर्थातच विशेष 'प्रकाशीत' झाला नाहीं. म्हणून त्यानें पुन: विचारलें, "अरे पण हें—सगळें हें—सारं—ह्याचा अर्थ काय?" त्यावर सावकाशपणें मल्हारीनें इस्माईलच्या घरीं घडलेला सगळा प्रकार सांगितला. तो प्रकार सांगत असतांना तो प्रसंग त्याच्या डोळ्यापुढें उभा राही आणि त्यामुळें उत्पन्न होणाऱ्या रागानें त्वेषानें तो वर्णन करताना अडखळे. लक्ष्मीची होणारी विटंबना लक्षांत येतांच मिलिंद सुद्धां चेतला. संसर्गानेंच नव्हे तर खरोखरच अगदीं आंतून त्याचें अंत:करण पेटलें. चहूंबाजूनीं अंध:कारमय झालेल्या त्याच्या आयुष्यांत लक्ष्मीच्या रूपानें, गुणानें एक दिव्य किरण वास करीत होता. पण इस्माईलसारखा राहू त्याही किरणाचा खग्रास ग्रास करायला जोरानें धावत येत होता. एखाद्या भेसूर कल्पनेप्रमाणें त्या भावी चित्राची पडछाया मिलिंदाच्या अंत:पटावर पडून त्याचे चित्त विचलित झालें. त्याचें लक्ष मल्हारीकडे गेलें तों मल्हारी कांहीं तरी स्वत:शींच विचार करीत होता. कव्हा केव्हां त्याचे विचार उच्चाररूपानें बाहेरसुद्धां पडत होते, त्यांतील कांहीं शब्द मिलिंदाच्या कानावर पडले. मल्हारी म्हणत होता, "बेहत्तर आहे जान गेली तर! पण त्या मुसं-

डयापुढें तर त्या गाईची कुरबानी होऊं देणार नाहीं. " मिलिंदाचे विचाराचा ओघ आतां पूर्णपणें मल्हारीच्या भावनेशी मिळता झाला होता. तें मल्हारीचे त्वेषाचे शब्द ऐकून तो म्हणाला, "" हो हो, मल्हारी तूं आणि मी आपण दोघे त्या मुसलमानाला पुरून उरूं—आपल्यासमोर लक्ष्मीची विक्री करील म्हणजे—बिशाद काय त्याची—खांडोळी खांडोळी करून टाकूं त्याच्या हाताची. "

कांहीं वेळ त्या संतापाच्या भरांत दोघेही गप्प बसले. एखादी वावटळ निघून गेल्यावर ज्याप्रमाणें तिचे परिणाम सूक्ष्मपणें पहातां येतात तशीच कांहींशी स्थिति रागानें बेफाम झालेल्या माणसाच्या बाबतींत होत असेत. त्या वावटळीनें अगदीं हलकीं पानें पाचोळा व धुरोळा हींच काय ती क्षणकाल असा धुमाकूळ घालतात कीं, पहाणाराला त्याक्षणीं तरी वाटतें केवढी प्रचंड शक्ति ! पण ती निव्वळ भूल असते. एखाद्या घमेंडखोराच्या शब्दाप्रमाणें निवळ डोळ्यांत टाकलेली ती धूळ असते. ह्या बाह्य स्वरूपानें माणूस नेहमींच फसतो. कुठल्याही प्रसंगाचें मुळीं वैशिष्ट्यच हें असतें. त्याच्या बाह्य उग्रतेमुळें कुणालाहीं त्याच्या अंतरंगाचा ठाव घेण्याचें धाडसच होत नाहीं. मिलिंद आणि मल्हारी ह्या दोघांचा राग असाच एखाद्या वावटळीसारखा होता. शब्दाचा धुरोळा जरी खूप उडाला तरी प्रत्यक्ष संकटाच्या दगडाचा कोपरासुद्धां त्या वावटळीनें हालला नाहीं. इस्माईलची खांडोळी करायची हें खरें पण मांजराच्या गळयात ही गांठ बांधायची कशी? आकाशाला गवसणी घालायची कशी ? शात झालेल्या मिलिंदाला आणि मल्हारीला हेच प्रश्न नंतर भेडावू लागले. एखादा उदात्त स्वरूपाचा ठराव पास केल्यानंतर त्या सभेंतले वाग्भट त्या ठरावाचा अंमल कसा करावयाचा ह्या विचारानें गोंधळून जातात आणि बहुतेक प्रसंगीं आपण ठराव केला. आपण आपलें कर्तव्य केलें, त्या ठरावाची अंमलबजावणी करण्याचें काम आतां देशाकडे आहे असा फसवा व्यामोह स्वतःवर पांघरून स्वस्थ बसतात. तशीच अगतिक स्थिति बिचाऱ्या मिलिंद—मल्हारीची झाली. इस्माईलची कांचनद्वीपांत केवढी हुकमत चालते हें त्या दोघांना पूर्णपणें ठाऊक होतें. इस्माईलच्या शक्तीस विरोध करील, यशस्वी प्रतिकार करील, अशी एकच शक्ति अवघ्या कांचनद्वीपांत होती.

पण त्या शक्तीकडून इस्माईलला विरोध व्हावा अशी अपेक्षा करणें आणि प्रत्यक्ष परमेश्वरानें आपली माया आवरून ह्या जगताची मुक्तता करावी अशी अपेक्षा करणें दोन्हीं सारखींच ! इस्माईल म्हणजे किसनसारख्या अत्यंत प्रबल सैतानानें उत्पन्न केलेली एक भयंकर माया होती. किसनरूपी शंकरानें आपल्या तपश्चर्येचें फळ म्हणून उत्पन्न केलेला तो भस्मासूर होता. त्या भस्मासुरानें सगळ्या कांचनद्वीपांत थैमान घालायला सुरवात केली होती. त्याच्या सपाट्यांत सांपडेल ती वस्तू त्याला वश होत होती अथवा भस्मीभूत होत होती. स्वत:च्या शक्तीचा स्वत:लाच मारक असा कटु अनुभव भोगण्याचें नशिबीं येणें ह्यासारखें खडतर प्रायश्चित्त दुसरें कोणतें असणार ! मिलिंद आणि मल्हारी अगतिक झाले. त्या प्रचंड आसुरी शक्तीपुढें अत्यंत सात्विक पण दीनवृत्तीचे तें तरुण किंकर्तव्यमूढ बनलें. किसन आपल्याला सहाय्यक होईल का ? किसनच्या सहाय्याची अपेक्षा करणें म्हणजे चोराच्या सहाय्याला एखादा दरवडेखोर बोलावण्यासारखेंच आत्मघातकीपणाचें होतें. मग काय करायचें ? शब्द बोलून गेलों, प्रतिज्ञा उच्चारून बसलों पण पुढें काय ? ह्या प्रश्नानें मिलिंद आणि मल्हारी ह्यांची अंत:करणें अगदीं तळापासून हलवली गेलीं. त्या खळबळीनें दोघेही अत्यंत अस्वस्थच झाले.

\+ + + +

ज्यावेळीं मल्हारी आणि मिलिंद अशा प्रकारची विचार–विकारांची आंदोलनें सहन करीत होते, त्याचवेळीं सदोबा निराळ्या प्रकारची आंदोलनें सोशीत होते. ज्या प्रश्नानें त्या दोन तरुणांना अस्वस्थ करून सोडले होते तो प्रश्न सदोबाची परीक्षा पहात होता. सदोबा विचार करीत होते. त्यांच्यापुढें त्यांची तंबाखू एका बटव्यांतून बारीक डोळ्यानें त्यांच्याकडे पहात होती. जणूं काय आपल्या भक्तानें आपले सेवन करण्याचें सोडून हा जो विचारसेवनाचा नवा उपक्रम सुरू केला होता त्याबद्दल रागावून अगदीं फिरंगटून ती तंबाखू बटव्याच्या एका कोपऱ्यांत जाऊन बसली होती. सदोबा मधून तिच्याकडे आपला वत्सल हात नेत पण ती अवमानित स्त्रीप्रमाणें त्याच्या हातीं मुळींच लागत नसे. सदोबा बसले होते त्या

ठिकाणीं पूर्ण अंधार होता. जणूं काय त्यांच्या अंतःकरणांतील अंधारानेंच बाहेरच्या विश्वव्यापी अंधाराला साथ होऊन सदोबाला धीर देण्याचें काम चालविलें होतें.

सदोबा आपल्या विचार गेहांतील कोळीष्टकें झाडीत होते. त्यांच्या पुढचा प्रश्न अतिशय सरळ आणि साधा ( अर्थात् त्यांच्या दृष्टीनें )होता. त्या प्रश्नाचा एवढा मोठा विचार तरी का करायला हवा? हेंच त्याला समजत नव्हतें. पण मूर्ख लोकांचा कुठल्याही प्रसंगांत दुसऱ्याचें अनुकरण करण्याचा अथवा कांहीं तरी करून स्वतःला फसविण्याचा—स्वतःला कर्तव्य निष्ठ भासवण्याचा जो सांप्रदाय आहे त्याला अनुसरूनच सदोबा वागत होते. एखाद्या चिकित्सकाचा आव आणून सदोबा बसले होते, आणि विचार केला असें भासवीत होते. त्यांनीं आपल्या तुटपुंज्या अकलेचे दोन विभाग केले आणि दोन कोंबडीं झुंझवणाराप्रमाणें ते त्या दोन विभागांना समोरासमोर नाचवीत होते. त्या दोन विभागांची झुंज चालू असतां सदोबाला मोठें समाधान वाटत होतें. इस्माईलविषयींची त्याची भीति आतां कुठल्याकुठें पळाली होती. त्यांनीं पुढील प्रश्नांची समाधानकारक विल्हेवाट लावली होती.

सदोबांनीं आपल्या अभिनव पद्धतीनें त्या प्रश्नाची विल्हेवाट लावली होती. त्यांच्या दोन विभागांचीं प्रश्नोत्तरें मननीय होती. ते दोन्ही विभाग पुढीलप्रमाणें प्रश्न आणि उत्तरांचा तमाशा करीत होते व त्यांतले सोंगाडे सदोबा झील ओढीत होते.

एक विभाग विचारीत होता, " बायकोला विकणें म्हणजे काय ? "

दुसरा विभाग तत्परतेनें उत्तर देत होता, " आपल्या नडीच्या वेळीं एखादी वस्तू विकण्यासारखेंच ! "

प्रथम विभाग विचारी, " बायको म्हणजे काय ? "

दुसरा विभाग " खरंच बायको म्हणजे काय—हा प्रश्नच करणें मुळीं वेडेपणाचें आहे. बायको म्हणजे काय, एवढा विचार करणें म्हणजे भलत्याच गोष्टीला महत्त्व देणें—बायको—समजा एखाद्याच्या घरचा कामाचा पसारा वाढला म्हणजे तो नाहीं कां तीन चार बायका करीत? त्या ठिकाणीं

बायको म्हणजे वाढत्या कामाचा पसारा आवरण्याकरतां कायम करारानें घेतलेली स्त्री—तोच कामाचा पसारा कमी झाला--बऱ्यावर एखादा प्रसंग आला तर त्या तीन चार बायकांपैकीं एखादी विकून टाकली म्हणून कुठें बिघडलें? त्या तीन चार असतात म्हणून काय त्या बायका नव्हेत? आणि ही एकटी म्हणून हिच्यासंबंधीं तेवढा विचार करायचा? तिचा उदे उदे करायचा? तिला डोक्यावर चढवायचं ? ही कुठली रीत--हा कुठला व्यवहार ? ते कांहीं नाहीं. प्रसंग आला तेव्हां कुणी तरी आपला मुलगा चिरून त्यांचें मांस शिजवून पाहुण्याला जेवूं घालतेंच कीं नाहीं ?"

सदोबा सैतानानें वेदाचा आधार घेतला. चिलियाबाळाचें हवन करून अतिथि धर्मपालन करणाऱ्या उदात्त स्त्रीच्या नांवाला सदोबांनी असा अहेर केला. पूर्वपरंपरेचा आधार घेऊनसुद्धां सदोबाचें समाधान होईना. आपला प्राण जाण्याचा संभव उत्पन्न झाला असतां बायकोची फिकीर करायची—तिला जतन करायची हा कुठला न्याय ? सदोबा अशा रीतीनें आपलें अंतःकरण पटवीत होते. पण कां कुणास ठाऊक, त्यांचें चित्त समाधान पावेना. त्यांच्या समोरच एका रकट्यावर लक्ष्मी गाढ झोंपेंत निजली होती. आपल्यासंबंधीं आपल्याभोंवतीं कांहीं तरी विशेष प्रक्षुब्ध वातावरण होत आहे ह्याची तिच्या पवित्र मनाला कल्पनाही नव्हती. आकाशांत विजांचा कडकडाट चालू असतांना आणि प्रतिक्षणीं त्या विजेच्या कोसळण्याची धास्ती असतांना एखादे कोवळें पान अगदीं अल्लडपणें खुशाल नाचत असावें. स्वतः-च्याच चिमुकल्या जीवनानें डोलत असावें, तशीच लक्ष्मीची स्थिती होती. तिच्या जीवनाचें चिमुकलें पान पुत्रपदाच्या विश्वासावर पूर्ण समाधनांत रंगलें होतें. तें पान खुडून टाकून त्याचा चोळामोळा करून, स्वतःच्या आसुरीवृत्ति शांतविण्याकरितां इस्माईलसारखा अधम तयारी करीत होता, ह्याची त्या पानाला कल्पनाही नव्हती. मल्हारीमिलिंदासारखे तरुण आपल्या जीवाचें रान करून तें पान वाचवण्याच्या विचारांत असतील अशीही अपेक्षा त्या चिमण्या जीवाला नव्हती. फार काय असा, धकाधकीचा मामला चालू असतां प्रत्यक्ष, आपल्या धर्मपत्नीचें पातिव्रत्य प्राण संकटाच्या अत्यंत नजीक असतां, तें पातिव्रत्य रक्षण करण्याची ज्याच्यावर नैतिक जबाबदारी तो—तो तिचा पति एखाद्या खुशाल चेंडू प्रमाणें अगदीं स्वस्थ राहून ती धडपड पहात होता.

पति आणि पत्नि ह्यांचे संबंध तो जाणीत नव्हता. स्वतःचें उदरंभरण व प्राणरक्षण ह्या करतां बाकी कोणत्याही गोष्टीचा विचार करायला तो तयार नव्हता. त्याची स्वतःची जवळ जवळ खात्री झाली होती. त्यानें अत्यंत पोक्त विचार करून ठरवले होतें कीं इस्माईलनें आपली बायको काढून नेली तरी आपण होऊन त्याला अडथळा करायचा नाहीं, इतकेंच नव्हे तर त्याला आपण होऊनच आपल्या बायकोला घेऊन जा आणि मला कर्ज-मुक्त कर असें म्हणावयाचें. बिशेषतः उत्तरोक्त बाणेदार विचारानें व निश्चयानें सदोबाला वाटलें आपण आपल्या जबाबदारींतून सुटलों. आतां ह्यापेक्षां ह्याबाबतींत आपण काय अधिक करणार ? एवढें झाल्यावर कांहीं होवो सदोबांना वाटत होतें–' मला काय त्याचें ? '

---

# प्रकरण १३ वें

## ' पापाची पार्श्वभूमि '

मुंबानगरींतील एका राजरस्त्यावर निरनिराळ्या मनोवृत्ति माणसांचे देह धारण करून स्वैरपणें वावरत होत्या. कुणी घोड्याच्या गाडींत एक-टेच एक बसून लक्ष्मीचे आपण एकटेच वल्लभ आहोंत अशा समजुतीनें ऐटींत बसून चालले होते. अर्थातच अशा लक्ष्मीवल्लभांचें लक्ष पायवाटेनें जाणाऱ्या गरीब बिचाऱ्या मजुरांकडे अथवा कारकुनीपेशा स्वीकारून त्यांतच आपल्या शरीराचा ' जोहार ' करायला निघालेल्या कांहीं कारकु-नांकडे असे. त्या हीनदीन प्राण्यांची स्थिति समोर असल्यामुळेंच त्या लक्ष्मीकांतांना समाधान वाटत असे. त्या समाधानाची एखादी दुसरी ' फ्लूट ' घशाखालीं जाते न जाते तोंच लक्ष्मी थोड्या उच्चस्वरूपांत एकाद्या चकचणाऱ्या मोटारगाडींतून ' पों पों ' असा आवाज करीत त्यांच्या समोरून जणूं काय त्यांना धिक्कारून निघून जाई. मोटारीच्या रंगानें पूर्वोक्त पुरुषोत्तमांचे डोळे दिपून जात. तिच्या धडधडणाऱ्या आवाजानें ह्यांच्या काळजाचा ठाव सुटे आणि तिच्या गतीनें तर जन्मभर

आपण धडपडतों तरी ह्या चंचल लक्ष्मीचा हात तर दूरच राहो पण तिच्या चरणधूलीचा एखादा कण तरी हस्तगत करतां येईल किंवा नाहीं हा विचार मनांत येऊन क्षणापूर्वी स्वतःला श्रीमंत समजणारे पण आतां 'गरीब बिचोर' झालेले खिन्न होत ! निराश होत ! आणि क्वचित् प्रसंगीं ह्या खिन्नतेचा सूड त्यांना वाहून नेणाऱ्या मुक्या जनावरांवर काढीत! जगाचा न्यायच असा चमत्कारिक आहे. सुखानें चार घांस ज्यांना मिळतात त्यांनीच आपल्याला अधिक सुख मिळत नाहीं, म्हणून अर्धपोटी–उपाशी रहाणारांना छळावें ! हें रुचिवैचित्र्य–हें आचारवैचित्र्य खरोखरच दुःसह असतें पण तें निरंतर रहावें ह्यांतच रहस्यमय संसार भरला आहे, नव्हे भरून उरला आहे. गाडीघोड्याचे धनी आणि मोटारचे धनी लक्ष्मीच्या मागें अशा चुरशीनें धावत होते–स्वतःशीं अत्यंत असमाधानी होते. त्याचवेळीं एखादा मजूर निढळाच्या घामानें कमावलेल्या 'दरिद्री लक्ष्मीचा' उपभोग एखाद्या रस्त्याच्या कडेला बसून घेतांना दिसून येऊन भूमातेनें कडेवर घेतलेलें तें लेंकरूं अत्यंत गलिच्छ दिसे. पण सात्विकतेचें पाणी त्यांतूनही चमके आणि क्षणकाल दृष्टि मोहून टाकी. परोपजीवी वृक्षांवर वाढलेल्या बांडगुळाप्रमाणें एखाद्या आंधळ्याला रस्त्यावरच दिसून येत. संसाराच्या सुखकर सुरवातीला फळाफुलांचा नैवेद्य दाखवावा म्हणूनच कीं काय एखादा 'टिकिट कलेक्टर' प्रवाशांचा मूर्खपणाचा फायदा घेऊन लुबाडलेल्या चारदोन आण्यांत एखादी फुलाची वेणी व एखादेंच मोसंबें घेऊन आपल्या त्या स्टेशनवरील ऐटींतच जातांना दिसे. मुंबईतली लक्ष्मी अशा प्रकारें नानारूपें धारण करून आपल्या भक्तगणांना खेळवीत होती, आणि त्या राजरस्त्याच्या दोन्ही बाजूंनीं उंच मान करून उभ्या राहिलेल्या इमारती कुणी टवकारून तर कुणी आपल्या खिडक्यांचे डोळे किलकिले करून तीं रूपें पहात होत्या. जडत्वानें नटलेल्या त्या इमारती म्हणजे आपलीं वस्तीस्थानें अथवा विलासगृहें ह्याच एका दृष्टीनें सामान्य जन त्यांच्याकडे पहात असल्यास नवल काय ?

जडसृष्टीचें तें आवरण भेदून त्या इमारतीकडे पहाणारा–त्या राजरस्त्यावर वावरणाऱ्या निरनिराळ्या मनोवृत्तीकडे आणि बहुविध रूपांत नटलेल्या लक्ष्मीकडे पहाणारा–ह्यांचें अंतरंग आपल्या भेदक दृष्टीनें निरखून

त्यांचा विचार करणारा—एखादा साधु अथवा सैतान त्या ठिकाणीं होता काय? साधु म्हणा अथवा सैतान म्हणा पण एक व्यक्ति मात्र एका विवि-क्षित इमारतीकडे पहात पहात चालली होती. तिसऱ्या मजल्यावरच्या एका खिडकींत एक लहानशी तुळशीची कुंडी टांगली होती. कुंद झालेल्या हवेंतून क्षणकाल मोकळा सुटणारा वारा त्या तुळशीला मधूनच स्पर्श करून जात होता. खिडकींत एक तरुणी आपल्या लहानग्या मुलीला आपल्या उराशीं किंचित मोकळेपणानें धरून रस्त्यांतली मौज पहात होती त्या मुलीचे गोंडस हात आपल्या आईच्या गळ्याभोंवती स्वैरपणें क्रीडत होते. भुसभुशीत अशा वाळूच्या किनाऱ्यावर सागराची चिमुकली लाट ज्याप्रमाणें अगदीं अल्लडपणें त्या वाळूंत घुसते आणि तेथेंच रमते, तशीच त्या मुलीच्या हातांची स्थिति होती. भूमातेप्रमाणेंच ती वत्सलमाता आपल्या लेकरांकरतां क्षणांत पाण्याहून पातळ होत होती, तर क्षणांत हिमालयाप्रमाणें शांत गंभीर होत होती. किसन तो प्रकार पहात होता. नव्या दृष्टीनें हिंदुस्थानांत परत आलेला किसन फिरून प्रत्येक वस्तूंत नाविन्या-चाच अनुभव घेत होता. साध्या गोष्टींतल्या असामान्यत्वानें त्याची दृष्टि तरळत होती. त्या विशिष्ट इमारतींतली ती आई लेकरांची लीला पाहून किसन स्तब्ध होता. त्याच्या दृष्टीसमोरचा काळ वेगानें कशांत तरी विलीन होऊं लागला. आणि उलटया गतीनें आपल्या उदरांतली अस्पष्ट झालेलीं चित्रें भराभर किसनच्या नजरेसमोर सरकवूं लागला. किसन आपल्या पायानें पुढें चालला होता पण तीं त्याच्या मनःचक्षूंसमोर सरकणारीं चित्रें त्याला सारखीं मागें मागें खेचीत होतीं. त्याचें चित्त त्या तुळशींत टांगून राहिलें होतें आणि त्याचा जीव त्या गवाक्षाभोंवतीं चकरा मारीत होता. शारिरीक आणि मानसिक शक्तींचा परस्परांच्या विरुद्ध असा अटीतटीचा सामना चालला होता. किसन परतला. त्यानें नीट त्या इमारतीच्या पायऱ्या चढण्यास सुरवात केली. कोणती चमत्कारिक जिज्ञासा त्याच्या अंतःकर-णांत उदित झाली होती? तो तिसऱ्या मजल्यावरच्या त्या खोलीसमोर येऊन उभा राहिला. अगदीं एखाद्या पूर्ण माहितगाराप्रमाणें त्यानें आजू-बाजूला पाहिलें. त्या खोलीच्या दारावर एक छोटी पाटी लावली होती आणि अ. ना. धायकुटे हीं अक्षरें येणाऱ्या जाणाराकडे मोठया कौतु-

कानें टवकारून पहात होतीं. किसननें हीं अक्षरें वाचलीं. एक काळ असा होता कीं, आपल्या नांवाची पाटी—किसननें आत्मसंयमन केलें. त्या खोलीच्या किंवा आंत उभ्या असलेल्या तरुणीचा अथवा तिच्या मुलीचा कुणाचाही विचार करावयाला तो थांबला नाहीं. सरसर तो जिन्याच्या पायऱ्या उतरला आणि पुन्हां त्यानें रस्ता आक्रमण्यास सुरवात केली.

किसन रस्त्यावर आला तेव्हां त्याच्या मनाचें आंदोलन बरेंच कमी झालें होतें. आजपर्यंतच्या शिस्तीच्या विरुद्ध झालेल्या वर्तनानें किसन स्वतः-वर संतापला. त्यानें एक 'टॅक्सी' बोलावली आणि उद्दिष्ट स्थळाचा निर्देश करून तो तींत बसला. मोटारगाडीची घडघड सुरू झाली. आणि वेगानें एकामागून एक रस्ते टाकीत ती मोटार चालूं लागली. 'कोटांत'ल्या एका गल्लींत यांत्रिक सामानाचें एक जंगी दुकान होतें त्याच्यासमोर गाडी थांबली. किसन गाडींतून उतरला. द्वाररक्षक पुढें होऊन त्यानें अदबीनें सलाम केला. किसननें आपल्या नांवाची परिचय पत्रिका त्या नोकराच्या हातीं दिली. तो नोकर ती पत्रिका घेऊन दुकानाच्या मुख्याजवळ गेला.

'राजा--किसन--कांचनद्वीप' हीं अक्षरें वाचतांच सगळ्या दुकानांत एकच गडबड उडाली. दुकानचा मुख्य अत्यंत तत्परतेनें किसनजवळ येऊन उभा राहिला. पाश्चात्य पद्धतीनें दोघांची भेट झाली आणि किसन आपल्या उद्दिष्ट कार्याकडे वळला. त्यानें निरनिराळीं यांत्रिक सामुग्री पाहिली आणि त्याला जें जें यंत्र अगर त्याचे सुटे भाग घ्यावयाचे होते त्यावर त्यानें खुणा केल्या. चांदी सोनें देऊन किसननें लोखंड विकत घेतलें. कांचनद्वीपांत सोन्याचा धूर निघावा. लक्ष्मीनें आपल्या कृपेची अपेक्षा करीत तिष्ठत एखाद्या दासीप्रमाणें आपल्यापाशीं राबावें म्हणून किसननें नव्या योजनेकरतां नवी यांत्रिक सामुग्री खरेदी केली. त्या खरेदींत त्याचा बराच वेळ मोडला. यंत्र कसें पाठवावयाचें वगैरे संपूर्ण माहिती देऊन किसन निघाला. दोन अडीच तासांत किसननें अर्धा लाख रुपयाची खैरात करून टाकली. किसन जेव्हां दुकानांतून बाहेर पडला तेव्हां ते यंत्राचे काळे काळे भाग उघड्या बोडक्या दगडासारखे आपल्या धन्याकडे पहात होते. आम्ही तुझे होत आहोंत. तुला जगांत राक्षसी शक्ति प्राप्त होत आहे असेंच जणूं कांहीं तें यंत्र किसनला सुचवीत होतें. त्या राक्षसी

शक्तीनें आपण खरोखरच कोणचा अर्थ अथवा अनर्थ साधणार आहोंत ह्याची थोडी जरी कल्पना किसनला आली असती तर तें यंत्र विकत घेण्याची त्याची आस्था कदाचित् लयाला गेली असती ! भविष्य वाणीनें आपला मंत्र अगदीं अस्पष्ट आवाजांत किसनच्या कानीं जपला असता पण मानवी जीविताचा दुबळेपणा वाढविणारी शक्तीच जर त्या जीविताच्या दुबळेपणावर अवलंबून आहे तर तें सहाय्य मिळणार कसें ? किसनची मोटार बोरीबंदर स्टेशन टाकून सरदारगृहाच्या रस्त्याकडे चालली होती. एका वळणावर दोन मोठाल्या टाक्या उंचावर उभारल्या होत्या. त्या ठिकाणीं एक वृद्ध मुसलमान भटारी रोटी व शाक तयार करून तीं फेरीवाले वगैरे लोकांना विकून आपलें उदरंभरण करीत असे. त्याची शेगडी नेहमीं पेटलेली असे. जणूं काय त्या मोठ्या श्रीमंत समजल्या जाणाऱ्या शहरांत दारिद्र्याचे निखारे कसे सतत प्रज्वलीत आहेत ह्याचें ती शेगडी एक छोटेसें प्रतीकच होती. तो वृद्ध मुसलमान आपल्या गिऱ्हाइ-काची तब्बेत फार खुष ठेवी. प्रथम फक्त रोटी व थोडी शाक देऊन नंतर आपण आपल्या गिऱ्हाइकावर मोठी मेहेरबानी करीत आहोंत अशा भाव-नेनें थोडी चटणी अथवा इतर कांहीं मसालेदार पदार्थ तो देई. तें बिचारें गिऱ्हाईक एवढ्या अल्प सेवेनें ते खूष होई. तो मुसलमान आपल्या गिऱ्हा-ईकाला सदोदित अमीर सरदार साहेब असल्याच नांवानें हाक मारीत असे. त्या शब्द लाघवानें अर्थातच ते खूष होत. तेवढ्यांत एखादा विनोद करी आणि म्हणे, “ खानसाहेब, आम्ही जर अमीर–उमराव तर आमचे पोशिंदे आपण म्हणजे साक्षात् जाहांपन्हाच म्हटलें पाहिजे. दुसऱ्याला सर-दार म्हणून स्वतः सार्वभौम होण्याची शकल नामी तर खरीच. ” अर्थात् सर्वत्र मंडळी त्या विनोदानें हंसत.

बाह्यत: जरी एका साध्या खानावळीचें स्वरूप त्याठिकाणीं दिसत होतें तरी एखाद्या गुप्त पोलिसाच्या चातुर्याला व कल्पनाशक्तीला वाव देणाऱ्या कित्येक गोष्टी तेथें घडत. रोज रात्रीं अकराच्या सुमाराला एक अगदीं वृद्ध स्त्री आपली काठी टेकीत हळूं हळूं तेथें येई आणि थोडा वेळ त्या दोघांचें संभाषण होई. त्यावेळीं कुणी गिऱ्हाईक तेथें असलें तरी ती स्त्री आपलें संभाषण थांबवीत नसे. त्याचप्रमाणें अगदीं पहाटेस एक करड्या घोड्याची

गाडी तेथें येऊन थांबे. लगेच तो मुसलमान उठून अदबीनें त्या गाडी-जवळ जाई आणि ठराविक काम करून परत येई. ती स्त्री आणि ती गाडी दूतक्या नेमानें येत कीं दूरान्वयानें कां होईना पण परस्परसंबंध कांहीं तरी होता हें खास.

किसनला त्या सर्व गोष्टी माहीत असाव्यात, निदान त्या मुसलमान भटाऱ्यासंबंधीं त्याला कांहीं तरी विलक्षण वाटत असावें. त्या विशिष्ट वळणावर मोटार येतांच किसननें 'शोफर' ला गाडी थांबवण्याची खूण केली. आपल्या नेहमींच्या गिऱ्हाइकांपैकीं कुणी तरी आलें असेल ह्या आकांक्षेनें तो मुसलमान किसनच्या गाडीजवळ आला. किसनला अगदीं लवून त्यानें मुजरा केला आणि आपल्या नेहमींच्या मिठास भाषेंत तो म्हणाला " सरदार साहेफा फर्मायीये बंदा मालिककेवास्ते खडा है ! " त्या शब्दांतले सारे स्वर किसनला कळले किंवा नाहीं हें सांगता येण्यासारखे नाहीं पण एका साधारण करपलेल्या रोटीकडे बोट करून ती आपणाला पाहिजे असें त्यानें त्या भटाऱ्याला सांगितलें. हुकमाची तामीली होतांच किसननें एक दहा रुपयाची नोट त्या वृद्ध मुसलमानाच्या हातावर ठेवली आणि किसननें मोटार हाकण्यांस आपल्या 'शोफर' ला सांगितलें. तो मुसलमान त्या एकंदर प्रकारानें थक्कच झाला. त्यानें आपल्या आयुष्यांत अनेक प्रकारचे बरे वाईट लोक पाहिले होते; त्यानें स्वतः अनेक बरीं वाईट कामें करून विषयी श्रीमंतापासून बक्षिसें पण पारखलीं होतीं. पण करपलेल्या रोटीचे दहा रुपये देणाऱ्या काय म्हणावें ? असा पागल कीं उमराव त्यानें आजपर्यंत पाहिला नव्हता. अशा प्रकारचीं 'आपत्ति' त्याच्यावर आजपर्यंत कोसळली नव्हती. अनपेक्षित सुखानें मनुष्याची वृत्ति त्या सुखाच्या खरेपणाबद्दल साशंक होते. तशीच त्या मुसलमानाची स्थिति झाली. त्याला शंका आली कीं ती नोट खोटी तर नव्हे ? पण नीट निरखून पहातां त्याला ती नोट खरी असल्याचें आढळून आलें व त्याच बरोबर आपणाला मिळालेलें सुखही खरेंच अशी त्याची खात्री होऊन तो साहजिकच त्या सुखांत रमला त्या सुखाचे निरनिराळे आकार करून एखाद्या लहान मुलाप्रमाणें तो त्या सुखाच्या वाळूशीं खेळूं लागला.

त्या मुसलमानाचे सुखमय कल्पनांचे मनोरे भराभर चढत होते तर किसनच्या कल्पनामय जगांत दरिद्री नारायणाचा संसार ढासळत होता. भिरभिणाऱ्या रथ चकाबरोबर किसनचा कल्पनावारू बेफाम सुटला होता. त्याच्या बाजूला पडलेल्या त्या करपलेल्या रोटीच्या तुकड्यानें त्याच्यासमोर पूर्ण ब्रह्म उभें केलें. कित्येक वर्षांपूर्वीची गोष्ट! किसन कल्पनेंत तरंगूं लागला. स्वतःच्या भूतकालीन चारित्र्यांत हळूहळू समरस होऊं लागला. जगाच्या अत्यंत निष्ठुर बाजारांत लाकडी बाहुलीइतकी सुद्धां आपली किंमत नव्हती. अंगांत एकही असा गुण नव्हता कीं ज्याच्या जोरावर पोटाची भूक एकवेळ तरी भागेल. अशा असाह्य स्थितींत आपण असतांना एका मुसलमानानें आपल्या ओठीं अन्नाचे कण घातले—आपले कंठां तून चाललेले प्राण परतविले. आपण हिंदू ह्या गोष्टीचा केवढा अभिमान धरला होता—केवढी धन्यता मानीत होतों. पण एका हिंदूच्याच विश्वास-घातानें आपण संसारांतून उठलों. आपल्या गोजिरवाण्या मुलाबाळांना आंचवलों. अब्रूचे दिवाळखोर बनलों आणि सर्वांवर कळसच रचायला आपले प्राणही आपणाला सोडून जात होते. असे कोणते अनुवंशीक गुण ह्या हिंदूजातींत आहेत कीं त्यांनीं परकीयांच्या सेवेसाठीं तळहातावर शीर घ्यावें पण स्वजातीयांच्या चिमूटभर सुखासाठीं भरलेली मूठ उघडूं नये? स्वप्रांतांतले लोक अन्नांच्या कणाकणाकरतां वणवण भटकत असतांना, जे न आपल्या जातीचे न आपल्या धर्माचे त्यांच्यासाठीं पैशाचा पुरवठा ह्या देशांतून व्हावा! स्वतःची प्रजा पाण्यावांचून तडफडत असतांना सत्ताधि-काऱ्यांचीं कुत्रीं दुधाच्या सागरांत बुचकळून निघावींत! शिव शिव! कोण ही आत्मवंचना आणि परप्रतिष्ठेची अघोर लालसा!!

किसनची मोटार राज-महाल हॉटेलच्या दाराशीं येऊन उभी राहली. किसन खालीं उतरला. मोटारवाल्याचें भाडें चुकतें करून त्याला पुन्हां दुसऱ्या दिवशीं सकाळीं येण्यास सांगून किसन आपल्या खोलीकडे वळला. दुसऱ्या मजल्यावर एक प्रशस्त दिवाणखाना किसननें स्वतःकरतां कायम भाड्यानें घेऊन ठेवला होता. किसन त्या दिवाणखान्यांत शिरला तेव्हां संध्याकाळची वेळ होऊन जिकडे तिकडे विद्युद्दीप प्रकाशत होते. साऱ्या मुंबईचें स्वरूप पालटत होतें. सायंकाळचा मंद आणि शीतल वायु सर्व

दिवसाच्या श्रमांचें परिमार्जन करण्याकरतां ठायीं ठायीं एखाद्या खऱ्या लोककल्याण करणाऱ्या पुढाऱ्याप्रमाणें फिरत होता. त्याच्या सेवेचें गुप्त-दान प्रत्येकाला रिझवीत होतें. निरनिराळ्या क्षोभकारक विचारांनीं तप्त झालेलें किसनचें मस्तक त्या वायूच्या मुग्ध सेवेनें शांत झालें. शांतते-करतां अनंत काल धडपडणारें किसनचें हृदय थोडा वेळ तरी विश्राम पावलें.

दुसरा दिवस उजाडला. किसननें तोंड वगैरे धुतलें. इतक्यांत एक नोकर कॉफीचा पेला घेऊन आला. किसन कॉफी घेत असतांच सकाळीं आलेल्या वर्तमानपत्रावरून नजर फिरवीत होता. प्रमोद–खद्योत–कोलार–वगैरे चुरचुरीत वर्तमानपत्रापासून तों 'मॉडर्न रिव्ह्यू' सारखा भारदस्त मासिकापर्यंत किसन सर्वांना एकाच मापानें मोजीत होता. नोकर बाजूला उभा होता. किसनला काय लहर आली कोण जाणें? त्यानें त्या नोकराला विचारलें.

"शारंग, तुला एक काम सांगितलें तर करशील तुला योग्य मोबदला मिळाला तर?"

"सरदारसाहेब, आपण काम सांगा. मग मोबदला. आधीं मनाप्रमाणें काम झालं तर सेवेची कदर करा."

"बरोबर" किसननें एक पाकीट शारंगच्या हातांत दिलें. तें पाकीट देत असतां जणूं कांहीं आपण आपलें भविष्यच शारंगच्या हातीं देत आहोंत असा उत्कट भाव किसनच्या मुखावर दिसत होता. पाकिटावर पत्ता लिहिलेला होता. एका अतिशय प्रख्यात वर्तमानपत्राकडे देण्याकरतां तें पाकीट होतें. त्या कामाविषयीं आवश्य त्या सूचना किसननें शारंगला दिल्या आणि संध्याकाळच्या आंत तें काम करण्यास सांगितलें.

वास्तविक किसनसारखी कर्तव्यदक्ष माणसें सहसा आपलीं कामें दुस-ऱ्याच्या हातीं देत नाहींत. पण त्या पाकीटांतलें कामच असें विशिष्ट स्वरू-पाचें होतें कीं किसन स्वतः तें करूं शकत नव्हता. कांहींतरी अलंघनीय अडचण त्याच्या वाटेंत होती. स्वतःच्या कामांत दुसऱ्याची मदत, मेहर-बानगी घेण्याचा त्याच्यावर पहिलाच हा प्रसंग होता. अगदीं नाईलाजानें किसननें तें काम शारंगच्या हातीं सोपविलें होतें.

आघल्या दिवशीं सांगितल्याप्रमाणें मोटार दाराशीं येऊन थांबली. शॉफरनें गड्याहातीं आपण आल्याची वर्दी दिली. किसननें कपडे केले आणि आपल्या कामाकरतां तो निघाला.

ज्यावेळीं राजमहाल हॉटेलच्या पुढच्या दरवाजानें किसन बाहेर पडला त्यानंतर थोड्याच वेळानें मागील दारानें शारंग आपल्या कामाकरतां निघाला. मुंबईसारख्या शहरांत पूर्णपणें मुरलेला असल्यामुळें शारंग आपल्या नियोजित कार्याला निघाला तेव्हां अर्थातच त्याला कुठेंही घोटाळण्याचें अथवा गांगरण्याचें कारण नव्हतें. ट्रामच्या फाट्याजवळ येऊन त्यानें ट्राम पकडली आणि तींत जाऊन तो बसला. ट्राम साधारण वेगांत असतानाच तो आपल्या नेहमींच्या शिरस्त्याप्रमाणें मोठ्या चपळाईनें खालीं उतरला. तो ज्या बाजूला उतरला त्याच्याच विरुद्ध तोंडाला त्याचें इष्ट स्थल होतें. बारा फूट लांबीचा एक मोठा बोर्ड एका इमारतीवर लावलेला होता. Advertising universal Bureau अशी मोठाली अक्षरें त्या बोर्डावर रंगविलीं होतीं. शारंग दोन तीन मजले चढून गेला आणि एका खोलीच्या दाराजवळ येतांच त्यानें घंटा वाजवली. दार उघडलें गेलें आणि शारंग आंत शिरला. एका कोपऱ्यांत टक्कल पडलेला एक गृहस्थ आपल्या कामांत अगदीं गढून गेला होता. शारंग आंत येतांच त्या गृहस्थाजवळ गेला आणि त्याला सलाम करून त्यानें किसननें दिलेला लखोटा त्याच्या हातीं दिला.

त्या गृहस्थानें तो लखोटा फोडला आणि आंतील मजकूर वाचला. त्याबरोबर त्याच्या भुंवया आकुंचन पावल्या आणि तो शारंगकडे पाहूं लागला. चष्म्याच्या दोन्ही काड्या दाबीत तो म्हणाला, "ही जाहिरात देणारे आपणच कां? शारंगनें नकारार्थी मान हलवली." त्यावर तो गृहस्थ लखोटा शारंगच्या पुढें करीत म्हणाला, "मग ही जाहिरात आम्हांला घेतां येत नाहीं. आमचा आणि पोलिसखात्याचा नेहमीं संबंध येतो. ही जाहिरात संशयास्पद आहे आपण परत घेऊन जा." शारंगला त्यानंतर तेथें थांबणें शक्यच नव्हतें. तो मुकाट्यानें जिना खालीं उतरला आणि त्यानें परत जाणारी ट्राम पकडली. ट्राममध्यें बसल्यावर अर्थातच

त्याची जिज्ञासा जागृत झाली. त्यानें जाहिरातीचा कागद उकलून वाचण्याकरतां आपल्यापुढें धरला. त्यांत पुढील मजकूर होता.

"आमची दोन आपत्यें हरवून आज वीस वर्षें झालीं आहेत त्यांचा शोध आम्हांस सांगितल्यास आम्ही त्यास कल्पनेबाहेर बक्षीस देऊं. अपत्यांची खूण–एक अत्यंत सुंदर मुलगा–एक तितकीच सुंदर मुलगी–क्ष."

जिज्ञासेची झांकलेली मूठ उघडली गेली पण त्यांत जें काय सांपडलें त्यामुळें शारंगची जिज्ञासा रतिमात्र कमी झाली नाहीं. उलट तो अधिकच गोंधळांत पडला. वीस वर्षांनंतर आपल्या मुलांच्या शोधाबद्दल जाहिरात देणारा किसन खरोखरच गूढ असला पाहिजे.

किसनचें असें काय रहस्य आहे कीं, ज्याचा स्फोट जाहिरातीच्याद्वारें आज वीस वर्षांनीं व्हावा? ह्याच्यापुढचें विचार अर्थातच शारंगच्या डोक्याला पोळण्यासारखें नव्हते. म्हणून फक्त चर्मचक्षूंची जिज्ञासा भागवून घेऊन अंतःकरणाच्या धडपडीकडे लक्ष न देतां शारंग आजूबाजूला पाहूं लागला.

× × × ×

सबंध दिवसाच्या श्रमानें क्लांत झालेला किसन विश्रांतीकरितां म्हणून बिछान्यावर पडला. उद्यां कांचनद्वीपाला आपण जाणार ह्या विचारानें त्याला बरें वाटलें. मुंबईच्या सबंध खेपेंत त्याला आनंद असा झालाच नाहीं. त्याला सारखें उदास वाटत होतें. आपल्या अंतःकरणांत कांहीं-तरी विलक्षण गोष्टींची उलथापालथ सुरू आहे असें त्याला वाटत होतें. कशाचीतरी भूक लागून त्यासाठीं आपला जीव तडफडतो आहे. आपण आजवर जें जें कमावलें त्यानें आपल्याला आजच्या घडीला यत्किंचितही सुख होत नाहीं. सुखाच्या वृत्ति पार महिरून जात आहेत. क्षणाक्षणाला आपल्या जीवनांतलें तेज नष्ट होत आहे. कणाकणानें पण निश्चितपणें आपल्या मनाचा खंबीरपणा ढासळत आहे. महिरणाऱ्या सुखाच्या वृत्ति, नष्टप्राय तेज आणि खचणारा धीर कसें सावरले जाणार! त्या अस्वस्थतेंच किस-ननें एक गोष्टींचें मासिक वाचण्याकरतां घेतलें. जरा इकडे तिकडे चाळून

त्यानें एक गोष्ट वाचण्यास सुरवात केली. गोष्टीच्या सुरवातीनें मोहून तो ती गोष्ट वाचूं लागला. गोष्ट पुढीलप्रमाणें होती.

“ मान्यवर मित्राचे सेवेशी. कृ. सा. न. वि. वि. आपली नवी कृति आतांच हातीं आली. आपला व माझा जो जिव्हाळ्याचा संबंध आहे तो ध्यानीं ठेवून मी आपल्या पुस्तकावर अभिप्राय देणें हें किती कठीण काम आहे त्याची आपणांला कल्पना नसावी आणि म्हणूनच आपण माझ्यावर ही अत्यंत बिकट जबाबदारी लादीत आहां. एकीकडे आपणांविषयींचें गाढ प्रेम व दुसरीकडे आत्यंतिक आदर अशा कचाटींत सापडून मला हें अभिप्राय देण्याचें काम करणें भाग आहे. आपल्या कादंबरीची भरमसाट स्तुति केली तर आपण माझ्या खरेंपणाविषयीं साशंक व्हाल. आपलें भाषाप्रभुत्व–स्वभाव, रेखन कौशल्य आणि कथानक हीं सर्वच चांगलीं साधलीं आहेत. त्यांत दोष काढण्यास कुठेंच जागा नाहीं. दोष काढण्यास कुठेंच जागा नाहीं असें म्हणणें म्हणजे आपली कृति अमानुष आहे असेंच म्हणणें होय. दोषातीत कृति असणें हें मानवतेचें ध्येय आहे पण तीच कृति दोषविरहित नसणें ह्यांतच तिच्या मानवतेचें खरेंखुरें चिन्ह आहे. कुठल्याही प्रस्थापित झालेल्या लेखकाच्या कृतीवर टीका करतांना ही एकच गोष्ट बहुधा विसरली जाते. आपण आपल्या ग्रंथांत जी प्रेमाची मीमांसा केली आहे ती सखोल असली तरी त्यांत अझून अनुभवाच्या जलाची ओली नाहीं. प्रेम ही भावना निष्पाप असते आणि म्हणूनच अंत:करणाच्या ह्या सर्वश्रेष्ठ प्रवृत्तीस अत्यंत उच्च दर्जाचा अधिकार मिळावा हें आपलें म्हणणें सकृद्दर्शनीं बहुजनसमाजाला पटेल. कित्येक तरुणांना स्वत:च्या अंत:करणाचें प्रतिबिंब म्हणून त्या ओळी चित्राच्या चौकटींत बसवण्यासारख्या वाटतील, पण त्यांतच फार भयंकर असें मोहाचें आवरण आहे. ह्याच मोहपटलानें कित्येक आयुष्यें धुळीस मिळालीं आहेत प्रेमाची अथवा इतर कुठलीही भावना केवळ आपल्या अंत:करणांतून निघाली म्हणून तिला प्रामाण्य द्यावें हा नियम जर सरसहा पाळला गेला तर काय अनर्थ कोसळतील ह्याची आपणाला कल्पना नाहीं. माझ्या म्हणण्याची सत्यता आपणांस पुढील गोष्टीवरून पटेल असें वाटतें. नीतीची

बाहेरच्या खिडकींतच एक पितळी पिंजरा टांगलेला होता. ती स्त्री दाराशीं येतांच त्या पिंजऱ्यातील पोपटानें 'राम–कुंवर' म्हणून साद घातली. त्या स्त्रीनें 'निहाल' म्हणून ती आंत शिरली. आपली धणीन आली म्हणून 'निहाल' पिंजऱ्यांत आनंदानें नाचूं लागला. झोंक्यावर बसून झोके घेऊं लागला. तें दृश्य पहात तो गृहस्थ दाराच्या बाहेरच उभा राहिला. आजही त्या स्त्रीनें आपणांला अवमानिलें ह्याचा त्याला खेद झाला. त्या पिंजऱ्यांतल्या पोपटाप्रमाणेंच त्याचें अंतःकरण आंतल्याआंत आशेनें आनंदानें कांहीं काळापूर्वी नाचत होतें. त्या पोपटाला थोड्या वेळानें त्याची धनीण कुरवाळील–प्रेमानें त्याला खायला देईल, पण आपण दिवसानुदिवस असेंच तिच्या प्रेमासाठीं आतुर होऊन उत्सुक होऊन शेवटीं निराश होणार. ती स्त्री वर गेली आणि तिनें पिंजऱ्याच्या आडून खालीं उभ्या असलेल्या गृहस्थाकडे पाहिलें. तिला त्याची कींव आली. तिनें आपल्या मोलकरणीला त्याला बोलावण्यास पाठवलें. तो गृहस्थ वर आला. त्याला वाटलें आपण धन्य झालों. आपली प्रणय-पिपासा पुरी होणार. आपल्यासारखा भाग्यवान् साऱ्या त्रिभुवनांत–! अरेरे पण हें काय ? दिवाणखान्याच्या दारांतच तो थबकला. त्रिभुवनाच्या मोलाचें सौख्य हस्तगत करायला सरसावलेला प्राणी अशा कोणत्या दैवी कोपानें थबकला–थिजला ? त्या गृहस्थानें खोलीच्या आंत पाऊल टाकलें. त्याचीं पावलें जणू काय त्यांच्यावर पृथ्वीचा अगवा त्याच्या पापाचा भार पडल्यामुळेंच जड जड पडूं लागलीं. हृदयाचीं चवचाल वृत्ति नाहींशी होऊन त्या ठिकाणीं कसली तरी अती विलक्षण ओढणी लागली. त्याच्या हृदयाचें स्पंदन त्याला ऐकूं येईल इतक्या जोरानें होऊं लागलें. त्यानें आपली बावरलेली नजर त्या खोलींत टाकली. एका कोपऱ्यांत शृंगारलेला छपरपलंग होता. त्याच्यावरची स्वच्छ जाळीदार मच्छरदाणी रस्त्यांतून दिसत असे. ताडीच्या दुकानावर बाह्यभागीं जशी ताडीची एखादी शाखा लावून ठेवतात व त्यामुळें हा गुत्ता आहे–हें एक सार्वजनिक स्थळ आहे असें सुचवलें जातें तशीच ती जाळीदार मच्छरदाणी पाहून हेंही एक अन्य प्रकारचें सार्वजनिक स्थळ आहे असें कित्येक गुलजार शृंगारिकांना

वाटे. तो गृहस्थ त्या मंचकावर बसला. त्याची नजर--त्याचे प्राण दाराच्या समोर टांगलेल्या एका भव्य चित्रावर खिळून गेले होते.

ती स्त्री एका चांदीच्या पेल्यांत दूध घेऊन आली. पण त्याची ती विमनस्क स्थिति पाहून ती आश्चर्यचकित झाली. तिला तो अनुभव अत्यंत नवा होता. उल्लु पागलाचें अशा प्रकारचें अभिनव स्थित्यंतर तिनें अद्यापपर्यंत पाहिलें नव्हतें. शिष्टाचाराला (?) अनुसरून ती त्याच्यापुढें येऊन उभी राहिली. तिनें उसनें हंसू ओठावर आणलें. त्याच्या हृदयांत कालवाकालव सुरू झाली. एकाद्या उंच डोंगराच्या शिखरावरून अत्यंत निर्दयपणें आपला कडेलोट होत आहे असें त्याला वाटलें. सभोंवारची हवा विरळ होत चालली असावी. पायाखालची जमीन आपला आधार काढून घेऊन दूरदूर पळत असावी. चहूंकडे अग्नीच्या ज्वाळा आपला ग्रास करण्याकरतां आपल्या जिभा सरसावीत आहेत असें त्याला वाटलें. त्यानें त्या स्त्रीचा हात हातीं धरला आणि अगदीं असाह्यतेनें तिच्याकडे पहात त्यानें तिला कातरस्वरानें विचारलें, " ती कोण ? " त्यानें समोरच्या चित्राकडे आपला थरथर कांपणारा हात दाखवला.

त्या स्त्रीनें किंचित् घोटाळून उत्तर दिलें, " माझी आई ! "

डोक्यावर वीज पडावी त्याप्रमाणें त्याला धक्का बसला. त्याच्या नेत्रांतून अविरत अश्रूधारा स्त्रवूं लागल्या. त्यानें एक मोठा उसासा टाकला. अगदीं गद्गदस्वरात तो एवढेंच म्हणाला, "तर मग बाळे-तूं माझी मुलगी."

हाय ! पुरुषधर्माची कोण नीच अवस्था ?

पापी मनुष्याचा किती भयंकर अधःपात ! प्रत्यक्ष पोटच्या पोरीविषयीं असली भावना मनांत उत्पन्न होण्याइतकी घोर निद्रा पापी अंतःकरणाला प्राप्त व्हावी ! पशूप्रमाणेंच माणसांना नात्याची ओळख नसावी. सर्वच व्यवहार पशुवत् व्हावे. धन्य धन्य पुरुषांच्या पापमय आचारांची आणि जगाचें शासनव्रत चालवण्याच्या अहंकाराची !

माझी गोष्ट संपली. मी ह्यापेक्षां अधिक लिहीत नाहीं. आपण सूज्ञ आहांत. ह्या गोष्टीचा अर्थ आपण लागेल तसा लावावा. एक सत्य गोष्ट म्हणून ती मी आपणांपुढें लिहून पाठवली आहे. आपल्या पुढील लेखनांत माझ्या ह्या गोष्टीचा आपणांस उपयोग व्हावा हीच माझी इच्छा. "

गोष्ट वाचून संपतांच किसननें हातांतील पुस्तक बाजूला टाकलें. त्याचें मन सुन्न होऊन गेले. कसा विचार करावा हेंच त्याला कळेना. त्या गोष्टींतलें प्रखर सत्य त्याचें अंतःकरण कांपीत चिरीत गेलें. सत्याचा निष्ठुरपणा किती तीव्र असतो ह्याचा त्याला अती कठोरपणें प्रत्यय येत चालला. किसन हताश झाला. त्या एका लहानशा गोष्टीनें त्याच्या अंतःकरणांत हलकल्लोळ उडवून दिला. वावटळींत सांपडल्या पानाप्रमाणें त्याची अवस्था झाली होती. त्या वावटळींतून बाहेर निघण्याचें त्याला सामर्थ्य नव्हतें. जिवाचे हाल होत असूनसुद्धां त्या वावटळींतच तरफडत रहाण्याला त्याचें दैव त्याला भाग पाडीत होतें. सुखांच्या राशीशीं खेळणारा किसन एका साध्या गोष्टीनें दैवाच्या हातचें खेळणें बनला होता. त्या गोष्टींतलें "पशूंप्रमाणें माणसाना नात्याची ओळख नसावी" हें एकच वाक्य थेट त्याच्या हृदयाला भिडलें होतें. तर मग स्त्रिया सर्वथैव श्रेष्ठ काय? पुरुष ज्याप्रमाणें आपल्या मुलीवरसुद्धा कामुक वासना ठेवूं शकतात तशा स्त्रिया आपल्या मुलांच्या संबंधीं व्यभिचारी भाव ठेवतात काय?

एक कीं अनेक प्रश्न किसनच्या मनांत उभे राहिले. ती प्रश्नांची फौज जणूंकांहीं आपल्याला कांहींतरी भयंकर शिक्षा करण्याकरतां पुढें पुढें नेत आहे असें त्याला वाटलें. स्वतःच्या आयुष्याचें सिंहावलोकन करावें म्हणून त्यानें आपली मान वळवली. भ्रष्ट झालेल्या सतींचे शाप आणि कुमारिकांचे तळतळाट त्याच्या कर्णरंध्रांत तापलेल्या शिश्याच्या रसाप्रमाणें शिरले. आपल्या आयुष्याची वाट पापांच्या राशीनेंच भरलीं आहे. ती पापाची रासच आतां आपल्यावर कोसळून कडाडत आहे. हिरण्यकश्यपूप्रमाणें आतां आपली अवस्था होणार. आपली पापें नारसिंहाचें रूप घेऊन आपल्या पोटांत आपलीं तीक्ष्ण नखें खुपसणार. आजवर ज्यांना दीन हीन समजत आलों त्या अबलाच शेवटीं सबला ठरणार! त्याच आपला सूड घेणार. किसनची दृष्टी तरळूं लागली. त्याच्या दृष्टीसमोर अनेक भेसूर आणि भयानक चित्रें तरंगूं लागलीं. पण सर्वांत अत्यंत भेसूर असें एकच चित्र होतें. त्याच्या दृष्टीसमोर अग्नीच्या रसांत लिहीलेली "लक्ष्मी" हीं अक्षरें धडाडून पेटलेल्या ज्वालेप्रमाणें नाचत होतीं. ह्याच ज्वालेंत आपली

सर्वाहुती होणार, किसनला भीति वाटूं लागली. त्याचा धीर सुटला. त्या अग्नीपासून वाचवावें म्हणून तो ओरडण्याचा यत्न करूं लागला, पण त्याची जीभ कोणीतरी आंत आंत ओढीत होतें, पापाच्या पार्श्वभूमीनें आपलें भक्ष्य आपल्या कराल दाढेंत धरलें होतें आणि भावी सुखाच्या कल्पनेनें ती पार्श्वभूमि आसुरी आनंदांत दंग होती !

---

# प्रकरण १४ वें

## ' वाघीण '

मार्गशीर्षाचे शाळूदिवस! शाळूसोबत्याप्रमाणेंच पृथ्वीची संगत सोडून सूर्यकिरणें भरभर पळत होते. कांचनद्वीपांतल्या मजुरांच्या झोपड्यावरून सूर्याच्या किरणांनीं आपले तेज केव्हांच काढून घेतलें होतें. मजुरांच्या टोळ्या आपापल्या घराकडे परत येत होत्या. एखाद्या मेंढपाळानें आपला मेंढरांचा कळप हांकून लावावा त्याप्रमाणें मेलेल्या अंतःकरणाचे ते मजूर पारतंत्र्याच्या एकाच शृंखलेनें बद्ध होऊन आपला जीवनक्रम चालवीत होते. सूर्याच्या स्नेहाला पारख्या झालेल्या त्या झोंपड्यांतून चोरट्या अंधाराची पाऊलें हळूं हळूं उमटत होतीं. त्या पदाघातानें दलित झालेली वनश्रीसुद्धां खिन्न आणि उदास दिसत होती. झाडाझुडपांच्या पानांतला रस गारठून गेला होता. अकाल वृद्धत्व पावल्यामुळें वनश्रीच्या मुखावर सुरकुत्या पडल्या होत्या. उत्साही पानांची खळबळ स्तब्ध झाली होती. वृक्षांच्या कटीखांद्यावर खेळणारा वारा कुठें तरी दुर्मुखला होऊन दडून बसला होता. पृथ्वीची वत्सलता थरकांप भरल्याप्रमाणें सुन्न झाली होती. असें कां ? कशाच्या भीतीनें वनश्रीनें आपलीं पानें मिटून घेतलीं होतीं ? कोणत्या भेसूर आशंकेनें वाऱ्याचें नृत्य थांबलें होतें ? कुठल्या कठोर आघातानें निर्झराचें संगीत मुकें झालें होतें ? वसुंधरेच्या सच्छील कन्येवर एखादा दुरात्मा आपल्या पापी हाताचा पाश टाकणार म्हणून हें मनोमालिन्य पसरलें होतें काय ? एखाद्या सतीच्या पातिव्रत्याचा दौलतजादा होणार म्हणून हा श्वसन-विरोध चालू होता काय? काय अशी

आपत्ति येणार होती ! कोणता अधम आपल्या पशूवत् आचरणानें सूर्य-चंद्राच्या तोंडांना काळोखी फासण्याच्या उद्योगांत गढून गेला होता !

पण हें काय ? ही कुणाच्या पाउलांची चाहूल ? ती चाहूल ऐकतांच वनश्रीनें आपले कान टवकारले ! संकटाचा घाला अंगावर झेलीत असतांना वनश्रीनें एकदांच हालचाल केली. नंतर सर्वत्र स्तब्धता पसरली. जणूं निसर्गांतली चलनशक्ति त्या पाउलांच्या मागोमाग जात होती. ती पाऊलें पुढें पुढें सरकूं लागलीं. त्यांचा दण दण असा आवाज ऐकूं येतांच मजुरांच्या झोपड्यांतली दोन अंतःकरणें आपली धडधड क्षणभर थांबवीत आणि तो आवाज ऐकूं येईनासा होतांच एक असहाय्यतेचा निश्वास सोडीत. ती भयप्रद पाउलें पुढें पुढें सटकत होतीं. संकटाचीं पदचिन्हें भूमीच्या कणाकणाना थरारून सोडीत होतीं. हवेच्या अणूंअणूंतून त्या भीतीचें स्वरूप भरून उरत होतें. तीं पाउलें थांबलीं. कुणाचा तरी ग्रास करण्याकरतां संकटरूपी व्याघ्र आपलें टिपण साधूं लागला. वनश्रीनें आपला जीव मुठींत धरला. थोड्याच वेळांत होणाऱ्या स्फोटापूर्वी सर्वत्र शांतता नांदूं लागली.

स्वयंपाकाकरतां साहित्य गोळा करण्यांत लक्ष्मी गढून गेली होती. दरिद्री संसारांत सुखाच्या—समाधानाच्या संपत्तीचें पाणी कसें खेळवावें हें आर्यललनाच जाणूं शकतात. असें म्हणतात, त्याची सत्यता लक्ष्मीच्या संसाराकडे पाहून कोणालाही सहज पटली असती. सदोबाची घरीं येण्याची रोजची वेळ टळून गेली होती. सदोबाच्या वागण्यांत नियमितपणा नसेच. आपणच घरीं येण्यास उशीर करायचा आणि मग अन्नाच्या गारगोट्या झाल्या म्हणून मर्मभेदक शब्दांनीं लक्ष्मीला छेडायचें हा सदोबाचा शिरस्ताच पडून गेला होता. अशा सदोबाच्या वर्तनानें, उत्कंठेनें आपल्या पतीची वाट पहाण्याचें सुख लक्ष्मीच्या नशीबीं नव्हतें. चुलीला लावलेल्या लाकडांतून धुराचे भपकारे निघत होते. त्यांच्या कडूपणामुळें लक्ष्मीच्या डोळ्याची आग होई आणि पाणी येई. स्वतःला छळणाऱ्या त्या धुराला सुद्धां सुख देण्याकरतां लक्ष्मी मंदमंद फुंकर घाली आणि जाळाच्या उज्वल स्वरूपांत त्या धुराचें रूपांतर करी. संताचें अंतःकरण तरी ह्याहून निराळें काय करतें !

मंद अग्नीवर लक्ष्मीनें वैरलेले तांदूळ शिजत होते. त्यांना कड येऊन त्याचा खद्खद् असा आवाज होत होता. एका पातेल्यांत लक्ष्मी पिठ-ल्याचें पीठ भिजवीत होती. एक धान्य असेंच जेवण बहुधा लक्ष्मीला तयार करावें लागे. आपल्या त्या अत्यंत मर्यादित घरांत लक्ष्मी शांतपणें आपला संसार चालवीत होती. भोंवतालीं काय भयंकर गोष्टी घडत होत्या अथवा लवकरच घडणार होत्या ह्याची तिच्या निष्पाप मनाला कल्पनाही नव्हती. तिचे हात संसारांत गुंतलेले होते, तिचें चित्त पाडुरंगाच्या मनो-मय ध्यानांत रत झालें होतें. वनश्रीची सावध रहाण्याविषयींची खूण तिला दिसत नव्हती. वाऱ्याची गुणगुण तिला कळत नव्हती. एखाद्या कुशल चित्रकारानें जर लक्ष्मीला तशा स्थितींत पाहिलें असतें तर 'संसारी लक्ष्मी' असें सुंदर चित्र त्यानें रंगवलें असतें.

दाराशीं खाडखाड असा पावलांचा आवाज झाला. ती कठोर पाउलें तेथेंच थांबलीं. संकटाचा ओघ लक्ष्मीच्या घराकडे वळला. सभोंवारच्या हवेचा गुदमरलेला प्राण लक्ष्मीभोंवतीं घोटाळूं लागला. वनश्रीची ताट-कळलेलीं अंतःकरणें जिवाचे कान करून लक्ष्मीचा शोध घेऊं लागलीं. लक्ष्मीच्या उंबऱ्यात संकट चढलें. लक्ष्मी आपल्याच नादांत होती. ती बसली होती त्या दारांतून संकट डोकावूं लागलें. लक्ष्मी अद्याप स्थिर होती. संकटाची सावली अक्राळविक्राळ स्वरूपांत बाजूच्या भिंतीवर पडली. लक्ष्मीनें सहज वर पाहिलें. तिनें ती अक्राळविक्राळ सावली पाहिली. दारांत दोन्ही हातांनीं मार्ग रोखीत विकट हास्य करीत संकट उभें होतें. लक्ष्मीला कल्पना नव्हती अशा वेळीं इस्माईल आपणांकडे कां आला ? तिनें तोंडावर पदर ओढला. ' घरीं नाहींत ' हे शब्द ती बोलली आणि इस्माईल जाईल ह्या अपेक्षेनें पुढच्या उद्योगांत पुन्हां समरस होऊं लागली. संकट तेथेंच आपलें ठाण मांडून बसलें. संकटाला वाचा फुटली. इस्माईल शक्य तितक्या कोमल स्वरांत म्हणालाः—"लक्ष्मी, सदोबा घरीं नाहीं म्हणूनच मी आलों आहें.—सदोबानेंच मला पाठवलें असें समज आणि मुकाट्यानें माझ्याबरोबर चल ! "

ते शब्द लक्ष्मीच्या कानांत घुसले. संकटाचे प्रखर किरण तिच्या कोमल अंतःकरणाला करपवूं लागले. एक अधम बकबक करीत होता, त्याचा

सरळ अर्थ काय होता ? पातिव्रत्याच्या--पावित्र्याच्या तेजानें रसरसणाऱ्या नागिणीस- माझ्याबरोबर-प्रत्यक्ष पापमूर्तीबरोबर मुकाट्यानें चल असें संकटाची जिव्हा म्हणत तिला होती. संकटाचें स्वरूप किती उग्र होतें हें अद्याप लक्ष्मीच्या ध्यानीं आलें नव्हतें. ती बसल्या जागेवरून उठली. इस्माईल पुढें सरसावला. त्यानें तिचा हात धरला. लक्ष्मीनें जोरानें किंकाळी फोडली. त्या दीन गाईचा तो हंबरडा जवळपासच्या झोंपडयांतून ऐकूं गेला असेल का ? तिला सोडवण्याला कुणी हिंमतीचा बहाद्दर पुढें सरसावेल का ? लक्ष्मीची शेजारीण त्या आरोळीनें धांवतच तेथें आली. तिच्याप्रमाणें ज्यांना ज्यांना म्हणून ती आरोळी ऐकूं गेली त्या सर्व स्त्रिया तेथें धांवत आल्या. स्वजातीच्या रक्षणार्थ दीन समजलेल्या गाई वाघाचा कोंडमारा करतात ! त्या अबला धांवल्या आणि त्याचे मर्द पुरुष ते सर्व आपल्या ठिकाणाहूनच पुढें काय होतें ह्याची वाट पहात जगाच्या जागीं स्वस्थ राहिले इस्माईल जाणून होता कीं, लक्ष्मीचें हरण सामदामानें होणें शक्य नाहीं. त्यानें एकदमच रुद्रावतार धारण केला. एका हिसडयासरसे त्यानें लक्ष्मीला बाहेर खेंचलें. उदरीं वास करणाऱ्या गर्भभारानें आधींच क्लान्त झालेली लक्ष्मी अंगीं त्राण न उरल्यामुळें असहाय्य झाली. तिच्या दारापुढें जमलेला स्त्रियाचा गराडा दूर व्हावा म्हणून इस्माईल ओरडला, " चलो बाजू हटो ! " तो त्याचा हुकूम ऐकून कांहीं स्त्रिया बाजूला सरल्या. तितक्यात काय लाज वाटली कुणास ठाऊक बरीचशी पुरुषमंडळी गोळा झाली. लोकसमुदाय जमत चालला म्हणजे त्यांत बहुधा अव्यवस्थित स्वरूपच दृग्गोचर होतें. काय झालं—आहे तरी काय भानगड वगैरे प्रश्न आपापसात विचारले जाऊं लागले. चालू प्रकरणांतील खरा वृत्तात फारच थोड्यांना माहीत होता. इस्माईलचे कांहीं हस्तक त्या लोकसमुदायांत होते. माहिती पुरवण्याचें पवित्र काम त्यांनीं सुरू केलें. एक विद्वान त्या अज्ञजनांवर प्रकाश पाडूं लागले, " अहो तो सदोबा नाही का—त्याला आहे ह्या खानसाहेबाचें कर्ज—पैसे कांहीं फिटेनात, तेव्हां दोघाच्या खुषींत हा सौदा ठरलेला आहे. नवऱ्याचा हुकूम न मानणारी ही बाई तरी मोठी जहांबाज नाहीं का ?" सर्व लोकांत ती माहिती हळूं हळूं पसरली. त्या माहितीवर निरानिराळीं वार्तिकें सुरू झालीं. तिचा खरेपणाखोटेपणा जो तो आपल्या बुद्धीच्या कसावर घासून पाहूं

लागला. पण सर्वांत आश्चर्याची आणि खेदाची गोष्ट ही कीं त्यापैकीं एकही जण प्रत्यक्ष संकटाला हात घालून तें नाहींसें करण्याचें नांव काढीना!

मिलिंद आणि मल्हारी! भावनाप्रवण मनांचे दोन तरुण! त्यांना तो प्रकार पाहून काय वाटलें असेल? त्यांच्या सर्व सीमा सुटल्या—त्या गर्दींतून वाट काढीत ते थेट संकटस्थलापर्यंत येऊन ठेपले. इस्माईल थोड्या अंतरावर उभा होता. त्यानें त्या दोन तरुणांना—विशेषतः मिलिंदाला पहातांच आपल्या कमरबंदाला हात घातला. प्रसंगीं आपल्या उपयोगी पडणारा आपला जिवलग तेथें आहे असें पाहून त्याला समाधान झालें. मिलिंद पुढें झाला. त्यानें इस्माईलला विचारलें, "तुम्ही हा काय प्रकार मांडला आहे?" त्यावर इस्माईल एक शिवी हांसडून म्हणाला, "दिसत नाहीं वाटतें? मी चाललों आहें माझ्या कर्जाची फड करून घेऊन—साध्या व्यवहारांत काय तमाशा चालवला आहे?—आतां दूर सरा नाहीं तर—" इस्माईलनें कमरेचें पिस्तुल बाहेर काढलें आणि सर्व लोकांकडे त्यानें तें रोखलें. तें प्राणघातक हत्यार पहातांच जनसमुदाय थंडगार झाला. मिलिंद आणि मल्हारी नुसत्या भावनेचे कडवे शिपाई—त्यांची भावना प्रज्वलीत होती—पण त्यांची कार्यक्षमता थंडावत होती. प्रत्यक्ष स्वजातीच्या, मातेच्या अगर भगिनींच्या पातिव्रत्यावर दरोडा पडत असतांना आंगांतील चैतन्य थंडावत जावें—शरिरांतलें सामर्थ्य लुळें पडावें? असें कोणतें वीष आहे—अशी कोणती मोहिनी आहे कीं ज्यामुळें पुरुषांचा पुरुषार्थ गारद केला जावा? मिलिंद आणि मल्हारी ठिकच्या ठिकाणींच दांत ओंठ चावीत उभे राहिले.

अंधार अधिकाधिक दाट पडत चालला. बिचाऱ्या लक्ष्मीची स्थिति अत्यंत अनुकंपनीय होत चालली. आपल्या नवऱ्याची आपणांस अशा प्रसंगीं मदत होईल अशी तिची अपेक्षा होती. आपला नवरा कसाही असला तरी आपल्या समक्ष तो आपल्या अब्रूची अशी होळी झालेली पहाणार नाहीं. इतकीं सगळी मंडळी जमली पण त्या ठिकाणीं सदोबाचा पत्ताच नव्हता. लक्ष्मीविषयीं आजूबाजूच्या लोकांत अत्यंत आदरभाव असला तरी तो क्रियारूप नव्हता. सहानुभूतीचें प्रदर्शन नुसतें तिच्या संकटकालीं आपण हजर राहिलों म्हणजे झालें, अशीच ज्याची त्याची समजूत! मिलिंद आणि

मल्हारी आवेशानें आपल्या सहाय्याला येत आहेत हें पाहून लक्ष्मीला आशा वाटूं लागली. पण तिची तीही आशा फार वेळ टिकली नाहीं. प्रत्यक्ष प्राणदानाचा प्रसंग येतांच मिलिंद आणि मल्हारीसुद्धां मागें सरले. सर्व उपाय हरल्यासारखें झाले. आतां कसलीच आशा नाहीं. इतक्यांत कलिमूर्ति सदोबा हळूं हळूं त्या समुदायाकडे येत असतांना दिसले. लोकांनीं त्यांना वाट दिली. सदोबा घराच्यासमोर येऊन ठेपले. लक्ष्मीनें एक करुण कटाक्ष त्यांच्याकडे फेकला. आपली विटंबना थांबवा असाच त्या कटाक्षाचा अर्थ होता. पण त्याच वेळीं दुसरा एक कटाक्ष इस्माईलनें सदोबाकडे टाकला. दुसराच कटाक्ष प्रभावशाली ठरला. सदोबा आपले सरळ आंत जाऊन बसले. स्वस्थ निर्विकार अशी त्यांची ती वृत्ति पाहून लक्ष्मीला अतोनात आश्चर्य वाटलें. इस्माईलनें आतां अधिक लगट केली. त्या अधमानें लक्ष्मीचा हात धरला आणि तिला फरफरां ओढण्यास सुरवात केली. दुःशासनानें द्रौपदीची विटंबना चालवली. जुगाराच्या नियमानें बांधलेले पराक्रमी पांडव निश्चल राहिले. सगळ्या पृथ्वीचा चेंदामेंदा करणारा महाशक्तिमान भीम—नुसतांच मुठी वळीत राहिला. अर्जुनाचें असामान्य धनुष्य भुईला शीर टेकून मूक झालें. सदोबा पांडव ठरले. त्यांची ती असामान्य शांति धर्मराजालासुद्धा धडा शिकवणारी होती. द्रौपदीचे विडंबन अवघ्या युगात एकदांच झालें. पण लक्ष्मीसारख्या सतीचें विडंबन प्रस्तुत युगांत ठायीं ठायीं होत आहे. ह्या लक्ष्मीचें पाठीराखें पांडव निश्चल आहेत. नपुंसक आहेत असहाय्य दुर्दैवी स्त्रिये-तुझ्या पातिव्रत्याचें रक्षण कोण करणार? निराशेचा, दुःखाचा अंधःकार घनतर होत चालला होता. इतक्तांत वीज कडाडली. मेघ गगनमंडळाला भेदून जाईल असा ध्वनी झाला. असहाय्य लक्ष्मीच्या जवळ रंगू येऊन उभी राहिली. तिचे नेत्र अग्निरसांत तळपत होते. तिचें सर्व अंग संतापानें थरथर कांपत होतें. प्रक्षुब्ध नागिणीप्रमाणें ती फूत्कार सोडीत होती. खवळलेल्या वाघिणीप्रमाणें ती शौर्यानें रसरसत होती. तिनें तेथें येतांच इस्माईलच्या हाताला एक जोराचा झटका दिला. तिनें लक्ष्मीला आपल्या पाठीशीं घातलें आणि दृढ निश्चयानें ती उभी राहिली. रागानें तिच्या तोंडून शब्द फुटत नव्हता.

तो दृढनिश्चय पाहून इस्माईल गोंधळला. तो अत्यंत बिकट परिस्थितींत येऊन पडला. इतकें हिडिस वर्तन स्वत:च्या वल्लभेसमोर करण्याचा प्रसंग त्याच्यावर आला ह्याची त्याला शरम वाटूं लागली. पण त्यानें आपलें मन आवरलें. चुकून सद्विचार करणाऱ्या मनाला तेवढें नियंत्रण पुरें झालें. इस्माईल ओरडून रंगूला म्हणाला, "रंगे, मुकाट्यानें बाजूला हो—लक्ष्मीला माझ्या स्वाधीन कर—लक्ष्मी माझी आहे" ते शब्द ऐकतांच रंगू पुढें सरकली. तिनें आपल्या हातात लक्ष्मीचा हात धरला आणि ती आवेशानें म्हणाली, "भीक कां मागतां? असेल हिंमत तर ही पहा लक्ष्मी तुझ्यापुढें उभी आहे. जा घेऊन तिला" रंगूनें इस्माईलला असें सांगितलें तरी इस्माईलच्या हातून तें कृत्य होइना. त्याचा धीर सुटत चालला. रंगूच्या ठिकाणीं कुठलें तरी दिव्य तेज चमकत होतें. माता आपल्या मुलीचें रक्षण करीत होती. वाघीण आपल्या पिलाभोवती पहारा करीत होती. त्या वाघीणीचें अक्राळविक्राळ स्वरूप पाहून इस्माईल घाबरला. तरी धीर धरून तो म्हणाला, "हो हो ! मी तिला नेणार ! पहातों काय करतेस. तूं माझें तें "

" काय करतेस, मांगा कुणाच्या अंगाला हात लावतोस ! नीट याद राख. तुला काय वाटलं लक्ष्मी अनाथ आहे? अतां एक पाऊल पुढें सर—" रंगूनें आपल्या कमरेचा कोयता काढला आणि ती पुढें म्हणाली, "तुझी खांडोळी करून टाकीन तरच नावाची रंगू म्हण !—"

ती वीतभर कोयत्याची धार पहातांच इस्माईल अधिकच घाबरला. रंगू त्याला आतां फारच निराळ्या स्वरूपांत दिसू लागली. त्याची प्रियतमा रंगू आतां प्रेमळ नव्हती, कोमल नव्हती. जगांतल्या रुद्र शक्तीनें तिच्या अगांत संचार केला होता. प्रेमळ लक्ष्मीचा विठोबा तिच्या पाठीशीं उभा होता. द्रौपदीच्या श्रीकृष्णाचें सुदर्शन तिच्या भोंवतीं फिरत होतें. स्त्रीजातीचें पावित्र्य तिच्या कार्याचें अधिष्ठान होतें. इतक्या शक्ति, इतकीं शस्त्रें ह्यांनीं सज्ज झालेली रंगू पापी इस्माईलला किती उग्र वाटली असेल, किती तीव्र भासली असेल ! इस्माईल मागें सरला. संकट मागें सरलें जातां जातां इस्माईल पुटपुटला, "ठीक आहे. ह्याचा सूड घेईन तरच तुझा वल्लभ !"

इस्माईल तेथून जातांच लक्ष्मीनें रंगूच्या गळयात मिठी मारली. तिच्या डोळयांतून अश्रूधारा वहात होत्या. रंगूची क्रूर नजर अद्याप निवळली

नव्हती. दृष्टीच्या टप्याबाहेर इस्माईल गेला अशी रंगूची खात्री होईपर्यंत ती त्याच्याकडे रोखून पहात होती. भाल्याचे टोकानें एखादें श्वापद जसें हुसकलें जावें तद्वतच रंगूच्या नजरेच्या धारेनें इस्माईल हुसकला गेला होता.

रंगू त्या प्रसंगानें श्रांत होऊन खालीं बसली. तिची अनैसर्गिक क्रूरता तिला सोडून जाऊं लागली. कांहीं क्षणापूर्वी दिव्य शक्तीचा संचार झालेली रंगू पुन्हा सामान्य झाली. तिला आतां दुप्पट वेगानें लक्ष्मीचें दुःख जाणवूं लागलें. लक्ष्मीची गळ्याभोंवतालची मिठी अझूनही तशीच होती. आपल्या साऱ्या आयुष्यांत असा प्रसंग आपणावर येईल ह्याची तिला कल्पना नव्हती. वत्सलतेनें तिचें अंतःकरण भरून गेलें. तिचा कंठ दाटून आला, लक्ष्मीसारख्या मुलीची गळ्याभोंवतीं मिठी पडण्याच्या भाग्यासाठीं कोणती माता आतुर होणार नाहीं ? कोणती माता वाटेल तो स्वार्थत्याग करणार नाहीं ? स्वपराक्रमानें मिळालेल्या त्या सुखराशीखालीं रंगू चिरडली जात होती. आत्यंतिक सुखानें तिचा प्राण घाबरा होत होता. लक्ष्मीच्या त्या मोकळेपणानें रंगू स्वतःला धन्य समजूं लागली. लक्ष्मीच्या अश्रूधारांत रंगूला वाटलें आपले पाय धुवून निघत आहेत. लक्ष्मीच्या स्पर्शानें आपलें अंतःकरण उजळून निघत आहे.

माथीं सार्वभौमत्वाचा मुगुट चढवला जावा त्याप्रमाणें अभिमानानें रंगूनें मस्तक शोभूं लागलें. तिच्या खांद्यावर पडलेली लक्ष्मीची मान म्हणजे साऱ्या जगाच्या संपत्तीचा सांठाच आपल्याजवळ आहे असें रंगूला वाटलें.

त्या दिव्य प्रेमाच्या रसांत दोघीजणी कितीतरी वेळ गुंग झाल्या होत्या. शेवटीं कृतज्ञतेला प्रथम वाचा फुटली. लक्ष्मी निरुद्ध कंठानें म्हणाली, "रंगूबाई, आज तुम्ही माझ्या आईसारख्या धांवून माझी अब्रू राखली—तुमचे उपकार—" रंगूनें लक्ष्मीच्या तोंडावर हात ठेवला आणि हर्षनिर्भर स्वरानें ती म्हणाली, "मी तुझी आईना ? मग आईचे उपकार का मानायचे असतात मुलीनं ?

उपकृत लक्ष्मी रंगूच्या मुखाकडे पहात राहिली. नीच जातीची—नीच मनाची समजली जाणारी ही स्त्री इतकी अलौकिक कशानें झाली? ह्याचेंच कारण ती शोधीत असावी. त्या निष्पाप नजरेंत हजारों पुस्तकांतलें गंभीर

तत्वज्ञान सूक्ष्म रूपानें वास करीत होतें. त्या नजरेच्या अर्थांचा पोट-उकला करायला तशीच अभिजात दृष्टि-तशीच लेखणी समर्थ होईल. लक्ष्मीची आणि रंगूची हृदयाहृदयाची भेट पूर्ण झाली. रंगू पुष्कळ वेळानें तेथून उठली आणि जाण्यास निघाली. नुसत्या मानेनेंच लक्ष्मीनें निरोप दिला.

स्वयंपाक करायला लक्ष्मी परतली. अर्धवट पडलेल्या स्वयंपाकाजवळ ती येऊन उभी राहिली. चुलींतलीं लाकडें कंटाळून जळून गेलीं होतीं. अपुऱ्या शक्तीनें कार्य करणाऱ्या ध्येयवाद्याप्रमाणें त्या लाकडांची स्थिति दिसत होती. अकालीं आपली चेतना नष्ट झाल्यामुळें इतका वेळ अडकलेल्या अंगाराचा कोळसा झाला होता.

लक्ष्मी स्वयंपाक करूं लागली. तिचा पति सदोबा आपल्या चिलमीचें आराधन करूं लागला. जगाची नित्य रहाटी सुरू झाली.

आपल्या घराकडे परतणारी रंगू किती उल्हासानें, किती आनंदानें चालली होती. लक्ष्मीची सुटका केल्याचा अपरिमित आनंद तिच्या शरीरांतल्या नसानसातून खेळत होता. तिचें प्रत्येक पाऊल त्या आनंदाच्या सुराबरोबर जणूं नाचत होतें. रंगू आपल्या घरीं आली आणि आनंदानें बेहोष होऊन मनसोक्त रडली. तिला सूख खुपूं लागलें. दुःखाच्या वियोगानें तिला हुरहुर वाटूं लागली.

तिकडे मिलिंद आणि मल्हारी ! दोघेही आपल्याच विचारांत चूर होते. स्त्रीत्वांतलें दिव्यत्व डाळे भरून दोघांनीं पाहिलें होतें पुरुषार्थाचा त्यांचा सारा अभिमान पददलित झाला होता. अनाथ लक्ष्मीला आपण सहाय्य करूं ही त्यांची आशा भग्न झाली होती. दोघेही खट्टू झाले. त्याच्या अंतःकरणांत काय खळबळ उडाली होती ते त्यांचे त्यांनाच ठाऊक !

वायू मुक्त होऊन संचार करूं लागला. संकटाचीं पाउलें ऐकूं येईनाशी झाली. वनश्रीची पानें हलूं लागलीं. डोलूं लागलीं. ओढ्याचा रुद्ध कंठ मोकळा झाला. निद्रेच्या मोहमय आवरणाखालीं कांचनद्वीपांतली सजीव सृष्टि हळूहळूं रांगत जाऊन लोळूं लागली. वादळानंतरची स्तब्धता दिशादिशांना पसरली.

---

# प्रकरण १५ वें

## ' बलिदान '

" दादामिया, या कीं जरा. चिलिम तर ओढून जा एक झुरका घ्याहो!" सदोबा आपल्या एका दोस्ताला आपला अतिथि होण्याबद्दल आग्रह करीत होते. सकाळची वेळ होती. मजूर आपापल्या कामावर चालले होते. सदोबा निघण्याच्याच तयारींत होते. पण एकच 'दम' मारून मग निघावें अशा विचारांत ते होते, तों त्यांना दादामिया दिसला. दादामिया आणि सदोबा एकव्यसनी म्हणून तर दोस्त होतेच. पण अगदीं खऱ्या भावानें सदोबाची व त्याच्या गुणाची योग्य पारख करून नेहमीं सदोबाला त्याच्या सत्कृत्याबद्दल प्रोत्साहन देणारा अवघ्या काचनद्वीपात एकटा दादामियाच काय तो होता. सदोबाचा भक्त म्हणाना! अशा दादामिया आपल्या गुरुमाउलीच्या आग्रहाला धिःकारून निघून जाईल हें संभवतच नाहीं. दादामिया येऊन बसला. चिलमीचीं आवर्तनें सुरू झालीं. गप्पाष्टकाची झोड उठली. मळ्यातलीं कामें थांबून राहिलीं. चिलिम सदोबाच्या हातीं देत असतां दादामियानें विचारलें, " काय हो पाटीलसाहेब, काल तुमच्याकडे फार पाहुणे मंडळी जमली होती. काय विशेष काय होतें असें काल तुमच्याकडे ?"

सदोबाला पाहिजे तो विषय इतक्या सहजरीतीनें निघाला. सदोबाला आपले 'मत' ऐकायला श्रोताच मिळत नव्हता; आणि त्यांचीं मतेंही काहीं कमी वजनाचीं नव्हतीं. प्रत्यक्ष परिस्थितींत उभ्या असलेल्या सेनापतीच्या 'सल्लयाला' जें महत्व दिलें जातें तेंच महत्व वास्तविक सदोबाच्या मताला द्यायला पाहिजे. पण कांहीं विशिष्ट प्रकारच्याच मतांचा उदो उदो करणाऱ्या जगाला एवढी परमतसहिष्णुता कुठुन यावी ? सदोबासारख्या 'स्वतंत्र' मतें असलेल्या लोकोत्तर पुरुषावर हा मुका जुलूम कित्येक शतकें चालू आहे. एखाद्या स्त्रीचा छळ केला तर त्याचा काय बोलबाला होतो. पण त्याच 'विषयाची' दुसरी बाजू कुणीच ऐकून घेत नाहीं ह्याचा अर्थ काय? छे! छे ! ह्याचें परिमार्जन झालेंच पाहिजे. सदोबा सरसावून बसले. त्यांनीं आपल्या मतप्रदर्शनाला सुरवात केली. ते म्हणाले, " त्याचं असं झालं. मियासाहेब,

काल आपले खानसाहेब संध्याकाळीं आमच्या घरीं आले. मी कांहीं घरीं नव्हतों. म्हणून त्यांनीं सहज आंत चवकशी केली. आणि काय सांगू खानसाहेब, '' सदोबा हळू आवाजांत बोलूं लागले, '' अहो आमची ही आहे ना ? ती त्यांच्याकडे पाहून आपली रडूं लागली, झालं खानसाहेब अगदीं गोंधळून गेले. त्यांनीं चांगलें तिला बाहेर बोलावलें. ती बाहेर आली. आणि झालं, तो पाजी मिलिंद आणि तो मल्हारी नाहीं का ? दोघे आलें तिथें. काय अकांडतांडव केलं. सगळे लोक जमा झाले. त्या सज्जन पुरुषावर ह्यांनीं नाहीं नाहीं ते आरोप केले. अहो, खानसाहेब कशाला आमच्या बायकोकडे पहातील ? अशी काय अगदीं अप्सरा लागून गेली आहे कीं, तिच्यासाठीं खानसाहेबासारख्या माणसानें झुरावें आणि असे अचाट प्रयत्न करावे. अहो, तिळाचा ताल करण्याची आमच्या ह्या लोकांना संवयच ! तसच पाहिलं तर हा मल्हारी आहे किनई, हा खुशाल आला आपला उल्लू होऊन आमच्या बायकोच्या मागें ! अहो, खरें पाजी चोर हे ? आमच्या खानसाहेबावर आणि नुसता आळ बरं–फुकट आळ ! मला तर असं वाटलं होतं कीं एकेकाला खानसाहेबांनीं गोळी घालून ठार करायला पाहिजे होतं. अहो, गय करायची म्हणजे किती ! वेळ नाहीं, अवेळ नाही. हा मिलिंद आणि मल्हारी जेव्हां पहावं तेव्हां आपले तिच्या जवळपास कुठंतरी घोटाळत असायचे ! अहो, मी तिचा नवरा ना ? पण माझी त्यांना कांहीं भीतिच वाटत नाहीं! खरोखर सांगूं ? मला तर ह्या बायकोचा आणि ह्या संसाराचा असा वीट आला आहे. पण काय करायचं काय! आतां आपली ही चिलीम हिलाच मी आपली बायको समजतों! हिची लुगडी धुऊन हिला नेहमीं पोटभर खायला द्यायचं हेंच आपलं एक खरं कर्तव्य. खरं कीं नाहीं? ' हें गांजेकसाचें 'भाषण' कांहीं काल थांबलें. दादामिया त्या सर्व भाषणाला मनःपूर्वक मान डोलवित होते. असल्या विचारांचीं रत्नें ते अगदीं अधाशीपणानें आपल्या अंतःकरणांत साठवीत होते. त्या रत्नसंचयांत कुठल्याही प्रकारची कमतरतां पडूं नये म्हणून दादामियांनी कुतुहूलपूर्ण प्रश्न केला, ''पण ह्यांत तुमच्या बायकोला काय दोष आहे सांगा बर !'' सदोबांनीं आपलें ते तारवटलेले डोळे एकवार शक्य तेवढ्या विस्तृतपणें आपल्या सामान्य जिज्ञासूभक्ताकडे रोखले

आणि मंद स्वरांत ते म्हणाले, "अहो-तीच छिनाल आहे ! हा काय तिचा लहान दोष झाला ? मी सांगतों तुम्हाला माहीत नसेल ती हकीकत. पण लग्न झाल्या दिवसापासून तिचें एकंदर लक्ष बाहेरच ! अहो, देवाचं भजन काय करते ढसा ढसा रडते काय-दिवसाच्या दिवस उपासच काढते. अहो, मगळाच आचरटपणा! मी असा शांत! फार शांत म्हणून कसंतरी निभलें आहे. अहो, एखादा अडमुठ्या असतां म्हणजे मग हिला समजलें असतें. हं-चालायचेंच हें जगात खऱ्याला किंमत नाहीं हेंच खरं!" सदोबांचें तें तत्वविवेचन थांबलें. उन्हें बरींच वर सरकलीं होतीं. चटका बसण्याइतका तीव्रपणा सूर्यकिरणांत आला होता. त्या तापानें अथवा चिलिम संपल्यामुळें पण ते दोघेही उठले आणि कामावर जाण्याकरतां निघाले. दोघेही संवयीच गाजेकस पण आज 'अंमल' चढल्यासारखा दिसत होता. दोघेही रस्त्यानें जात असतां अर्थातच त्यांना वाटेंत कुणी भेटलें नाहींच. सदोबांना वाटलें आपण आज फारच लवकर कामावर चाललों आहोंत. सदोबा आज एकंदर फार खुषींत दिसत होते. सकाळीं उठल्यापासून त्यांच्यावर जणू आनंदाची झूलच चढल्याप्रमाणें ते दिसत होते. ब्रम्हानद ही चीज काय आहे, ह्याचा सदोबा आपल्या मतानें पूर्ण अनुभव घेत होते. त्यांच्या त्या आनंदाचे स्वरूप त्यांच्या डोळ्यांतून पूर्णपणें प्रतिबिंबित झालें होतें. चिलमी करतां निखारे आणायला लक्ष्मीला सागून तिनें निखारे आणले तेव्हां हळूंच एक निखारा तिच्या पायावर ठेवून आपल्या आनंदाचा 'चटका' सदोबांनी आपल्या अर्धांगीला पण दिला. त्यानंतर दादामियासारखा एकनिष्ठ भक्त आणि त्याच्याबरोबर झालेले संभाषण ह्यामधून सदोबांचा तो दिग्विजयी आनंद वहात होता. त्या आनंदाचें मूळ कारण काय होतें ? तें त्यांचें त्यांनाच माहीत !

सदोबा शेतांत येऊन पोहोंचले. समोरच इस्माईल कुणाशीं तरी बोलत होता. त्याला पाहातांच सदोबाला अधिकच आनंद झाला. खानसाहेबाला सलाम करून तो बाजूला उभा राहिला. इस्माईलनें एक तीव्र कटाक्ष सदोबाकडे टाकला आणि तो आपल्या उद्योगांत पुन्हां गुंग झाला. सदोबांनीं आपली चंची उकलली आणि तिच्या 'पोटातून' साडेतीन रुपये काढले व नम्रपणें ते इस्माईलपुढें ठेवले. 'लक्ष्मीचें' तें दर्शन इस्माईलच्या लोभी दृष्टीला उल्हसित करूं शकलें नाहीं. त्यानें कपाळाला आठ्या

चढवल्या आणि ते पैसे दूर भिरकावून कर्कश स्वरांत तो ओरडला, " जा, ए सूवर–मला ही लक्ष्मी नको–मला ती लक्ष्मी पाहिजे–चल जा—"

सदोबांनीं जुगारांत 'मिळविलेले' साडेतीन रुपये हें त्यांच्या ब्रह्मानंदाचें कारण होतें. कारण पुरुषार्थ जाहीर करणारी ती त्यांची लक्ष्मी अशी लाथाडली गेली हें पहातांच त्यांना वाईट वाटलें. इस्माईलनें सुद्धां पुन्हां कांहीं तरी विचार केला आणि त्यानें ते दूर फेकलेले पैसे गोळा करून आणण्यास सदोबाला फर्माविलें. निराश झालेल्या कवीला आपल्या कविता पुन्हां पाठवण्यास एखाद्या संपादकानें जर सांगितलें तर त्या कवीला जो आनंद होईल तसाच आनंद सदोबाला झाला. त्यांनीं ते पैसे गोळा करून खानसाहेबाच्या हातीं दिले आणि सदोबा आपल्या कामावर निघून गेले.

इस्माईल ते पैसे घेऊन निघाला. त्याच्यामागें आणखी एका कामाची ओढ होती. किसननें हिंदुस्थानांतून आणलेलें नवें यंत्र उभारण्याचें व त्याकरतां बांधकाम करण्याचें काम सुरू झालें होतें. त्या कामांवर देखरेख करण्याचें व तें काम संपूर्ण करण्याची जबाबदारी अर्थात् इस्माईलवर येऊन पडली होती. इस्माईल त्या कामाकडेच निघाला. कांचनद्वीपाला नवें वैभव-नवी शोभा प्राप्त करून देणारें तें यंत्र अद्याप जुळलें नव्हतें. त्या राक्षसीयंत्राचें सैतानी सिंहासन अद्याप तयार व्हायचें होतें. जेथून संपत्तीचा उगम व्हावयाचा होता तेथें हजारों जीवाचे प्रथम कष्टांच्या रूपानें बळि पडत होते. पत्र्यांचे मोठे थोरले छप्पर तयार झालें असून इतर बारीक सारीक कामें मोठ्या झपाट्यानें चाललीं होतीं. इस्माईल मुख्य यंत्रापाशीं येऊन उभा राहिला. यंत्राचा अर्धा भाग जमिनींत पुरला जाणार होता, व त्या करतां यंत्राच्या आकाराचा एक खड्डा तयार करण्यांत आला होता. इस्माईल डोकावून त्या खड्डयांत पाहूं लागला. पृथ्वीचें कठीण हृदय आपल्या घड्या उकलून दाखवीत होतें. प्रत्येक थराला रंग बदलत होता आणि अगदीं शेवटीं तर फत्तर लागला होता. माध्यान्हीं आलेला सूर्य त्या खड्डयांत प्रथमच आपलीं किरणें टाकीत होता.

इस्माईल तेथेंच बसला. त्या यंत्राबद्दल एक तऱ्हेचें सैतानी प्रेम त्याच्या मनांत उत्पन्न झालें होतें. दोघांचाही मुख्य गुणधर्म हृदयशून्यता हा होता.

नाहीं म्हणायला रंगूच्या हातीं इस्माईलचें धोरण होतें पण कांहीं दिवसापूर्वी झालेल्या अपमानानें रंगूलासुद्धां आपल्या हृदयांतून त्यानें काढून टाकलें होतें. त्या अपमानाचें शल्य त्याच्या मनांत सारखें सलत होतें. आजपर्यंत त्याला दुःख ठाऊक नव्हतें असें नाहीं; पण अशा अनपेक्षित ठिकाणाहून आपला असा अपमान केला जाईल ही त्याची कल्पना नव्हती. समोर असलेल्या खड्डयांत कांहीं तरी टाकून आपल्या अपमानाची भरपाई करतां येईल का ? इस्माईलचें सैतानी विचारचक्र यंत्राच्या आधीं सुरू झालें. त्या चक्रांची कर्कश करकर त्याच्या मनाला फार सुखवूं लागली. आपल्या आवडत्या यंत्राची यथासांग स्थापना व्हायला एका गोष्टीची उणीव भरून काढणें म्हणजेच आपल्या अपमानाची भरपाई करण्यासारखें होय ! इस्माईलनें तो विचार नक्की ठरवला, तो तेथून उठला आणि हळूं हळूं आपल्या घराकडे चालूं लागला. जातांना त्यानें एका मजूराला हांक मारली आणि त्याला कांहीं तरी सांगितलें. तो मजूर ज्या ठिकाणीं सदोबा काम करीत होते तेथें गेला व त्यानें सदोबाला हंसत हंसत सांगितलें, " पाटील आज तुम्हांला सुटी ! आतां यापुढें तुम्हाला काम करायचं नाहीं असा तुम्हांला खानसाहेबांचा हुकूम आहे बरं का ! "

निरोप ऐकून सदोबा खूष झाले. आपल्या आजूबाजूस राबणाऱ्या मजूरवर्गाकडे त्यांनीं तुच्छतेनें एकवार नजर फेकली आणि ते त्या नवीन आनंदाचा उपभोग घ्यावा म्हणून घराकडे वळले. लक्ष्मीनें घरीं येऊन स्वयपाक तयार केलाच होता. सदोबा घरीं आल्याबरोबर तिनें त्यांना हातपाय धुण्याकरतां पाण्याचा तांब्या भरून ठेवला. सदोबांनीं कपडे उतरले आणि ते जेवणास बसले. अत्यंत आश्चर्य करण्यासारखी गोष्ट होती पण सदोबा आज आपल्या बायकोकडे मधून मधून सारखे पहात होते. त्यांच्या अंतःकरणांत आनंदाच्या लाटा सारख्या उसळत होत्या. आज आपलें जेवण अतिशय आवडीनें ते जेवत होते. इतकेंच नव्हे तर त्यांनीं आज सगळ्या स्वयंपाकांत कुठेंच खोड काढली नाहीं. त्यांचें मन आज त्यांना एका नवीन आश्चर्याचें दर्शन घडवींत होतें. ज्या लक्ष्मीविषयीं चुकूनही चांगला शब्द तोंडातून निघाला नाहीं, त्याच लक्ष्मीच्या हातच्या स्वयंपाकाला त्यांनीं आज प्रथमच ' बरा ' असें म्हटलें. त्या पतिनिष्ठ स्त्रीला

किंचित् नवल वाटलें. जेवण चालूं असतां लक्ष्मीनें भाकरीचा चतकोर वाढण्यास आणला. सदोबाला काय वाटलें कुणाला ठाऊक पण त्यांनीं लक्ष्मीचा हात तसाच धरला आणि अगदीं अपरिचित अशा स्वरांत ते तिला म्हणाले, 'तूंच खा तो तुकडा!' सदोबाच्या हाताच्या स्पर्शानें लक्ष्मीला काय वाटलें तें सांगणें अत्यंत कठीण आहे. कारण इतक्या उल्हासानें आणि आनंदानें आपल्याशीं आपल्या पतीनें कधीं भाषण केल्याचें तिला स्मरत नव्हतें. सदोबाचें जेवण झालें. त्यांनीं आपली चंची आणि चिलीम दोन्हीं सज्ज केल्या. पण त्या निर्जीव वस्तूंनीं त्यांच्या मनोवृत्ति आज खुलत नव्हत्या. त्यांना—कां कुणास ठाऊक—पण असें तीव्रतेनें वटूं लागलें कीं आपल्या अर्धांगीनें ह्यावेळीं आपणाशीं येऊन बोलत बसावें. आपण तिच्याशीं बोलावें. आपल्या आनंदांत तिनें वाटेकरी व्हावें. मनांत येण्याचा अवकाश. सदोबांनीं आपल्या पत्नीला हांक मारली. लक्ष्मी येऊन उभी राहिली. सदोबा तिच्याकडे पहात म्हणाले, " तूं खालीं बैस आणि माझ्याशीं कांहीं तरी बोल " तो विचित्र 'हुकूम' ऐकून लक्ष्मीला काय वाटलें ? 'माझ्याशीं कांहीं तरी बोल' म्हणजे काय ? ह्याचा कांहीं तरी अर्थ काय समजावें ! एखाद्या शृंगारीक नाटकांतल्या प्रमाणें 'माझ्या आवडत्या जीवा' अथवा असेंच कांहीं तरी आचरटपणा सारखें तिनें आपल्या नवऱ्याशीं बोलावें काय ? 'मी आपल्या पायांची दासी' असें म्हणून पूर्वी उघडपणें आणि आतां प्रच्छन्न सुरू असणाऱ्या गुलामांच्या व्यापाराची तिनें आपल्या पतीला आठवण करून द्यावी ? कांहीं तरी बोलावें म्हणजे काय करावें ? लक्ष्मी तर गोंधळून गेली. सदोबा आपल्याच आनंदांत मग्न होते. लक्ष्मी आपल्याशीं बोलत नाहीं असें पाहून ते पुन्हां म्हणाले, 'असं काय करतेस ? बोल ना कांहीं तरी ' 'ह्या' कांहीं तर बोलना आपल्याकडे आज नवऱ्याची लहर फिरलेली दिसते हें ध्यानांत आणून लक्ष्मी हळूंच म्हणाली, " मी काय बोलूं ? त्यावर सदोबा मान डोलवीत म्हणाले पुष्कळ झालं. इतकं तरी कुठं बोलतेस तूं माझ्याशीं. बरं एवढं पान तर कर तयार. लक्ष्मीनें मुका-ट्यानें आपल्या पतीची आज्ञा मान्य केली. विडयाच्या पानाला तिनें चुना लावला आणि ती सुपारी कातरूं लागली. इतक्यांत कुणीतरी सदोबाला हांक मारली. सदोबा घाईघाईनें उठले. हा अपघात अर्थातच तिला बरा

वाटला नाहीं. एकप्रकारें तिला तो अपशकुनच वाटला. तिनें पान तसेंच गुंडाळलें आणि तेथें ठवलें. कोणत्या महत्त्वाच्या कामाकरतां असेल तें असो पण सदोबा डोक्याला पागोटें घालून बाहेर पडले. लक्ष्मीनें केलेला विडा तसाच राहिला. पायरी उतरताना सदोबाचा पाय घसरला आणि पडतांपडता ते थोडक्यांत सांवरले.

निरोप घेऊन आलेल्या इसमाबरोबर सदोबा इस्माईलच्या घरीं येऊन पोहोंचले. खानसाहेब आपल्या 'मकानांत' येरझारा घालीत होते. एक कोपऱ्यांत त्यांची आवडती आरामखुर्ची आराम करीत पडली होती. सदोबा येतांच इस्माईलनें त्याचें हंसून स्वागत केलें. खानसाहेब कर्जाच्या बाबत कांहीं तगादा लावतात कीं काय अशा आशंकेनें सदोबाचें चित्त व्याकुल होत होतें. पण खानसाहेबांच्या हास्यानें त्याना धीर आला. सदोबा बसल्यावर इस्माईल म्हणाला, "पाटील, आज तुम्हाला कां बोलावलं कळलं कां तुम्हाला ? आम्ही तुम्हाला आमच्या कर्जातून मुक्त केलें आहे !" ते शब्द कानीं पडतांच सदोबा क्षणभर चकित होऊन पाहूं लागले. त्यांचा स्वतःवर विश्वास बसेना. पण इस्माईलनें पुनः पुनः खात्री करून सांगित-ल्यामुळें शेवटीं त्यांची खात्री झाली. इस्माईलनें चिलीम तयार केली. कर्जमुक्त झाल्याच्या आनंदांत सदोबांनीं जोरांत चिलमीचा 'दम' मारला. चिलीम जरा कडकच लागली. डोक्यांत एकदम सुन्नपणा आला. सदोबांची स्वतःविषयींची जाणीव हळूहळू सुटत चालली. बेहोष झाल्या-प्रमाणें ते विकट हास्य करूं लागले. अपेक्षेप्रमाणें आपल्या सावजाची स्थिति होत चाललेली पाहून इस्माईलला पूर्णपणें समाधान झालें. त्यानें खूण करतांच दोघे नोकर आले. इस्माईलनें त्यांना कानांत कांहीं तरी सांगितलें आणि ती सर्व मंडळी रस्त्यानें चालूं लागली.

सदोबांच्या हास्याची परिणती वाचेंत झाली. त्यांची वाङ्मयीक चळवळ सुरू झाली. सदोबा बडबडूं लागले, "साडेतीन रुपयाचे साडेतीनशें होतील. त्याची दहापट केली तर साडेतीन हजार होतील. साऱ्या जगाचा मालक मी होईन. काय म्हणते माझी घरधनीण ? मी भिकारी–मी कंगाल ? घरावर सोन्याची कौलें चढवीन–दादा–मग काय अशी चंगळ अन् असा जल्लोस-

बरा–देखते पहा पठ्ठे–आजच्या आज पैसे मिळवीन अन् सगळया घराला सोन्याचे पत्रे ठोकीन. सोडणार नाहीं. माझी लक्ष्मी माझ्याजवळ रहात नाहीं काय ? ठीक आहे ! " सदोबांची अशीच बडबड चालू ठेवली तर आपल्या कार्याची गुप्तता फुटेल आणि कांहीं तरी घोंटाळा उत्पन्न होईल असें वाटून इस्माईलनें जोरानें सदोबाचा हात दाबला. त्या तसल्या बेहोष स्थितींतही सदोबांना इस्माईलचा धाक वाटला. त्यांनीं आपल्या ठिकाणीं नसलेल्या नजरेनें एकवार पाहिलें. मुख्य यंत्रापाशीं सर्व मंडळी येऊन पोहोंचली. इस्माईलनें बरोबरच्या नोकरांस दूर जाण्यास सांगितलें. सुटीची वेळ असल्यामुळें आसपास मनुष्य नव्हतें. यंत्राकरतां केलेल्या खड्याजवळ सदोबाला उभे करण्यांत आलें. सदोबाची शुद्ध सुटली होती. आपण कोठें आहोंत व आपल्या जिवाचा काय खेळखंडोबा चालला आहे ह्याची त्यांना शुद्ध नव्हती. सदोबाला हळूंच त्या खड्डयांत लोटण्यांत आलें. इस्माईलनें दोघां नोकरांना खूण केली. यंत्र हळूं हळूं खडयाकडे सरकूं लागलें. खोल तळाला असलेल्या सदोबाचा श्वासोछ्वास मंदमंद होऊं लागला. यंत्र आपल्या कठीणतेनें व अमानुषतेनें त्या खड्डयांत पुरलें जाऊं लागलें. लवकरच तें यंत्र पूर्णपणें आपल्या सिंहासनावर विराजमान झालें. त्या सिंहासनाच्या पायाला मानवी रक्तमांसाचा आधार होता आणि म्हणूनच पाशवी शक्तीचें तें प्रतीक आधुनिक युगांतील मानवी बुद्धीचें तें वैभवचिन्ह मोठया दिमाखानें आपल्या चकाकणाऱ्या डोळयांनीं पहात सूर्याला वेडावीत होतें. सदोबाला कायमची सुटी मिळाली. कार्यसिद्धी झाली म्हणून इस्माईलनें एकदां आपले हात झाडले. सदोबा आणि सकाळपासून उसळणारा आनंद, उचंबळणारा उल्हास आशेनें वेडावलेला जीव हीं सर्वच एकाक्षणीं त्या पाशवी शक्तीच्या पायीं विलीन झालीं. सुखाच्या संसाराची सुरवात होणार म्हणून जी वीज चमकली तिनें लक्ष्मीच्या संसाराचा मूळाधारच नष्ट केला. लक्ष्मीचें सौभाग्य धुळीला मिळालें, मातींत पुरलें गेलें. साडेतीन रुपयाच्या अफाट भांडवलावर जगाला पादाक्रांत करूं पहाणारे सदोबा त्या जगाच्या आहारीं गेले. एक अवतार संपला. लक्ष्मीची दैवी शक्ति–तिचें दैवी तेज जाणण्याची पात्रता अंगीं नसण्याच्या अपराधाबद्दल सदोबांचें असें अकाली बलिदान झालें !

घरांतलें काम उरकून लक्ष्मी बाहेर निघाली तों तिच्या पायाला नवऱ्याकरतां गुंडाळून ठेवलेला विडा लागला. वनस्पतीला तिनें नमस्कार केला आणि अगदीं विसरपणें ती कांहीं तासापूर्वीं घडलेल्या 'अद्भुत' प्रकाराबद्दल मनांतच विचार करीत ती रंगूकडे जाण्याकरतां निघाली. त्या वेळीं तिच्या मनाची स्थिती कोणत्या प्रकारची होती ? तिच्या मनाला आनंद वाटत होता कीं दुःखाची हुरहुर लागली होती ? अभागी लक्ष्मी, तुझें दुःख तूंच सोसूं जाणें ? धन्य तूं !—पण तुझें सौभाग्याचें आयुष्य—हाय !—



# प्रकरण १६ वें

## 'पापाची परिसीमा'

आपल्या भव्य दिवाणखान्यांत किसन विमनस्क स्थितींत फेऱ्या घालीत होता. नवीन आणलेल्या यंत्राविषयीं त्याचे विचार चालू होते. विशेषतः हिंदुस्थानच्या नव्या सफरींत त्याला जे विलक्षण अनुभव आले, त्यांचा तर त्याला एक न सरणारा विचार—विषय झाला होता. संपत्तीच्या लालसेनें आपण पुढें पुढें जात आहोंत. स्वतःचें शरीर झिजवीत आहोंत. हजारों मजुरांची उपासमार करून त्यांच्याकडून आपण हीं सर्व धनोत्पादक कामें करून घेतों आहोंत. ह्या सगळ्या खटाटोपाचा—ह्या हव्यासाचा अखेर परिणाम काय ? हें सर्व कोणाकरतां ? हा अत्यंत भयंकर प्रश्न त्याच्यापुढें उभा राहिला. त्या प्रश्नाचें स्वरूप वामनावतारासारखें अत्यंत सूक्ष्म होतें पण त्या प्रश्नाची अंतर्शक्ति सगळ्या जीवसृष्टीला समावून उरण्याइतकी विशाल होती. किसन स्वतः त्या कांचनद्वीपांत बलीराजाच होता. आपल्या वैभवाचें दिग्दर्शन जगाला करावें अशी त्याला जेव्हां इच्छा झाली त्याच वेळीं अगदीं अचूक रीतीनें तो प्रश्न प्रथम अत्यंत क्षुद्रस्वरूप धारण करून त्याच्यापुढें उभा राहिला. हळू हळू त्या प्रश्नाचें स्वरूप विस्तृत होऊं लागलें. एकांतून अनेक असे निरनिराळे प्रश्न त्याच्यावर तुटून पडूं लागले.

आजपर्यंत जबरदस्तीनें छळून गप्प बसवलेल्या मनोवृत्ति आतां उसळून त्याला विचारूं लागल्या, " तूं अमर आहेस काय ?"

किसनच्या अशा विचारांच्या वेळींच दिवाणखान्याचें दार उघडलें गेलें आणि मिलिंद आंत आला. नेहमींच्या पद्धतीप्रमाणें त्यानें सह्याकरतां कागद आणले होते ते टेबलावर ठेवून तो बाजूला उभा राहिला. किसननें सह्या करण्यास सुरवात केली, त्यांत एक वर्तमानपत्राचें 'बिल' होतें. त्या बिलावर सही करतांना किंचित्काळ किसन थांबला आणि ते 'बिल' देण्याचा हुकूम त्यानें लिहिला. ऑफिसचें काम आटोपतांच नमस्कार करून मिलिंद जावयाला निघाला. किसननें त्याला प्रतिनमस्कार केला आणि तो म्हणाला, " मिलिंद, तुमचा ऑफिस टाईम झाला. आतां ह्यापुढें मी तुम्हांला येथें अडकवून ठेवणें म्हणजे तुमच्यावर एक प्रकारें जुलूम करण्यासारखेंच होईल. पण तुमची गैरसोय होत नसेल तर एक घटकाभर आपण येथें थांबा." इतकेंच म्हणून किसननें एक उसासा टाकला. त्याच्या स्वरांत आर्जवीपणा होता आणि तो कितीही दुष्ट असला तरी त्याची ही विनंती अमान्य करावी असें मिलिंदाला वाटेना. इतर वेळीं आपल्या स्वातंत्र्याचा अपहार करणारा—आपल्या कायदेशीर हक्कांची पायमल्ली करणारा म्हणून कदाचित् मिलिंदानें किसनविरुद्ध ' बंड ' पुकारलें असतें. पण त्याच किसनची ही विनंती त्याला मोडवेना. मिलिंद बसला हें पाहून किसनला फार बरें वाटलें. त्यानें आपल्या नोकराला दुधाचे दोन पेले आणण्यास सांगितलें.

मिलिंद कांहीं तरी बोलून शांतता मोडली पाहिजे ह्या हेतूनें म्हणाला, " आपली नवीन यंत्रसामुग्री बहुतेक ' फिट ' होत आली आहे. बाहेरचें कांपाऊन्ड तर तयार झालेंच आहे. शिवाय यंत्राचे सर्व भागही जिथल्यातिथें बसवून झाले. सर्वांत मोठा ' — ' तोही मी आतां पहात आलों तर बसवला गेला आहे. त्याला फुलांच्या माळा वगैरे घातल्या आहेत. " हें ऐकून किसनला काय वाटलें असेल तें कळणें कठीण. पण त्यानें अगदीं चमत्कारिक स्वरांत प्रश्न केला, " खरंच—मिलिंद—माझ्या ह्या वैभवाचें वर्णन करतांना तुम्हाला काय वाटतं बरं ?" मिलिंद कांहींच बोलला नाहीं. त्याला बोलावें कीं न बोलावें ह्याचा निर्णय लवकर होईना. तो आपला खिडकींतून दिसणाऱ्या क्षितीजाकडे पहात राहिला. किसन पुन्हां

म्हणाला " मी तुम्हांला स्पष्टच विचारतों, अनीतीनें-जुलमानें मिळवलेला पैसा चांगला का? आजकालच्या जगांत जिकडे तिकडे 'भांडवलशाही' विरुद्ध चळवळ चाललेली आहे. तुमच्यासारखे तरुण स्वतःला 'देशभक्त' म्हणवून घेऊन आपल्या देशाचा उद्धार करायला निघाले आहेत! वास्तविक भांडवलवाल्याच्या पैशावरच तुमचे सर्व 'फंड' पोसले जात आहेत; असें असून त्यांच्याविरुद्ध चळवळ करणें म्हणजे निमकहरामपणा नव्हे का?" तो आकस्मिक हल्ला पाहून मिलिंद प्रथम तर गांगरूनच गेला. पण किंचित् सावरून तो म्हणाला, "साहेब, आपण हा थोडा अस्वाभाविक वाद काढलात. तुमचा मी नोकर ह्या दृष्टीनें मतभेद पुढें मांडणें केव्हांही अनिष्टच! तरी पण तुमच्याच परवानगीनें मी येथें बसलों आहें, तेव्हां आपणाला अप्रिय वाटणारें असलें तरी माझें मत मला सांगायला हवेंच! तें माझें कर्तव्य आहे. आपण जो आक्षेप घेतलात त्यांत आपण एका गोष्टीकडे आणि अत्यंत महत्वाच्या अशा गोष्टीकडे डोळेझांक करीत आहां. सध्यांची चळवळ ही भांडवलवाले ह्या व्यक्तींच्या विरुद्ध नाहीं. तर पैशामुळें या अघोर मार्गाचा अवलंब ते करीत आहेत त्या पद्धतीविरुद्ध आहे. पैशाला कितीही आपण नांवें ठेवलीं तरी त्यावरच मनुष्याचें व्यवहार अवलंबून आहेत. पैसा जितका भांडवलवाल्यांना प्रिय आहे, तितकाच मजूरांनाही तो प्रिय आहे."

किसन म्हणाला, " मग हें जर आहे तर विरोध कुठें!"

मिलिंद म्हणाला, " विरोध फक्त त्या पैशाच्या विनियोगाबाबत आहे. मजूर वर्गाचे हाल करून त्या पैशावर भांडवलवाले जी चैन करतात; जो त्या पैशाचा अपव्यय करतात तो पाहून हल्लींच्या तरुणांचें रक्त तापतें." किसन काहींशा उपरोधिक स्वरानें म्हणाला, " कबूल. पण अशी कोणती शक्ति तुमच्या जवळ आहे कीं जिच्या जोरावर तुम्ही ही भांडवलशाही रसातळाला पोंचवाल? तुम्हां तरुणांत तरी असा एक मार्ग कुठें आहे? निकृष्ट स्थितीला पोंचलेल्या मजुरांत तरी कुठं आहे? मजूरवर्ग तरी असा कितपत नीतीनें वागतो? उलट व्यसनाचें प्रमाण मजूर वर्गातच अधिक आहे. तुम्ही ज्याचा उद्धार करूं पहातां त्याला स्वतःला कुठें अशी इच्छा आहे कीं आपलें मंगल व्हावें—आपण स्वतंत्र व्हावें? मग तुम्ही हा अव्यापा-

रेषु व्यापार कां करावा ? मजुरांना पोटाला थोडें कां होईना, पण भांडवल-वालेच देतात. उलट ' फंड ' जमवून त्या थोड्यांतले तुम्ही काढून घेतां—तेव्हां सांगा, अशा स्थितींत त्या मजुरांचा खरा हितकर्ता कोण ? त्यांना अर्धपोटीं कां होईना पण जिवंत ठेवणारा धनी, कीं त्या अर्धपोटीं मजुरीतून फंडाच्या रूपानें त्यांना लुबाडणारा देशभक्त ?" हा किसनचा युक्तिवाद कांहींसा बिनतोड होता. किसनच्या म्हणण्याला सत्याचा आधार होता. त्याला काय उत्तर द्यावें ह्याचा मिलिंदाला थोडावेळ विचार पडला. तरी उत्तर न देणें म्हणजे सिद्धान्त मान्य करणें असा अर्थ होईल म्हणून तो म्हणाला, "आपण म्हणतां तें खरं आहे. तरी पण आम्ही आमच्या ह्या नव्या चळवळींना आतांच कुठें सुरवात केली आहे. निरपेक्षबुद्धीनें कार्य करणारी देशभक्तांची पिढी अजून अद्याप जन्माला यावयाची आहे. देशसेवेचें खडतर व्रत सतत चालू राहील अशा मनोवृत्तींची जोपासना कांहीं झालें तरी आम्ही करायलाच हवी. पक्षभेद—अनीति—दुराचरण ह्या सर्व गोष्टी अम्हांला प्रथम नडणारच; पण असा आत्मविश्वास उत्पन्न झाला कीं आम्हीं आपलें ध्येय गांठूं. म्हणजे मग आजच्या सर्व चुकांचें परिमार्जन होईल. तें आत्मबल अद्याप तयार व्हायचें आहे. तोंपर्यंत, चिमूटभर लोकांनीं हा अग्नि जळत ठेवला पाहिजे. मग त्या ज्वलनाकरतां स्वतःच्या देहाचें हवन करावें लागलें तरी चिंता नाहीं." मिलिंदाचा स्वर शेवटीं शेवटीं उत्तेजित होत गेला. स्वदेशभक्तीनें त्याच्या वृत्ति थरारल्या. क्षणकाल त्याला आपण कुणासमोर बोलत आहोंत, ह्याचाही विसर पडला. किसनसारख्या कट्टर भावलवाल्याच्या समोर असलीं क्रांतिकारक मतें कशीं सांगावींत, ह्याचें त्याला भानच उरलें नाहीं. मिलिंदाचें तें ' भाषण ' ऐकून किसन बराच वेळ कांहीं बोलला नाहीं. तो कांहीं तरी निराळ्याच विचारांत गढून गेल्यासारखा दिसत होता. मिलिंद थोडावेळ थांबून म्हणाला, ' शिवाय असं पहा ! परवांच लक्ष्मीवर घडलेल्या अत्याचाराविषयीं तुम्ही ऐकलंच असेल. इस्माईल सारख्या यःकश्चित मनुष्याला तुम्हीच चढवलात. तुम्हीच उत्पन्न केलेला हा भस्मासुर तुमच्याच मुलाबाळांच्या डोक्यावर हात ठेवून त्यांना भस्मसात् करीत आहे. अशा ह्या

रगाड्यां मजुरांनीं आपलें वित्तच काय पण चित्तसुद्धां ह्या चळवळीला दिलं पाहिजे.'

" मग तुम्हींच कां नाहीं असं चित्त आणि वित्त जुळवण्याचा प्रयत्न करीत ?" किसननें विचारलें.

" छे, छे, आपला हा केवळ वाद होता. त्यांत मी अथवा तुम्ही व्यक्तिशः कुठल्याच रीतीनें गोवले जात नाहीं. माझ्यांत एकतर अशी चळवळ करण्याची ताकद नाहीं. आणि तुमच्या विरुद्ध—?" इतकेंच म्हणून मिलिंद थांबला. किसनला शेवटचे शब्द ऐकून गोंधळल्यासारखे झालें. रुद्धकंठानें तो म्हणाला, " बरं मिलिंद, तुम्हांला उगीच मी एवढा मनस्ताप दिला. तुम्ही जा आतां " मिलिंद निघून गेला. क्षीण दृष्टीनें मावळत्या सूर्यनारायणाकडे पहात किसन बसला होता. मिलिंदाच्या स्पष्टोक्तीनें त्याला काय वाटलें हे कळणें कठीण आहे. पण बराच वेळ तो स्तब्ध बसून राहिला. पश्चिम दिशेला क्षितिजावर बारीक बारीक मेघखंड कांहीं काळ सूर्य किरणांच्या रंगानें रंगत होते आणि त्या सूर्यकिरणांचा अस्त होतांच काळेठिक्कर पडत होते. अलौकिक तेजाच्या स्पर्शानें कृष्णवर्णाचे मेघसुद्धां उज्वल होतात ! त्या निसर्गाच्या शिकवणुकीनें किसनच्या अंतःकरणांत निराळाच प्रकाश पडला. सगळी सृष्टि अंधारांत बुडत होती.

किसनच्या दिवाणखान्याचें दार उघडलें गेलें. त्याठिकाणीं नोकरानें अद्याप दिवा आणून ठेवला नव्हता. इस्माईल आंत आला आणि त्यानें अदबीनें सलाम केला. किसननें त्याच्याकडे लक्षच दिलें नाहीं. ' तुम्हीच उत्पन्न केलेला भस्मासुर ' हे मिलिंदाचे शब्द त्याच्या कानांत अजून निनादत होते. इस्माईलनें होऊनच बोलण्यास सुरवात केली. उल्हसित स्वरानें तो म्हणाला, " हुजूर काम फत्ते. आपल्या नव्या यंत्राची मांडणी पूर्ण झाली; अगदीं मनासारखी झाली. आतां त्या यंत्रापासून अपघाताची भीति नाहीं !" किसनला शेवटच्या वाक्याचा अर्थ कळला नाहीं. त्यानें आशंकून विचारलें, "कां? कां भीति नको बाळगायला ?" आपल्या कर्तबगारीबद्दल पूर्णपणें खूष होऊन किसनकडून आपल्याला फार मोठें बक्षीस मिळणार, आपल्या आजवरच्या सेवेचें चीज होणार, अशी खात्री वाटून इस्माईलनें उत्तर दिलें, " सरकार यंत्राचा बळी यंत्राला दिला. मनुष्याचा

एकदां बळी घेतल्यावर मग अपघाताची भीति नको ! " एकादी वीज कोसळून अंगावर पडावी तसा त्या शब्दांचा किसनच्या मनावर परिणाम झाला. त्याचें मस्तक बधिर झालें. त्याच्या सगळ्या शरिरांतली चेतना क्षण-काल स्थिरावली. त्यानें अधीर होऊन प्रश्न केला, " कोणाचा बळी दिला ?"

इस्माईलकडून उत्तर आलें, " आपल्या सदोबाचा ! त्या बावळट पाटलाचा ! "

किसनच्या मनांत दारुण शंका आली व तो ओरडून म्हणाला, "कोण? कोण सदोबा कोण ? "

" लक्ष्मीचा नवरा—तो गजंड !"

" चूप ! बेइमान सगळा सत्यानास केलास. खबरदार एक शब्द अधिक बोलशील तर! लक्ष्मीचा नवरा बळी दिला! हा! हा!" किसनचा संताप चढूं लागला. त्याच्या डोळ्यावाटें जणूं अग्नीचे कण पडत होते. तो जागेवरून उठला आणि त्यानें इस्माईलचे दोन्ही दंड धरून त्याला गदगद हलवले. पुत्र शोकानें व्याकुल झालेल्या धृतराष्ट्रप्रमाणें किसननें दोन्ही हातांच्या मगरमिठींत इस्माईलचा चुरा करून टाकला असता. इस्माईलला धन्याच्या ह्या वर्तनाचें अत्यंत आश्चर्य वाटलें आणि भीतिही वाटली. आपली अपेक्षा नव्हे खात्री, अशा रीतीनें फोल ठरेल हें त्याला स्वप्नातही खरें वाटलें नसतें. किसनची जोराची पकड आणि त्याचा तिक्त स्वर ह्यामुळें तर त्याच्या काळजाचें पाणी झालें. किसन तीव्र दृष्टीनें त्याच्याकडे पहात म्हणाला, " जा ! एकदम येथून निघून जा. एक क्षणसुद्धां माझ्यासमोर राहूं नकोस आणि तुझी नोकरी पण ह्यापुढें कमी केली आहे. चल जा नीच ! " इतकें म्हणून जवळ जवळ धक्का मारून त्यानें इस्माईलला घाल-वून दिलें. असा कोणता अपराध आपण केला हें इस्माईलच्या लक्षांत येईना. आपली नोकरी जावी, आपला असा अपमान व्हावा, ह्यामुळें चिडूनच तो बाहेर पडला.

दिवाणखान्यांत दिवा आणून ठेवला गेला. किसनचा संताप अद्याप उतरला नव्हता. त्याची सर्व शक्ति एकाच मनोविकाराच्या आधीन होत होती. क्रोधानें आपलें शिखर गांठलें. ती चढण चढून दमलेला किसन खिन्न झाला. अस्वस्थ झाला. आतां क्रोधाची उतरण सुरू झाली. ताणलेल्या मनो-

वृत्ति आकुंचित होऊं लागल्या. किसनवर विषादाची—आत्मोपहासांची दाट छाया पसरू लागली. अंत:करणावर कुठून तरी जोराचा दाब बसत आहे, आणि त्या दाबाखालीं आपलें अंत:करण पिळवटून निघत आहे, असा त्याला भास झाला. त्यानें दिव्याकडे पाहिलें. दीपज्योतींतून प्रकाशाचे कण त्याच्याकडे जोरानें धावत होते आणि त्याच्या अंत:करणाला चटके देत होते. 'तुम्हीच उत्पन्न केलेला भस्मासूर" तेच शब्द त्याच्या भोंवतीं अक्राळविक्राळ रूप घेऊन नाचूं लागले. त्या भेसूर तांडवाचा ताल कर्णकठोर होता. किसनच्या विचारचक्राला कित्येक वर्षांत मिळाली नव्हती अशी तीव्र गति मिळाली.

"मीच उत्पन्न केलेला भस्मासुर—हाय—किती तीव्र—कठोर सत्य हें! मी केलेलें पाप आतां माझ्यावरच उलटणार! माझी दुष्टबुद्धि मलाच मारण्यांचे कट करणार! माझ्या डोक्यावर हात ठेवून मला भस्मसात् करणार. ह्या सर्व प्राणघातकी माऱ्यांतून मी कसा सुटणार? मी आतां कसा जिवंत रहाणार?" किसनच्या विचारचक्राचा असा एक फेरा पुरा झाला.

"तूं अमर आहेस काय? मी अमर नाहीं त्याप्रमाणें जगांतली प्रत्येक व्यक्ती नश्वर आहे. मग मलाच ही दारुण भीति कां वाटते? मिलिंद लक्ष्मी ह्यांच्याच अंगीं असें तेज कां? माझ्या आयुष्याचा शेवट होणार, म्हणून मला कांहींच करतां येत नाहीं. मृत्यूचें उग्रस्वरूप टवकारून मजकडे पहात आहे. मी आजपर्यंत केलेले विलास—छळ—अन्याय आजच माझ्याकडे पाहून खदखदां हंसत आहेत. मी असा चिरडला जात आहें. कोण माझ्या अंत:करणांत ह्या भयप्रद कल्पनांना घुसवीत आहे? ही दारुण योजना कुणाची? आजपर्यंत सुप्त असलेल्या शक्तींना कोण जागे करीत आहे? माझ्यावर हा जुलूम कोण करीत आहे? काय माझा मी ह्या सर्व अनवस्थेला कारण?—मीच ह्याला जबाबदार? हें सर्व मीच केलें. आतां मीच त्याचें प्रायश्चित्त घेणार. कां? कां? माझ्यावर हा कहर उसळत आहे? माझ्या शरिराची शक्ति क्षीण होत आहे. माझ्या मनाची शक्ति विलय पावत आहे. अशा संकटकाळीं अशा दुबळ्या स्थितींत हा जुलूम माझ्यावर कां व्हावा?" विचारचक्र उलट्या दिशेनें धार धरून धावूं लागलें. विकट हास्य करून त्याचे प्रश्न त्याला उत्तर देऊं लागले.

"तूं तरी निराळे काय केलेंस? अर्धपोटीं मजुरांचा छळ तूं केव्हां

आणि कां केलास? दीनदुबळ्या पतिव्रतांचा पदर तूं कां ओढलास? नीतीला नागवी करतांना, माणुसकीचें नरडें दाबतांना, तूं तरी कुठें विचार केलास? तुझ्यावर आतां होत असलेला जुलूम तूंच पेरलेल्या कृत्यांचें फळ आहे. अजून तरी शुद्धीवर ये. मानती हत्येनें तरी सावध हो. ह्या पापांचें प्रायश्चित्त अजून तरी घे, अजून आपल्या वर्तनानें चिरंजीव हो. अमर हो. तुला छळणाऱ्या शक्ति सत्कार्याकडे लाव. दीनदुबळ्यांचा वाली हो. अजून सृष्टीचे सिंहासन तुला मिळेल. अद्याप अवकाश आहे आमची ही निर्वाणीची सूचना आहे. शेवटीं तरी लक्षांत घे. अजून तरी सावध हो !"

त्या फटकाऱ्यानें रडकुंडीस आलेली त्याची दीनवाणी बापुडवाणी शक्ति स्फुंदून स्फुंदून अश्रू ढाळूं लागली. खिन्न मुद्रेनें ती विचार करूं लागली, "आतां मला कुठला आधार? मला आतां मार्ग कोण दाखवणार? समळ्या जगाकडून 'पापी' म्हणून माझा उपहास होत असतां सदय अंतःकरणानें मला आश्रय देईल असा या जगाच्या पाठीवर महात्मा कोण आहे ? मी कुणाकडे जाऊं ? मी कुणाचें चिंतन करूं. कुणाची पायधरणी करूं ?"

गंभीर ध्वनी झाला आणि उत्तर आलें, "आपणच आपला उद्धार करायचा! स्वतःलाच शरण जा. जें तुला आजपर्यंत दुर्बल वाटत होतें त्यांतच अजिंक्य शक्ति सांठवलेली आहे. जें तुला आजपर्यंत यःकश्चित् वाटत होतें. ज्याच्याकडे आजपर्यंत तूं तोंड फिरवून उभा होतास तेथेंच त्याच धुळींत त्याच दगडांत सर्व विश्वाचें मंगल करणारी शक्ति अधिष्ठित झाली आहे. उगाच सैरावैरा धावूं नकोस. स्वतःचाच स्वतः उपदेशक हो. संकटांत विशेषतः अशा संकटांत ज्याचा तोच !"

किसननें त्या उपदेशापुढें मस्तक नम्र केलें. त्याचें अंतःकरण स्थिरावत चाललें. दिव्याची ज्योत शांतपणें जळत होती. अशाच दिव्याच्या प्रकाशांत एक अद्भुत पाहिल्याची आठवण त्याला झाली. त्या निरपराधी–पुण्यशील स्त्रीचें सौभाग्य नष्ट व्हायला कारण आपण ! हाय हाय ! ती स्त्री किती थोर. किती उदात्त ! तिच्यासाठीं आत्मसमर्पण करणारा तो दीप आपला गुरू ! त्या दिव्य संदेशाची आज आपणाला प्राप्ति व्हावी अशा संकटानें आपणाला इतक्या अलौकिक ज्ञानाचा लाभ द्यावा ! धन्य

ती स्त्री ! असा कोणता गुण तिच्यांत होता? असें कोणतें तेज तेथें होते, कीं त्यामुळें आपल्या मानसिक वृत्ति तळापासून ढवळल्या जातात !

श्रद्धा–श्रद्धा–श्रद्धा–हीं अक्षरें त्या दीपज्योतींत तेजःकणांच्या सिंहासनावर अधिष्ठित झालेलीं त्याला दिसलीं. त्या सिंहासनस्थ देवीला त्यानें विनम्रभावानें प्रणिपात केला.

---

## प्रकरण १७ वें

## ‘ प्रायश्चित्त ’

पहाटेस मिलिंद जागा झाला तेव्हां एका अत्यंत हृदयंगम स्वप्नांतून तो तरंगत होता. त्या स्वप्नाचा अद्भुतपणा आणि अकाल्पितपणा ह्यामुळें तर तो फारच गोंधळांत पडला. वास्तविक स्वप्नांवरून भविष्य सांगण्याचा त्याला नाद नव्हता. पण त्या स्वप्नानें त्याला चांगलाच चटका लावला. मिलिंदाची स्वप्नसृष्टि अशी रंगली होती:—

“ रोजच्या प्रमाणें सकाळीं आपण कामावर गेलों, आणि आपण आपल्या कामास सुरवात केली. टपालची वेळ झाली. एक लट्ठ पिवळें पाकीट त्यांत होतें. किसनच्या नांवचें सगळें टपाल आपण त्याला दिलें त्यांतच तें पिवळें पाकीटही दिलें. त्यावरील अक्षर पाहून तो दचकला. त्यानें घाईघाईनें तें पाकीट फोडलें आणि आंतील मजकुरावरून नजर फिरवली. त्याची वृत्ति अधीर होऊं लागली. त्याच्या डोळयांत कधींही आपण न पाहिलेले अश्रू दिसूं लागले. त्यानें पत्र वाचून खालीं ठेवलें आणि बोटानें आपणास जवळ येण्याविषयीं खूण केली. आपण त्याच्या जवळ जातांच अत्यंत सद्गदित कंठांत तो म्हणाला ‘ मिलिंद--मिलिंद ’ त्यानें आपला हात हातीं धरून जोरानें दाबला. एखाद्या अधाशाप्रमाणें आपल्या तोंडाकडे तो पहातच राहिला. त्याच्या दृष्टींत विलक्षण स्नेह दिसत होता. त्याच्या मुखावर वत्सलता भरून राहिली होती. तशा स्थितींत थोडा वेळ गेला आणि नंतर किसन म्हणाला, “ मिलिंद, मला किती आनंद

झाला आहे ह्याची तुम्हाला कल्पना नाहीं. मला जें पहिल्या पासून वाटत होतें, जी माझी आजपर्यंतची अत्यंत तीव्र इच्छा होती ती सफल झ.ली. मिलिंद माझ्या जीवनाची पापमय कहाणी मी तुम्हांला सांगितली तर तुम्ही माझा तिरस्कार कराल. पण मी तरी काय करूं! सगळ्या जगानें मला धुडकावून दिलें. माझ्या स्नेहवृत्ति अस्तित्वांत रहाणार नाहींत, इतक्या क्रूरपणानें प्रथम जगानें मला वागवलें. संधी सांपडतांच मी त्या जगावर सूड घेतला. पण तुमच्या रूपानें जगानें मला माझ्या संपूर्ण नुकसानीची भरपाई करून दिली. अहाहा! आजचा सोन्याचा दिवस उगवेल असं मला कधींही वाटलें नव्हतें. आतां माझं दुःख संपलं. आतां आपण सर्वजण मोठ्या सुखानें राहूं. मिलिंद, तुमच्या रूपानें–तुमच्या गुणानें मी वेडावून गेलों. तुमच्यासारखा मुलगा माझ्या नशिबीं असेल, असें मला अभाग्याला कधींही वाटलें नव्हतें. तुमची उत्कटता–तुमची परदुःख हरणाची तळमळ, ह्यामुळें तुम्ही मला अधिक प्रिय आहांत. मनुष्याला अमर व्हावं असंच वाटतं आणि ही त्याची भावना अत्यंत सहाजिक आहे. आपल्या संततीच्या द्वारें मनुष्य अमर होत असतो. ज्या सृष्टींतून परमेश्वर जगतो, तशाच प्रकारची मुलाबाळांची सृष्टि निर्माण करून मनुष्य जगतो. तें अमरपद मला आज मिळालें. इतकीं वर्षे अंतःकरणांत जुलमानें कोंडून ठेवलेली ही अपत्यस्नेहाची भावना आज अशा रीतीनें सफल झाली. ये–ये मिलिंद, माझ्या लाडक्या मुला ये. आणि ह्या तुझ्या वृद्धपित्याला कडकडून भेट! किसनचा स्वर कंपित झाला. त्याच्या नेत्रांतून झरझर अश्रू वाहूं लागले. तो काय बोलतो ह्याचा अर्थच आपणांला समजेना. मात्र त्याच्या त्या स्वरातून आणि एकंदर आविर्भावांतून कांहीं तरी आपणांला आपल्या मनांत तशाच संवेदना उत्पन्न करणारें कांहीं तरी आहे. न कळत आपल्या वृत्ति त्याच्याकडे ओढल्या जात आहेत. इतके दिवस आपणांला आपण एकटे, आपल्यावर प्रेम करणारें कुणी ही नाहीं, म्हणून खेद वाटत असे; पण आज आपल्या मनाला आनंद झाला. किसन पापी असला तरी वृद्ध आहे. आपला पिता आहे. ह्या दृष्टीनें आपण त्याच्याकडे पाहूं लागलों. त्याचीं पापें कुठल्याकुठें गेलीं. त्याच्या मुखाभोंवतीं वात्सल्यरसाची अलौकिक कांति विलसूं लागली. तो आनंदरसांत डुंबत होता

आणि आपणाला त्यांचा आस्वाद घेण्याकरतां हातीं धरून नेत होता. आपल्या स्थित्यंतरामुळें आपण अगदीं गोंधळून गेलों. कांचनद्वीपाची मालकी आपणाकडे येणार, ह्या विचारानें आपले देशभक्तीचे विचार कोठच्या कोठें पार पळून गेले. लक्ष्मीचीसुद्धां आपल्याला आठवण राहिली नाहीं. पण किसननें आपल्याला त्या वैभवाच्या निद्रेतून जागें केलें आणि म्हटलें, "बाळा, माझ्या दोन अपत्यांपैकीं एक तर तू मिळालास! पण जगानें गिळलेलें दुसरें माणिक—माझी मुलगी मला अद्याप मिळायची आहे. तिचा तूं शोध कर. वीस वर्षांपूर्वी तिच्या डोळ्यांत असलेलें तेज आजही माझ्यासमोर आहे. आपण त्यावर म्हणालों, "लक्ष्मीला आपण आपली मुलगी माना!" त्यावर किसनची स्थिति चमत्कारीक झाली. त्याचे पाय पुन्हां परतले. त्याची मुद्रा काळवंडली. सैतान पुन्हां आपल्या ठिकाणीं आला. त्यानें विकट हास्य केलें, आणि तो म्हणाला, " लक्ष्मी माझी मुलगी? छे! छे! तें शक्य नाहीं! माझ्या पापवासनेचा तो तर शेवटचा बळी आहे " त्या विकट हास्यानें आणि त्याहीपेक्षां भयंकर अशा त्या शब्दांनीं मिलिंद जागा झाला आणि विचार करूं लागला. उप:काल झाला. पक्षाची किलबिल अद्याप सुरू झाली नव्हती. मजुरांच्या झोंपड्यातून निद्रादेवी आपला पाय हळूं हळूं काढूं लागली. मिलिंदाच्या दारावर टक टक असा आवाज झाला. मिलिंदानें दार उघडलें आणि पाहिलें, तों किसनकडचा बोलावणेंकरी. त्यानें अगदीं गडबडीनें आपला निरोप सांगितला, " बाबूजी जलदी बोलावलें आहे तुम्हांला. सरकार अगदीं वाट पहात बसले आहेत. "

त्यावर मिलिंदानें विचारलें "इतक्या लवकर?"

" जी हां—काम काय तें माहीत नाहीं. पण बोलावलें आहे तावडतोब" एवढें सांगून तो बोलावणेंकरी निघून गेला. मिलिंदानें घाईनें तोंड वगैरे धुतलें आणि कपडे करून तो निघाला. त्याला पडलेलें स्वप्न आणि आताचें बोलावणें ह्यांत कांहींतरी संबंध असावा असें त्याला वाटले. लक्ष्मीवर तर कांहीं नवीन संकट येत नाहीं ना! स्वप्नांत जरी किसननें आपल्याला पुत्र मानलें असलें तरी प्रत्यक्ष आपला शब्द कितपत मानला जाईल ह्याची जबर शंका मिलिंदाला वाटत होती. आपण काल स्पष्टपणें बोललेलीं मतें आणि त्यांचा तिखटपणा ह्यामुळें संतापून जाऊन आपलें पारिपत्य करावें

म्हणून तर हें बोलावणें आलें नाहीं ना ! अशा निरनिराळ्या शंकाकुशंकांच्या धांदलींत त्याला भोंवतालच्या सृष्टीकडे लक्ष द्यायला फुरसतच झाली नाहीं. किसनच्या प्रासदाच्या पायऱ्या चढून तो दिवाणखान्यांत पोहोचला. किसन एका खुर्चीवर अस्वस्थपणें बसला होता. त्याचे डोळे रात्रभर झोंप न लागल्यामुळें सुजल्यासारखे दिसत होते. त्याची सर्व कांती पालटून गेली होती. त्याचा उग्रपणा कुठल्याकुठे गेला होता. तो एकदम अधिक वृद्ध अधिक दुर्बल दिसत होता तरी त्याच्या एकंदर वागणुकींत करारीपणा कायम होता. मिलिंद येतांच त्यानें त्याला बसण्यास सांगितलें आणि आपणच बोलण्यास सुरवात केली, "तुम्ही जे काल म्हणालांत कीं मीच उत्पन्न केलेला भस्मासुर माझ्याच मुलाबाळांना भस्मसात् करीत आहे. अगदीं अक्षरशः तुमचें म्हणणें खरं आहे. आतां तुम्ही मी सांगतों त्याप्रमाणें तयारी करा. आपले सर्व मजूर लोक आपापलीं हत्यारें घेऊन त्या यंत्राभोंवतीं बोलवा. आपल्या स्टोअरमध्यें असतील नसतील तेवढे तेलाचे डबे त्याठिकाणीं पाठवून देण्याची व्यवस्था करा. चला जलदी करा. मी सांगतो त्यांतला प्रत्येक शब्द अक्षरशः पाळला गेला पाहिजे !" त्या विलक्षण हुकमानें मिलिंद तर गोंधळूनच गेला. आपण रात्रीं स्वप्नांत पाहिलेला किसन आणि आतां आपणाला हुकूम करणार किसन ह्यांची तो मनांतल्या मनांत तुलना करूं लागला. पण वेळ घालवणें शक्य नव्हते. हुकमाची अमलबजावणी करण्याकरतां मुकाट्यानें तो निघून गेला.

मिलिंद जातांच किसननें लिहिण्याचें साहित्य गोळा केलें. त्याच्या नेहमींच्या तडफेनें तो काम करूं लागला. कशाचा तरी संचार झाल्याप्रमाणें तो वागत होता. त्यानें लिहिण्यास सुरवात केली. भरभर त्यानें दोन तीन कागद लिहिले. ते कागद एका पाकीटांत घालून तें पाकीट बंद केलें आणि आपल्या तिजोरींत ते पाकीट ठेवलें. तिजोरींतली शिल्लक त्यानें मोजली. स्वतःजवळ असलेलें सगळें जवाहीर तपासून त्याची एक यादी त्यानें केली. आपलें सर्व सामानसुमानाच्या याद्या त्यानें तयार केल्या. अशी सर्व व्यवस्था झाल्यावर त्यानें एक उसासा टाकला. अंगांतली सर्व शक्ति एकवटून तो कशाशीं तरी झगडत होता. प्रत्येक क्षणीं त्याच्या अंतःकरणांत परस्परविरोधी मनोविकारांचें तुंबळ युद्ध होत होतें. लोभासारख्या

प्रचंड शत्रु त्याला आपल्या मिठींतून सोडण्यास तयार नव्हता. पण पोलादी निश्चयानें किसन झगडत होता. नंतर त्यानें आपल्या गुप्त तळघरांत असलेलीं शस्त्रें घेऊन ती वाड्याच्या मागील विहीरींत टाकून दिलीं. त्यानें आपला काळा डगला चढवला आणि कमरबंदांत आपलें नेहमींचें ‘ पिस्तुल ’ ठेवलें.

इतक्या अवधींत मिलिंद परत आला व त्यानें आपल्या आज्ञेप्रमाणें सर्व गोष्टी सज्ज आहेत म्हणून किसनला सांगितलें, ‘ ठीक आहे ’ असें तोटकें उत्तर देऊन किसन आपल्या वाड्याच्या पायऱ्या उतरूं लागला. मिलिंद त्याच्या मागोमाग निघाला. किसनच्या चालींत स्थिरता नव्हती. अती श्रमानें त्याचे पाय कांपत होते. त्यानें मिलिंदाला जवळ बोलावलें आणि त्याच्या खांद्यावर हात ठेवून तो चालूं लागला.

यंत्रजवळ सर्व मजूर जमले होते. आपणाला येथें कशाकरतां बोलावण्यांत आलें ह्याचा नक्की अंदाज कुणालाच येईना. पण आजपर्यंत झाल्या हुकमाला हटकण्याची संवय कुणालाच नसल्यामुळें प्रत्येक जण मुकाट्यानें त्या ठिकाणीं जमल्यावर सगळ्या मजुरांच्या लक्षांत एक गोष्ट प्रामुख्यानें आली ती ही कीं इस्माईलचा तेथें पत्ता नव्हता. वास्तविक सर्व काय झालें तें इस्माईलच्या देखरेखीखालीं झालें असें असून तो तेथें नव्हता ही गोष्ट जरा नवल करण्याचीच होती. पण किसनबरोबर कदाचित् तो असेल असेंही कांहीं जणांना वाटलें. यंत्राची पूजा करून बहुधा बक्षिसें वाटण्यांत येणार असावींत असा कांहीं जणांचा तर्क होता. तर इतर कित्येक दुसरें कांहीं तर्क करीत होते. प्रत्येकजण आपली अक्कल लढवीत होता आणि दुसऱ्याचें म्हणणें चूक आहे. असेंच ठरवीत होता. पण त्यांच्या या तर्कटाला फारसा अवधि मिळालाच नाहीं; कारण मिलिंद आणि किसन तेथें येऊन पोहोंचले. किसननें एकदां त्या सगळ्या मजुरांकडे आपली दृष्टी फिरवली. त्या दृष्टीपातानें प्रत्येक मजूराच्या हृदयाचा थरकाप झाला. तशाही स्थितींत किसन उपहासपूर्वक हंसला आणि नंतर खणखणीत आवाजांत तो म्हणाला, “ ह्या यंत्राच्या खालीं सुरुंग लावा आणि भोंवतालच्या कांपाऊन्डावर घासलेट ओतून आग लावा ! हें जें हल्लीं समोर दिसत आहे ह्याचा मागमूस संध्याकाळीं येथें रहायला नको. चला आटोपा—प्रथम आग लावा !”

तो विचित्र हुकूम ऐकून सगळेंच मजूर गडबडले. आपल्या धन्याला आज वेड तर नाहीं लागलें असेंच त्यांना वाटलें. ह्या पेटणाऱ्या अग्निकुंडांत तर आपणाला जिवंत जाळले जाणार नाहीं ना ? अशा भयंकर शंका त्यांच्या मनांत येऊं लागल्या. पण हुकमाचे ताबेदार, त्यांना हुकमाची अंमलबजावणी करणें भाग होतें. सर्व लाकडी बांधकामावर तेल ओतण्यांत आलें आणि त्याला आग लावण्यांत आली. त्या महाभूताचें रुद्र स्वरूप लवकरच प्रगट होऊं लागले. एकेक भाग अग्नीच्या आधीन होऊं लागला. प्रथम धूर आणि नंतर तेजस्वी ज्वाळा बाहेर पडूं लागल्या. किसन शांतपणें त्या वरवर जाणाऱ्या धुराकडे पहात होता. आपल्या अंतःकरणातला कोणचा तरी वाईट भाग त्या धुराबरोबरच निघून जात आहे असें त्याला वाटूं लागलें. भडकलेल्या ज्वाळांचा देखावा पाहून तर त्याच्या दृष्टींत काहीं तरी अलौकिक असें तेज चमकूं लागलें. प्रत्येक ज्वालेची जिव्हा म्हणजे पापी जगाला शुद्ध करणाऱ्या महात्म्याचा हातच होय असें त्याला वाटूं लागलें. आपल्या अंतःकरणातली पापें जळून खाक होणार ह्याबद्दल त्याला समाधान झालें.

किसनच्या मनाची ही स्थिति तेथें जमलेल्यापैकीं एकालाही कळणें शक्य नव्हतें. मिलिंद आणि मल्हारी तर आश्चर्यानें अगदीं गुंग होऊन गेले. इतका पैसा खर्च करून बांधलेलें आणि उभारलेलें हें यंत्र साहित्य अशा रीतीनें पेटवण्यात किसनला खास वेडाचीच लहर आली असली पाहिजे. किसनच्या नव्या तेजाची भूमिका त्यांना कळणें शक्य नव्हतें ! हा संहार कशासाठीं हें अग्नीचे कराल स्वरूप कशासाठीं हें त्यांना कसें समजावें ?

यंत्राच्या भोंवतालच्या भागाची अशा रीतीनें पूर्णपणें होळी झाली तेव्हा किसन उठला आणि त्यानें मिलिंदाला आपल्या बरोबरच चलण्यास सांगितलें. ते दोघेही किसनच्या वाड्यात येऊन पोहोंचले. किसनची घडपड शांत होत चालली होती. मिलिंद भीत भीत म्हणाला, " हुजूर आपण आज काय केलेंत हें ! इतकें नुकसान करून काय फायदा झाला ? " किसन थोडा वेळ थांबला आणि नंतर अगदीं शांतपणें तो म्हणाला, " मिलिंद मी आज काय केलें हें तुम्हांला कळणार नाहीं, आपणच उत्पन्न केलेल्या सृष्टीचा संहार कां करावा हें त्या सृष्टीच्या

ईश्वराखेरीज इतरांच्या ध्यानीं येणारें रहस्य नव्हे. मी उत्पन्न केलेल्या ह्या सृष्टीची मी अशा रीतीनें मुंडी कां मुरगळीत आहे ह्याची कल्पना माझ्याखेरीज इतरांना होणें शक्य नाहीं. मी आज काय केलें ? मी जें ह्यापूर्वी केलें—जें पाप मी आचरिलें त्याची यथासांग पूर्तता आज मी केली. मी केलेलें हें कृत्य तुमच्या दृष्टीनें मूर्खपणाचें ठरेल—अव्यवहारिकतेचें ठरेल. पण त्या कृत्याला ज्यामुळें चालना मिळाली ती गोष्ट इतकी भयंकर आहे कीं सांगतां सोय नाहीं. एखाद्या महारोग्यानें पांघरलेलें पांघरूण मग तें कितीही उंची असलें तरी तो रोग आपल्याला चिटकूं नये अशी जर आपली इच्छा असेल तर तें पांघरुण जाळलेंच पाहिजे, नष्ट केलें पाहिजे. ह्या यंत्राच्या आसपास आणि खालीं अशाच प्रकारचा पापाचा महारोग राजरोस वावरत होता. त्या महारोगानें आजपर्यंत सगळें कांचनद्वीप दूषित झालें होतें. त्या महारोगाचा उदय माझ्या अंतःकरणांत असला तरी त्याचा दृश्य अवतार त्या यंत्रसामुग्रींत होता. मानवी हत्येनें त्या यंत्राची अघोर लालसा भागवली गेली. माझ्या सृष्टींत आजपर्यंत प्रत्यक्षपणें न घडलेला अत्याचार घडला ! मी काय केलें ? त्या महारोगाचें एक ठिकाण आज मी जाळून टाकलें. मी माझ्याच अंतःकरणाचा उद्धार व्हावा म्हणून हें पहिलें होमकुंड पेटवलें. एकामागून एक अशा माझ्या सर्व पापाची आहुति मी त्यांत देणार. माझा उद्धार हाच माझा लाभ. मग त्या लाभाकरतां स्वतःची आहुती देण्याचा जरी प्रसंग आला तरी पत्करीन पण मी स्वतःचा उद्धार करून घेणार. माझ्या अधःपाताला कारण जर मी होऊं शकलों—तर स्वतःच्या उद्धाराकरतां मी इतरांना काय म्हणून शीण द्यावा ? मिलिंद, मी तुम्हांला प्रत्यक्ष माझ्या मुलासारखा मानतों." ह्या वाक्यानें मिलिंद दचकला. त्याला आपल्या स्वप्नाची आठवण झाली. त्यानें एकवार किसनकडे पाहिलें. किसनच्या मुखावर शांतपणा दिसत होता. अंतःकरणांतली सगळी कालवाकालव त्यानें आपल्या नेहमींच्या संयमशक्तीनें झांकून ठेवली. किसन पुढें बोलूं लागला, "मी अमर नसलों तरी तुम्ही मला अमर करूं शकाल. आतां माझा अवतार संपला आहे." इतकें म्हणून किसन थांबला. त्या सर्व प्रसंगाचा

क्षीण त्याला आतां जाणवूं लागला. तो दमून एका आरामखुर्चीवर पडला. मिलिंद उठून आंत गेला आणि त्यानें एक पेला भरून दूध आणलें. किसन डोळे मिटून आपल्याच अंतःसृष्टींत गुंग होता. मिलिंदानें त्याला हांक मारली. किसननें डोळे उघडले आणि पाहिलें तों मिलिंद हातीं दुधाचा पेला घेऊन उभा आहे. आपणावर अकारण प्रेम करणाऱ्या त्या तरुणांचें तें प्रेमळ आचरण पाहून किसनला गहिंवर आला. त्याच्या हृदयाला त्या सहानुभूतीनें–विशेषतः त्याच्या पापपूर्ण आयुष्यानंतर मिळालेल्या सहानुभूतीनें अत्यंत विस्मय वाटला. त्याचें अंतःकरण पूर्णपणें हललें. त्यानें मिलिंदाच्या हातचा पेला घेतला आणि सहज दृष्टीनें त्याच्याकडे पहात दूध पिण्यास सुरवात केली.

मिलिंद घरीं जाण्यास निघाला तेव्हां त्याला सुद्धां वाईट वाटूं लागलें. किसन कितीही दुष्ट असला–कितीही पापी असला तरी त्याच्या अंतःकरणाला इतक्या तीव्र वेदना व्हाव्यात–त्यानें स्वतःच्या पापाचें इतकें कठोर प्रायश्चित्त घ्यावें, नव्हे त्याला घेण्याचा प्रसंग यावा, ह्याबद्दल मिलिंदाला खरोखर दुःख झालें. किसन दुष्ट असला तरी श्रेष्ठच आहे. उच्च दर्जाची मानसिक शक्ति असल्याखेरीज असा संहार–असा त्याग होणें शक्य नाहीं. जगानें ज्याला पापी ठरवलें–सैतान म्हटलें–त्याच्याच खडकाळ अंतःकरणांत आपणाविषयींच्या सहानुभूतीची–वात्सल्याची गुप्त गंगा वहात असावी, हें केवढें आश्चर्य ! जिवापाड मेहनत करून सारा जन्म ज्याची संपादणी केली, तें हिणकस आहे असें मनाला पटतांच त्या सर्वांचा त्याग करायचा, त्या सर्वांची होळी करायची, ह्याला केवढा आत्मनिग्रह, केवढे जितेंद्रियत्व लागत असेल ! बिचाऱ्या मिलिंदाचे विचार स्वतःकडे वळले. किसनच्या–नुकत्याच पाहिलेल्या किसनच्या उदात्तपणाचें मूर्तिमंत चित्र समोर असतां आपली प्रतिमा त्याला अत्यंत हीन वाटूं लागली. त्याचा स्वतःविषयींचा तिटकारा वाढत गेला. ज्याला आपण देशभक्तीच्या आणि उच्च तत्वाच्या गप्पा मारल्या तोच तें तत्व आचरून किती तरी पुढें गेला. त्यागाच्या बाबतींत तोच आपला गुरू ठरला. आपल्या भोंवतालचीं प्रत्येक वस्तु-प्रत्येक व्यक्ति आपणांला हिणवीत आहे, प्रेमासाठीं घरदार सोडणारा मल्हारी, वात्सल्यासाठीं इस्माईलसारख्या राक्षसाच्या दाढा उपटणारी रंगू,

आत्मोद्धाराच्या बलवत्तर इच्छेनें तळमळणारा किसन, प्रत्येकजण आपल्या-पेक्षां किती श्रेष्ठ! आपल्यापेक्षां किती तरी पटीनें कर्तृत्ववान्!''

' सुशिक्षित तरुण ' म्हणून घमेंड मिरवणारे आपण, सर्व ह्या लोक-विलक्षण व्यक्तींच्या पुढें किती तेजहीन. किती स्वार्थी! आपल्याला वाटतें, अत्यंत हीनपणें वाटतें कीं आपला प्रेमभंग म्हणजे जगाच्या लांबरुंद पात्रां-तून भरून सांडणार दुःखप्रवाह असावा! अरेरे! जगांत दुसऱ्याही व्यक्ति दुःखांत असतील, अनाथ असतील, छळल्या जात असतील, ह्याची आपणांला बिलकुल दखल राहिली रहात नाहीं.

अशा प्रकारच्या स्वतःविषयींच्या नालायकीच्या विचारांत मिलिंद घरीं पोंचला. सूर्य आकाशाच्या मध्यभागावरून पश्चिमेकडे ढळला होता. पशु-पक्षी झाडाझुडपांच्या सांवलीच्या आश्रयानें रवंथ करीत बसले होते. दुर्दैवी मिलिंद पश्चात्तापाच्या–स्वनिंदेच्या प्रखर तापांत एकटाच होरपळत होता!

---

## प्रकरण १८ वें

## ' पाठीराखा '

रंगू! लक्ष्मीच्या सुखदुःखाशीं पूर्णपणें समरस झालेली आणि मायेच्या अधिकारानें माता ठरलेली रंगू आपल्या अभागी संसाराचा पसारा मांडीत होती. दुपारची वेळ झाली होती. सदोबाच्या आकस्मिक नाहींसे होण्यामुळें अस्वस्थ झालेल्या लक्ष्मीची समजूत करून ती नुकतीच घरीं आली होती. चुलींत पेटत घालून तिनें अंग धुतलें आणि तोंडानें लक्ष्मीनें शिकवलेलें स्तोत्र म्हणत ती स्वयंपाक करूं लागली. एकट्या जिवाला कितीसें अन्न लागणार! तरीपण कोंड्याचा मांडा करून दुःखांत सूख कसें मानावें ही कला ती उत्कृष्टपणें जाणत होती. धिरडें करावें म्हणून ती उठली आणि पिठाचा डबा खालीं काढला. डाव्या हातानें पीठ ओतीत असतां तिला हांक ऐकूं आली 'रंगू'! रंगूनें चुलीपासून पाहिलें तों इस्माईल दारांत उभा

होता. त्याला पहातांच तिच्या चित्तांत परस्पर विरोधी विचारविकारांचा कल्लोळ उडला. तरी पण तो सर्व दाबून तिनें गंभीरपणें त्याला 'या' म्हणून म्हटलें. त्या दोघांत लक्ष्मी कांचनद्वीपांत येण्यापूर्वी असे अनेक प्रसंग येऊन गेले होते. जेवणाच्या ऐनवेळीं येऊन इस्माईलनें आपल्या वल्लभेच्या 'गोड हातांना' अनेकवार ओठांतून पोटांत घातले होते. त्या वेळचे प्रेमळ शब्द, तें हंसणें, रंगूची ती घायाळ करून गुदगुल्या करणारी नजर तिच्याच चंचीं-तील पानाचा विडा अर्धा वाटून घेऊन खाण्याची ती अमूल्य संधी, एक कीं दोन, प्रणयाच्या आडवाटेवरच्या अनेक गुलजार प्रसंगांची त्या दोघांना एकाच वेळीं आठवण झाली. दोघांनाही त्या स्मृतीनें विव्हल केलें. दोघां-नाही अति तीव्रतेनें वाटूं लागलें कीं मधला कटु काल थोडा मागें सर-केल तर ?

इस्माईल बसला. त्याच्या सर्व शरीरावर दारुण निराशेचा अंमल बस-लेला दिसत होता. त्याची प्रत्येक हालचाल अत्यंत त्रासानें केल्याप्रमाणें वाटत होती. रंगूनें आपला स्वयंपाक चालवलाच होता. तिनें त्याच्याकडे पाहून रुक्ष स्वरांत विचारलें " जेवण व्हायचं आहे ना !"

तोच तो हजार वेळां आपणाला विचारला गेलेला प्रेमळ प्रश्न ! पण हाय ! आज त्या प्रश्नाचें अधिष्ठान—आपणांवर असलेलें रंगूचें प्रेम कुठें आहे ? इस्माईलच्या अंतःकरणाला जो चरका बसला तो त्या प्रश्नामुळें नसून त्यांतील प्रेमशून्यतेनें ! इस्माईल कांहींसा सदोष स्वरांत म्हणाला, "रंगू, मी ह्या जेवणाकरतां भुकेला नाहीं. तुला नुसती पाहून माझी भूकतहान ५ " नाहींशी होते. मी तुझा असा काय बरं अपराध केला आहे, तर तूं अशी तेढ धरून माझ्याशीं वागतेस ? त्या छोकरीच्या नादानें तूं इतकी पागल झालीस अशी काय तिची लायकी आणि अब्रू !"

चुलींतल्या निखाऱ्यांची तेजस्विता रंगूच्या नेत्रांत चढली. तिनें इस्मा-ईलकडे तीव्रतेनें पाहिलें आणि ती तिच्या स्वरांत म्हणाली, " खानसाहेब, माझा असा अंत पाहूं नका. आजपर्यंत मी तुमच्या मनाप्रमाणें वागलें, हवी तशी तुमच्या लहरीखातर नाचलें, आतां तरी मला माझ्या मुलीसाठीं आपण सोडा. "

" पण ती तुझ्या नाहीं पोटची, नाहीं तिला कोणी तुझ्या ओटींत

घातली अशा त्या पोरीसाठीं तूं मला कां सोडतेस ? रंगू, तुझ्यामाझ्यांत अंतर आणणारी ही छोकरी कोणत्या अपशकुनी वेळीं इथें आली. रंगू मी तुझा कोणीच नव्हे का ?''

इस्माईलचा तो प्रश्न–विशेषतः त्याचा कातर स्वर ह्यांचा रंगूच्या मनावर काय परिणाम झाला हें सांगणें कठीण ! इतर साऱ्या दृष्टीनें ती लक्ष्मीची आई शोभत असली तरी आत्मसंयमन–आत्मसमर्पण ह्या गुणांत लक्ष्मी तिची आई शोभत होती. निरपेक्ष प्रेमाचें उच्च तत्त्व लक्ष्मीच्याच सहवासानें तिला कळूं लागलें होतें. इस्माईलच्या त्या प्रश्नानें तिचा कठोरपणा विरघळला आणि ती उदासपणें म्हणाली, “ असं कसं विचारतां खानसाहेब? तुम्ही माझे कोणी आहांत म्हणूनच ना त्या दिवशीं लक्ष्मीचा हात सोडून तुम्ही निघून गेलांत. तुम्हांला जर असं वाटत असेल कीं, मी तुमची कोणी नाहीं, तर अजून मी तुम्हांला सांगतें, त्या दिवशीं जें पिस्तूल तुम्ही मिलिंदावर रोखलें, त्याच पिस्तुलानें माझा शेवट करा. पण आतां जिवंतपणीं माझ्याजवळ असलें कांहीं मागूं नका. मी आतां वृद्धच होत चाललें आहें. माझ्या मुलीसमोर–लक्ष्मीच्यासमोर तरी आतां माझी विटंबना करूं नका. आपण दोघे कोणी तरी होतों हें विसरा. आणि–आणि–'' रंगूचा कंठ रुद्ध झाला. असंस्कृत हृदयांत पेटलेलें दिव्य प्रेम ते शब्द बोलून गेले. बिचारी रंगू अत्यंत बिकट परिस्थितींत सांपडली. इस्माईलचा प्रेमळपणा एकीकडे तिच्या अंतःकरणाला ओढीत होता तर दुसरीकडे लक्ष्मीच्या त्यागपूर्ण जीवनाचा रेशमी बंध तिला बांधून ठेवीत होता. लक्ष्मीचें बंधन इतकें नाजूक होते कीं थोड्याशा चलनवलनानें त्याचे तुकडे तुकडे झाले असते.

आपल्या वल्लभेचे ते शब्द ऐकून इस्माईललासुद्धां वाईट वाटलें. अत्यंत कठोरपणानें सगळ्या जगाशीं वागतांना त्याचें अंतःकरण फुटलें नाहीं ह्याला कारण रंगूच होती ! तिच्या एका गोड शब्दाबरोबर त्याचा शीण दूर होत असे. तिच्या काळ्याभोर केसांकडे पाहून त्याचा जीव सुखाच्या जाळ्यांत झुलत असे आणि तिच्या हातचा एकच घांस खाऊन त्याला आकंठ अमृतपान झाल्यासारखें वाटे ! त्या रंगूला सोडायचे. ती

म्हणते त्याप्रमाणें तिला नाहींसें करायचें. आणि—आणि मग आपण कशा-करतां जगायचें ! त्याच्यापुढें दोनच मार्ग शिल्लक होते.

पहिला मार्ग म्हणजे रंगूचा 'नाद' सोडणें आणि दुसरा म्हणजे लक्ष्मीसह तिचा स्वीकार करणें. पण ह्या दोन्ही मार्गांचा अवलंब करणें इस्माईलला शक्य नव्हतें. रंगू तिच्या पूर्वीच्या आपल्यासंबंधींच्या अनुरागासह मिळेल तरच त्याला हवी होती. कदाचित् विनवणीच्या मार्गानें न वळ-णारी रंगू दुसऱ्या उपायानें वळेल ह्या आशेनें तो म्हणाला, "रंगू, कां माझ्या काळजावर असे घाव घालतेस ! माझ्या हातीं सत्ता होती, पसा होता तेव्हां, रंगू तूं माझ्यावर आषक झालीस आणि आतां—"

"आतां काय ?" रंगूनें विचारलें.

"आतां माझी नोकरी गेली. माझा अधिकार संपला म्हणून मला सोडून देतेस. अरेरे, मला तुझी खरी पारखच झाली नाहीं—काफर ती काफरच !"

आपल्या ह्या उपरोधिक बोलण्यांन तरी रंगू आपल्याकडे येईल असें त्याला वाटलें. पण तें ऐकून रंगूच्या मनावर अगदीं उलट परिणाम झाला. इस्माईलचा अधिकार गेला ही गोष्ट तिला खरी वाटेना. त्यामुळें आपल्या-वर केलेल्या बेमानपणाच्या आरोपानें ती जरी संतापली तरी बाह्यात्कारीं सर्व शांतपणा धरून ती त्याला म्हणाली,

"बरोबर आहे. खानसाहेब, तुम्ही म्हणतां तेंच बरोबर आहे. बोलूनचालून कुंटीण मी. मला कुठें देवानें असें घडलें आहे कीं, एखा-द्याच्या बऱ्यावाईट प्रसंगीं इमानीपणानें मी वागावें. माझा तरी त्यांत काय अपराध ? तुम्ही प्रथम कांचनद्वीपांत आलांत ते दिल्लीचे सुलतान म्हणूनच मी तुम्हांला माळ घातली ! पण आतां काय ? तुम्हीच म्हणतां कीं, आपला अधिकार संपला. बरं झालं. आतां मी तुमच्या बरोबर कां रहावें ? ह्यापुढें मी सारखी तरुण अन् लहानच रहाणार. तेव्हां मी तुम्हांला सोडावें, हें तर ठीकच ! पण तुम्ही आतां तरी शुद्धीवर या, आणि माझा नाद सोडा."

आपल्या शब्दांचा अगदीं अकल्पित असा परिणाम पाहून इस्माईल गोंधळून गेला. रंगूच्या स्वाभिमानाला त्यानें निष्कारण डंवचलें होतें. तिच्या खरेपणाची त्यानें व्यर्थ शंका घेऊन तिला छेडलें. आपण कुठून

तिला उपरोधिक बोललों असें त्याला झालें. उलटपक्षीं रंगू जें कांहीं बोलली त्यामुळें त्याचाही अभिमान जागृत झाला. आजपर्यंत प्रेम आणि स्वाभिमान ह्यांचा विरोध त्याला कधींच करावा लागला नाहीं. आपला पराजय कबूल करणें त्याला पटेना. त्याचें मन हळूं हळूं हट्टाला पेटूं लागलें. कांहींशा तीव्र स्वरानेंच तो म्हणाला, " ठीक आहे. रंगू तुझ्या माझ्या लोभांत अंतर आणणारें कारणच आतां समूळ नाहींसें करतों आणि मगच पहातों कीं तुझा माझा नाद सुटेल कीं नाहीं तें. तोंपर्यंत तुलाच काय पण कुणालाही मी तोंड दाखवणार नाहीं." इतकें म्हणून इस्माईल तेथून निघून गेला.

तो गेला आणि मग मात्र रंगूनें आतांपर्यंत अत्यंत प्रयासानें दाबून धरलेला गहिंवर बाहेर पडला. दुष्कृत्यांनीं हात रंगत असतांच अंतःकरण शुद्ध अशा उच्च प्रेमासाठीं तळमळणार नाहींच असा सिद्धांत कुणी मांडावा ? मानवी स्वभावाच्या अजबखान्यांत कोणकोणत्या वस्तू एकत्र सांपडतील ह्याचा नेम नाहीं. वाघासारखा शूर वीर प्रेमाखातर वाटेल ती मानहानी सहन करील. कर्णासारखा दानशूर प्रेमासाठीं कवडीचा लोभ धरील. अभागी रंगू ! तिच्या समोरचा स्वयंपाक थंड होऊन गेला होता. चुलींतल्या तेजस्वी कणांचा कोळसा बनला होता. रंगूनें कसेबसे दोन घांस खाल्ले आणि आपली चौघडी आंथरून नुकत्याच विटून गेलेल्या प्रेमाची आठवण करीत ती अश्रू गाळूं लागली.

× × × ×

मंदमंद पावलांनीं येणाऱ्या निशेच्या अंधारांत कांचनद्वीप बुडत होतें आणि घनतर होणाऱ्या संशयाच्या अंधारांत लक्ष्मी बुडत होती. जवळ-जवळ दोन दिवस झाले सदोबाचा पत्ता नव्हता. कामावर अथवा अन्य ठिकाणीं शोध केला तरी कांहीं उपयोग झाला नाहीं. आधल्या दिवशीं सकाळीं सदोबा ज्या आनंदाच्या सुरकांड्या मारीत होते त्याची आठवण होऊन लक्ष्मीला मोठें चमत्कारीक वाटूं लागलें. आपल्याशीं सुधा शब्द न बोलणारा आपला नवरा त्याच दिवशीं इतका मोकळेपणानें बोलला आणि नाहींसा झाला ह्याचा अर्थ काय ? त्यागमय जीवनांत समरस झालेली लक्ष्मी ह्या नव्या आघातानें गांगरून गेली. कर्तव्य म्हणून तिला आपल्या

पतीचा शोध करणें आवश्यक होतें, आणि कर्तव्य म्हणूनच तिनें काल संध्याकाळपासून अन्न घेतलें नव्हतें. बाह्य वस्तूंचा परिणाम स्वतःवर होऊं द्यायचा नाहीं; आपलें आचरण चोख असावें ह्या एकाच गोष्टीनें ती खडतर पातिव्रत्य आचरीत होती. घरांत तिनें दिवाही लावला नव्हता. अंधारांतच ती आपल्या अंधाराहून अस्पष्ट असणाऱ्या भवितव्यतेचा विचार करीत बसली होती. नक्षत्रांचा उदय आकाशांत झाला होता. समुद्रकांठच्या वाळवंटांत इतस्ततः खेळणाऱ्या मुलाप्रमाणें अथवा घनदाट वृक्षराजींत किलबिल करणाऱ्या पांखराप्रमाणें आकाशाच्या निळया वाळूंत नक्षत्रें चमकत होतीं. लक्ष्मीला कल्पना नव्हती अशा वेळीं एक व्यक्ति तेथें आली आणि घोगऱ्या आवाजांत म्हणाली, " उठा लक्ष्मीबाई—चला तुमचा नवरा अतीशय आजारी असून तुम्हांला बोलावतो आहे." तो निरोप ऐकून लक्ष्मी चकित झाली. निरोप सांगणारी व्यक्ति कोण आहे ह्याचा सुद्धा विचार करण्यास ती थांबली नाहीं. ती झटकन् उठली आणि म्हणाली, "चला—लवकर चला—आपण माझे भाऊ आहांत. चला." त्या व्यक्तीनें आपला अधरोष्ठ चावला आणि लक्ष्मीला आपल्या मागें येण्याविषयीं खूण केली. त्या व्यक्तीनें नखशिखांत बुरखा पांघरला होता. ती व्यक्ति पुढें आणि लक्ष्मी मागें असे दोघे रस्ता चालूं लागले. वाटेनें कुणीच एकमेकांशीं बोलणें शक्य नव्हतें. कारण लक्ष्मी अनोळखी इसमाशीं काय बोलणार आणि त्या इसमाची तर न बोलण्याची इच्छा दिसत होती. वस्तीचा रस्ता सुटून पायवाटेनें ती व्यक्ति चालूं लागली. लक्ष्मीला संशय आला तरी ती कांहींच बोलली नाहीं. मात्र तिला असें वाटलें कीं, रंगूच्या घरावरून तिला घेऊन आपण निघालों असतों तर बरें झालें असतें. वस्तीपासून अगदीं एकीकडे किसनचा बंगला होता. त्या बंगल्याच्या बाजूनें ती व्यक्ति चालली तेव्हां तिचे डोळे वटारले गेले. सूडबुद्धीनें त्या व्यक्तीनें एकवार त्या बंगल्याकडे पाहिलें आणि नंतर ती व्यक्ति चालूं लागली.

पायवाट संपून पायाखालचा रस्ता उंच सखल होऊं लागला. झाडी अधिकाधिक दाट होऊं लागली. अंधारामुळें तर कांहींच दिसेना. अशा स्थितींत लक्ष्मीला अगदीं गोंधळून गेल्यासारखें झालें. पोटांत अन्न नस-

त्यामुळें आधींच तिच्या डोळ्यापुढें चक्कर येत होती. आणि शंकित मनोवृत्तीचा दाब सहन करणें तर तिला शक्यच नव्हतें. ती कशी तरी पावलें टाकीत होती. एकवार सभोंवार नजर टाकून ती व्यक्ति थांबली. लक्ष्मी थांबली. तोंडावरचा बुरखा काढून टाकून ती व्यक्ति विकट हास्य करून म्हणाली, " लक्ष्मी " त्या शब्दाबरोबर लक्ष्मीनें ओळखलें कीं आपण इस्माईलच्या हातीं सांपडलों. पण त्या निर्जन ठिकाणीं ती काय करणार ? तिनें इस्माईलला विचारलें, " ते आजारी आहेत. त्यांना कुठें ठेवलें तें दाखवा ! " इस्माइलनें पुन्हां एकवार भेसूर हास्य केलें आणि तो म्हणाला, "तेंच मी आतां दाखवणार आहें. तुझा नवरा ह्या जगाच्या आणि तुझ्या त्रासांतून कायमचा सुटला आहें. आणि तुझीही लवकरच मी ह्या जगांतून सुटका करणार आहें. बोल–लक्ष्मी, बोल–माझी रंगू, माझा गुलाब माझ्यापासून हिसकावून घेण्याचा तुला काय अधिकार ? माझ्या प्रेमाला जादू करून त्याचा नायनाट करून तुला काय मिळालें बोल ! वरून गोरीगोमटी दिसणारी तूं, आंतून एवढी दुष्ट कशी झालीस ? माझी रंगू मला परत दे ! म्हणजे मी अजून तुला सोडतों "

तो काय बोलत आहे ह्याचा लक्ष्मीला उमज पडेना. ती आश्चर्यचकित होऊन म्हणाली, " माझा काय बरं ह्यांत दोष ? "

" तुझा काय दोष ! काफीरकी अवलाद–सारी दुनिया खाऊन फस्त करणारे चोर तुम्ही–तुम्ही माझी परी चोरली. कांगावखोर–आतां तुझा तर नाश करतोंच पण त्याच्या आधीं ज्याचा एवढा टेंभा मिरवतेस त्या तुझ्या" त्याच्यापुढें शब्दही न बोलता इस्माईलनें लक्ष्मीचा लगेच हात धरला. त्याचा स्पर्श होतांच लक्ष्मीचें देहभान हरपलें. सर्व श्रमांच्या भारानें ती बेशुद्ध झाली आणि जमीनीवर पडली. इस्माईलला वाटलें ही ढोंग करीत असावी. त्यानें खिशांतून काड्याची पेटी काढून काडी ओढली आणि त्या अत्यंत मंद प्रकाशांत लक्ष्मीच्या मुखाकडे त्यानें पाहिलें. बेसावध स्थितींत असलेल्या त्या मुखमंडलावर दिव्य तेज विलसत होतें. पापी इस्माईलच्या सैतानी अंतःकरणाला आत्मनाशाची स्फूर्ति झाली. त्याचे पापी बाहू तिला उचलून आपल्या मगरमिठींत अडकविण्यासाठीं सरसावले. क्षणभरांत त्या लुसलुशीत सौंदर्याचा आपण उपभोग घेऊं ह्या कल्पनेंत बेहोष होऊन

इस्माईल किंचित् पुढें सरकला. त्याचें हात–पापाचे पाश लक्ष्मीच्या जवळ जवळ येऊं लागले. आत्मघाताकरतां पतंग दिव्यावर झेप घेणार इतक्यांत–

सर्वसाक्षी परमेश्वराचा अवतार प्रकाशरूपानें अवतीर्ण झाला. चंद्रोदय झाला आणि झाडाच्या एका पानावरून एक चंद्रकिरण लक्ष्मीच्या मुखावर पडला. लक्ष्मीची लाज रक्षण करण्याकरतां परमेश्वराचा प्रतिनिधीच तेथें आला. पण पापानें पोखरलेल्या इस्माईलला तोच प्रकाश धोक्याच्या सूचनेप्रमाणें वाटला. तो दचकला व त्यानें मागें वळून पाहिलें. एक कृष्णमूर्ति त्याच्या अगदीं जवळ त्याच्याकडे रोखून पहात उभी होती. इस्माईलला वाटलें प्रत्यक्ष सैतान थडग्यांतून आला. तो उठून उभा राहिला. आपल्या ‘ रंगांत ’ बेरंग करणारा कोण म्हणून त्यानें त्या कृष्णमूर्तीकडे पाहिलें. शांत आणि गंभीर स्वरात ती कृष्णमूर्ति म्हणाली, “ चांडाळ, तुला वाटलें असेल बिचाऱ्या लक्ष्मीचा पाठीराखा कुणी नाहीं. लक्ष्मी अनाथ असली, दुर्बळ असली, तरी तिचें रक्षण करायला तिचा देव समर्थ आहे. तिचा देश समर्थ आहे. माझ्या पापांतला जोडीदार तूं–तुला आधीं नाहींसें केलें पाहिजे. मीच उत्पन्न केलेला भस्मासूर लक्ष्मीच्या मोहिनीनें मारला गेला. चल आटप कर आपल्या पापांचें स्मरण आणि हो मरणाला तयार.” त्या भाषणानें इस्माईलला पूर्णपणें कळून आलें कीं आपल्याशीं बोलणारी व्यक्ति किसन होय. त्याची भीति दूर झाली. सूडवृत्ति बळावली आणि त्यानें उत्तरादाखल आपल्या कमरेचा सुरा काढला. किसनचें त्याच्या हालचालींवर पूर्ण लक्ष होतें. इस्माईल त्यावर वार करणार इतक्यांत किसन दोन पावले मागें सरला आणि त्यानें इस्माईलवर पिस्तूल झाडलें. इस्माईल धाडकन् जमीनीवर पडला.

चंद्राच्या अस्पष्ट प्रकाशांत किसन लक्ष्मीच्या जवळ गेला. पाप आणि पुण्य चंद्राच्या धवल किरणांत न्हात होतें. किसन अत्यंत आदरानें लक्ष्मीच्या शांत मूर्तीकडे पहात होता. मूर्तिपूजेचा–देवाचा–धर्माचा माणुसकीचा तिरस्कार करणारा किसन प्रथम मूर्तिच्या–मूर्तिपूजेच्या भावनेनें प्रेरित झाला. देहमूर्ति अथवा देवमूर्ति ह्यांच्या दर्शनानें त्याचें अंतःकरण प्रथमच पुलकित झालें. आपला घोर अधःपातापासून उद्धार करणारी देवता. ही पावित्र्य मूर्ति–ही कर्तव्यमूर्ति–ही त्यागमूर्ति–किसन हिंदू झाला. त्याचें मन पुन्हां स्वधर्मात आलें. तें भावपूर्ण बनलें. सचेतन झालें. त्यानें भक्तिभावानें त्या

अचेतन देवतेला प्रणिपात केला. तिला स्पर्श करावा किंवा नाहीं ह्याचा क्षणकाल त्याला विचार पडला. एखाद्या दूषित मनुष्याप्रमाणें त्याला वाटलें, आपल्या स्पर्शानें तेजाचें हें देऊळ आपण कसें विटाळावें! पण आपल्या भाग्याची उजरी उजळणाऱ्या ह्या देवतेची सेवा करण्याचा आपल्या आयुष्यांतला एकच एक प्रसंग आपण कां गमवावा! त्यानें लक्ष्मीला उचललें. आनंदानें त्याच्या अंगावर रोमांच थरारले. वात्सल्य प्रेमानें तो गहिंवरला. त्याच्या अंत:करणाची अदृष्ट अज्ञात हूरहूर थांबली. 'अमर होण्याचा मार्ग त्याला सांपडला. किसननें लक्ष्मीला उचलून आपल्या बुरख्यांत गुंडाळली आणि झपझप पावलें टाकीत तो निघाला. लक्ष्मीच्या घराच्या मागच्या बाजूला येऊन तो कानोसा घेण्याकरतां थांबला. पुढच्या बाजूला कोणीतरी बोलत होतें. "रंगूबाई, तुम्ही घरीं जा. आम्ही प्रत्येक रस्ता शोधतों. तुम्ही काळजी करूं नका" तीं माणसें निघून गेलीं. किसननें भिंतीवरून लक्ष्मीला हळूच तिच्या घरांत सोडलें. त्यानें पुन्हां एकवार तिच्याकडे पाहिलें. एखाद्या अधाशाप्रमाणें त्यानें तें दिव्य रूप आपल्या अधीर नेत्रांत—अंत:करणांत सांठविलें. एक दीर्घ उसासा त्यानें सोडला आणि तो तेथून निघाला. त्याचीं पाउलें जडपणें पडत होतीं. त्याचें अंतकरण एखाद्या लहान अर्भकाप्रमाणें अगदीं मोकळेपणानें थडपडत होतें.

\+ + + +

सारी रात्र शोध करून दमलेली रंगू निराश होऊन परतली. आपली मुलगी आतां आपल्याला भेटत नाहीं असें पूर्णपणें वाटून ती लक्ष्मीच्या घरीं आली. लक्ष्मीवांचून असलेल्या त्या घरांत ती जड अंत:करणानें शिरली. लक्ष्मी हळूं हळूं सावध होत होती. अर्धवट स्थितींत तिनें हांक मारली, 'रंगूबाई.' रंगूचा आपल्या कानावर विश्वास बसेना! ती इकडे तिकडे पाहून परतणार इतक्यांत तिच्या कानीं शब्द आले, "आई—धांव ग!" रंगू तडक आंत शिरली. एका काळ्या बुरख्यांत लक्ष्मी गुंडाळलेली होती. रंगू तिच्याजवळ गेली आणि अगदीं अधीर होऊन तिनें तिला आपल्या पोटाशीं धरलें. त्या प्रेमळ स्पर्शानें लक्ष्मी पूर्णपणें शुद्धीवर आली. रंगूच्या अश्रूंनीं भरलेल्या डोळ्याकडे पहात तिनें विचारलें, "रंगूबाई—सांगा, मला कुणी सोडवलं?"

रंगू गद्गद स्वरांत म्हणाली, " तुझ्या पांडुरंगानें बरं–तोच तुझा पाठीराखा. "

त्या मायलेकी परस्परांच्या बाहुपाशांत अलौकिक प्रेमाचा आस्वाद घेऊं लागल्या.

रिक्तहस्तानें परतलेले मल्हारी आणि मिलिंद दारांतच उभे राहून तें स्वर्गीय दृश्य पहात होतें. शेवटीं आपण स्खलनशील मानवच आहोंत ही तीव्र जाणीव त्यांच्या अंतःकरणाला टोचूं लागली.

---

# प्रकरण २० वें

## ' सार्थक '

' कांचनद्वीपांत ' अशा परिस्थितींत आपली किरणें उगवतील ह्याची प्रत्यक्ष सूर्याला कल्पना नसावी. कारण छोट्या छोटया मेघांच्या आडून तो कांचनद्वीपाकडे आश्चर्यचकित होऊन पहात होता. सागराच्या चिमुकल्या लाटासुद्धां दचकतच कांचनद्वीपांत प्रवेश करीत होत्या. जिकडे तिकडे उत्साह आणि चैतन्य यांचें साम्राज्य परसल्यासारखें दिसत होतें कोंडून ठेवलेल्या मनोवृत्ति वगैरे स्वैर सुटल्या होत्या आणि अत्यंत आनंदानें आपला स्वातंत्र्य दिन साजरा करीत होत्या. वैभवाची व उत्सवाची बाह्य चिन्हें जरी कुठेंही दिसत नव्हतीं तरी चिमुकल्या मुलांच्या गोजऱ्या हातांनीं पताकांची व तोरणांची उणीव भरून काढली होती. त्याच्या शुभ्र दंत-पंक्तीतून रत्नांची प्रभा फांकली होती आणि त्यांच्या नेत्रांतलें मुग्धत्व स्वातंत्र्याला स्वागतपर पद्यें म्हणत होतें. दारिद्र्यानें पिडलेले मजूर आपला चिंध्या–संसार मोठ्या उमेदीनें आवरीत होते. आणि त्यांच्या 'कारभारणी' कपाळचें कुंकू सरसावीत होत्या. प्रत्येकाच्या जिवाची नुसती गडबड उडून गेली होती. अनपेक्षित मिळालेल्या स्वातंत्र्यानें व त्याबरोबरच मिळालेल्या एकेक वर्षाच्या पगारानें सर्वांना आनंद झाला असल्यास नवल नाहीं. प्रत्येक जण आपलें बिऱ्हाड व बायकामुलें घेऊन बोटीचा रस्ता धरीत होतें. कोणी टोळया करून निघत होते तर कित्येक जण आपल्याच संसा-

रांत दंग होऊन बाकी कुणाची फिकीर न करतां चालले होते. त्या सर्व समुदायाचा तो कोलाहल अत्यंत आल्हादकारक होता. संगीताचें शास्त्रशुद्ध नियम लावून पाहिलें तर सर्वत्र बेसूर ऐकूं आला असता पण अंतःप्रवृत्तीनें उत्पन्न झालेला एकच गोड सूर सर्वत्र निनादत होता.

समुद्राच्या कांठाशीं लहान लहान होड्या सज्ज करून ठेवलेल्या होत्या. आणि किनाऱ्यापासून दिसण्यासारख्या अंतरावर ' गुलाम ' बोट धीरगंभीरपणें उभी होती. त्या बोटीकडे पाहून मजुरांच्या अंतःकरणांत परस्परविरोधी भावना उत्पन्न होत होत्या.

आपलें पारतंत्र्य हिरावून आपणांला आज स्वातंत्र्यभूमींत नेवून सोडणारी हीच आगबोट एकवेळ आपल्या स्वातंत्र्याचा अपहार करणारी होती, ह्या विचारानें एखाद्याच्या मनांत कांहीं चमत्कारिकच विचार येत. काल चक्राचा फेरा कसा फिरेल ह्याचा नेम नाहीं, हाच सिद्धांत सुशिक्षितांच्या आणि अशिक्षितांच्या सर्वांच्या मनाला पटे. बहुतेक मजूर किनाऱ्यावर जमा झाले होते. थोड्याच वेळांत सर्व लहान होड्या सुटणार होत्या.

सभोंवार तो तसा कोलाहल चालला असतांना एक मूर्ति मात्र एका लहानशा टेकडीवर अत्यंत निश्चलपणें बसली होती. दुरून पहाणाराला तर ती मूर्ति म्हणजे एखाद्या अत्यंत कुशल कारागिरानें बनवलेला पुतळाच असावा असें वाटलें असतें. अथांग सागराप्रमाणें ती मूर्ति धीर गंभीर दिसत होती. सगळ्या सृष्टींत आपल्याखेरीज कोणी असेल ह्याची त्या मूर्तीला कल्पनाच नसावी असें दिसत होतें. त्या मूर्तीचें सगळें लक्ष आपल्याच विचारांत असल्यासारखें दिसत होतें. इतकेंच नव्हे तर अलौकिक समाधानाची छटा मुखावर विलसत असल्यामुळें त्या मूर्तीच्या मुखमंडलाला शोभा आली होती. सूर्याचे किरण जणूं काय त्या मूर्तीच्या नेत्रांतील तेजाशीं स्पर्धा करण्याकरतां तेथें आलें असावेत असें दिसत होतें. दूर उभ्या असलेल्या आगबोटीची शिटी झाली त्याबरोबर ज्या ठिकाणीं किनाऱ्यावर लहान लहान होड्या होत्या त्या दिशेला त्या मूर्तीनें आपली नजर फिरवली. तेथें जें दृश्य दिसत होतें त्यामुळें अवर्णनीय आनंद–किंचित् अभिमान ह्यामुळें त्या मूर्तीला आपली निश्चलता कायम ठेवणें कठीण

गेले. आणि हर्षभरानें तिनें आपले दोन्ही हात जोरानें चोळले. असें कोणतें दृश्य होतें कीं ज्यामुळें अचेतनांत चेतना उत्पन्न व्हावी ?

इतका वेळ गरजणारा कोलाहल किंचित् शांत झाला. वियोगाचा क्षण जसजसा जवळ येऊं लागला तसतसें त्या मजुरांच्या हृदयांत स्वाभाविकच आनंदमिश्रित दुःखाचा उदय होऊं लागला. कांचनद्वीप ही जरी त्यांची जन्मभूमि नव्हती तरी त्यांच्या अत्यंत हलाखीच्या स्थितींत त्याच भूमीनें त्यांना आश्रय दिला. त्यांचें आणि त्यांच्या तान्हुल्यांचें रक्षण व पोषण केलें. त्यांचें सूर्याच्या प्रखर तापापासून त्याचप्रमाणें किसनच्या कडक जुलमाचें छायारूपानें व अश्रूरूपानें परिमार्जन त्याच भूमीवर झालें. त्यांच्या लाडक्या अपत्यांची ती जन्मभूमि होती. क्षेम नव्हे तरी नश्वर सजीव ठेवणारी ती त्यांची कर्मभूमि होती. अशा अनेक सुखद व दुःखद आठवणींनीं निगडीत झालेली ती भूमि सोडतांना त्या मजुरांना वाईट वाटावें ह्यांत काय नवल ? दुःख सोडतांना--पारतंत्र्य सोडतांना--सुद्धां केवळ त्यांच्या त्यांच्या सहवासामुळें अश्रू ढाळणारें मानवी अंतःकरण म्हणजे खरोखरच एक अजब कलाविलास होय !

कांचनद्वीप सोडतांना त्या मजुरांना वाईट वाटत होतें पण त्याहीपेक्षां हजार पटीनें अधिक वाईट त्यांना लक्ष्मीला सोडून जावें लागणार ह्यामुळें वाटत होतें. त्यांच्या अज्ञ अंतःकरणांना लक्ष्मी आल्यापासून असेंच वाटत होतें कीं आपल्या आजवरच्या रुद्ध कंठांतून निघालेल्या प्रार्थना सफळ झाल्या. लक्ष्मीच्या प्रथम दर्शनानेंच कित्येकांची भक्ति तिच्यावर बसली. प्रत्यक्ष नसली तरी मनोमय पूजेचें अधिष्टान लक्ष्मीला त्या मजुरांच्या हृदयांत खास मिळालें होतें. तिची सहनशीलता आणि प्रखर त्यागबुद्धि ह्या दोन्ही गोष्टींमुळें तिचें अलौकिकत्व सर्वमान्य झालें होतें. रंगूसारख्या कुंटीणीची मनोवृत्ति पार बदलून टाकून तिला पुण्यमार्गाला आणणारी लक्ष्मी देवता आहे असें प्रत्येकाच्या मनोमय साक्षीला पटलें होतें.

दळणाच्या श्रमांचा परिहार करून मनाला उल्हासीत करणारी तिची प्रेमळ भूपाळी प्रत्येकाच्या कर्णरंध्रांत अद्याप स्मृतिरूपानें वास करीत होती. तिची विठोबावरील दृढ श्रद्धा आपल्या आजच्या सुखाला कारणीभूत झाली असेंच सर्वांना वाटत होतें. अशा रीतीनें त्यांचें सर्वथैव मंगल

करणारी लक्ष्मी सोडून जातांना त्या मजुरांना वाईट वाटत असल्यास काय नवल ? प्रत्येकजण आपली मनाची मूक बोली लक्ष्मीला समजावून देण्याचा आटोकाट प्रयत्न करीत होता. व्यावहारीक भाषा बिचारी केव्हांच दिवाळ खोर बनली होती. लक्ष्मीच्या मनःश्रीपुढें तोऱ्यानें उभी राहील अशी अवघ्या जगांत कोणती संपत्ति होती ? मग आधींच दारिद्र्यानें गांजलेले मजूर आपली कृतज्ञता प्रगट करतांना पंगु ठरले तर त्यांत काय बरें दोष ! प्रत्येक मजूर आपल्या लहानग्याला लक्ष्मीच्या पायावर ठेवी आणि नंतर स्वतः तिला वंदन करी. त्याच्या डोळ्यांत तरंगणारे अश्रूच त्याच्या सर्व भावनांचें दरिद्री दिग्दर्शन करीत आणि आपलें कार्य आपल्या हातून झालें नाहीं असें वाटून ओघळून शरमून भूमीवर पडत. मजुरांच्या बायकांनीं तर ' कहर 'च केला. त्यांच्या नानातऱ्हेच्या बडबडण्यानें व त्यांतच केलेल्या कृतज्ञता प्रदर्शनानें तर त्यांनीं लक्ष्मीला भंडावून सोडलें. बिचारी लक्ष्मी तो ' छळ ' मुकाट्यानें सहन करीत होती. त्या सर्व मजुरांची ती अगतिक स्थिति पाहून तिला वाईट वाटत होतें. पण भगवंताच्या लीलाविलासानें मूढ होऊन तिचें भक्तिमय अंतःकरण पांडुरंगाच्या चरणीं विनम्र भावानें लीन होऊन राहिलें. त्या सर्व मजुरांची काय समजूत करावी आणि घडणाऱ्या अघटित घटनेची संगति कशी लावावी हें तिला कांहींच कळेना. एखाद्या सम्राटाला न मिळणारा भक्तिमय अंतःकरणांचा तो नजराणा ती नम्रपणें स्वीकारीत होती आणि तसाच भगवंताच्या चरणीं सादर समर्पण करीत होती. आपणांवर होणाऱ्या स्तुतीवर्षावाचे अथवा इतर कशाचे आपण मालक नसून त्या सर्वांचा विधाता व भोक्ता तो परमश्रेष्ठ पांडुरंगच आहे अशी लक्ष्मीची दृढ भावना होती.

लक्ष्मीच्या जवळच रंगू उभी होती. आपण मानलेल्या नव्हे प्रत्यक्ष आपल्या पोटच्या पोरीचें कौतुक पाहतां पहातां तिचा ऊर भरून येत होता. तिला वाईट वाटत होतें तें फक्त एकाच गोष्टीचें ! ती गोष्ट म्हणजे इस्माईल आपल्या ह्या सुखांत भागीदार व्हायला जिवंत राहला नाहीं ही होय. धर्मविधींचा संस्कार झालेला नसता तर मनाच्या एकनिष्ट भक्तीनें तिनें इस्माईलला आपला वल्लभ मानलें होतें. प्रेमांत प्रतारणा करणें तिच्या ध्यानीं मनीं येणें शक्य नव्हतें. लक्ष्मीशीं वागतांना इस्माईलनें दाखवि-

लेला दुष्टपणा त्याच्या मृत्यूनंतर तो विसरून गेली. आपल्या करतांच त्यानें इतका कठोरपणा धारण केला असावा असें तिला वाटूं लागलें. त्याच्या दोषांना गुणांचें स्वरूप देतांना तिचें आंधळें अंतःकरण उदार होई. पण कांहीं केलें तरी आजचा हा महोत्सव पहाण्याला तो परत येणें शक्य नाहीं ही हुरहुर कांहीं केल्या तिला सोडीना. तो गेल्यापासून तिनें आपली नेह-मींची उल्हासित वृत्ति टाकून दिली होती. लक्ष्मीच्या सान्निध्यांत मात्र तिचें अंतःकरण मोकळें होई. प्रत्येक मजूर लीन वृत्तीनें लक्ष्मीच्या पायीं लागत असलेला पाहून रगूला आपल्या मुलीबद्दल व त्याबरोबरच स्वतः-बद्दल अभिमान वाटूं लागला. सर्वच सुखांचा त्याग करावा—सात्विक असो अथवा कसाही असो आनंदाचा मुळींच उपभोग घेऊं नये, सुख दुःखांत मनाची समस्थित्ति ठेवावी अशा उच्च परमार्थ पदवीला ती बिचारी अद्याप पोंचली नव्हती. एकच एक वात्सल्याची पवित्र आणि मंगल भावना तिला चहूं बाजूंनीं कवटाळीत होती आणि त्या भावनेची गोड मिठी सोडवण्याचें भानच तिला रहात नव्हतें !

रंगूप्रमाणेंच लक्ष्मीच्या त्या दैवी वैभवाकडे निरनिराळ्या दृष्टीकोनानें पहाणाऱ्या आणखी तीन व्यक्ति होत्या. रंगूप्रमाणेंच त्या तीन्ही व्यक्ति आपापल्या ठिकाणीं राहून स्वतःवर होणाऱ्या परिणामानें स्वतःला विसरून गेल्या होत्या.

मल्हारी तो देखावा पहात होता. त्याचे नेत्र अत्यंत अधीरतेनें त्या सर्व प्रसंगाचें निरीक्षण करीत होते. महाराष्ट्रांतल्या एका भिकार खेड्यांत जन्म पावलेली ही भक्तिगंगा कांचनद्वीपांत इतके पराक्रमी स्वरूप धारण करील ह्याची त्याला कल्पनाही नव्हती. शिशुपणांत उघड्या अंगानें फिरणारी लक्ष्मी आज इतक्या मजुरांची अधिष्टाची देवता व्हावी ह्याचें मल्हारीला नवल वाटलें व त्याबरोबरच त्याला आदरही वाटला. लक्ष्मीचें तें दिव्य तज पहात असतांना तो स्वतः विषयीं मनांतल्या मनांत विचार करूं लागला. जगाच्या दृष्टीनें लक्ष्मीच्या मागोमाग इकडे येण्यांत आपण उल्लूच ठरलों ! एका पोरीच्या नादानें बिघडून जाऊन आपण आपले घरदार सोडलें. वृद्ध पित्याला विरह—दुखांत लोटलें आणि इकडे निघून आलों ! हाय—हाय लक्ष्मीचें आपण स्वतःला भक्त म्हणवतों आणि आपलें वर्तन किती गर्ह्य !

किती त्याज्य ? कर्तव्य करतांच जिनें आपल्या जन्माची धूळधाण होत असतां कशाचीही अपेक्षा न धरतां आपली त्यागवृत्ति कायम ठेवली त्या लक्ष्मीचे भक्त म्हणवतांना आपल्याला लाजच वाटायला हवी! आपण काय केलें? आपली कर्तव्यभूमी सोडली ज्यांच्या पोषणाचा सर्वस्वी भार आपल्यावर त्या वृद्ध पित्याला सोडलें. सर्व प्रकारें आपण आपल्या कर्तव्याला चुकलों! छे, छे, आज लक्ष्मी जर देवता झाली असेल तर आपल्या कृतीनें आपल्या स्वार्थी आचरणानें आपण राक्षसच ठरणार!

लक्ष्मी करतां स्वतःचे घरदार सोडण्यांत आपण मोठा स्वार्थत्याग केला ही घमेंड व्यर्थ व्यर्थ होय. उलट आपण पाप करून त्या पापाला स्वार्थत्याग हें सोज्वल नांव दिलें आणि आजपर्यंत जगाला तुच्छ लेखलें. आपल्या ह्या पापाचें प्रायश्चित्तच म्हणून कीं काय आपल्याला एकही संधी देवानें दिली नाहीं कीं ज्यावेळीं आपण लक्ष्मीची थोडी तरी सेवा केली असती. तिच्यावर आलेल्या प्रत्येक प्रसंगांत आपली तिला यत्किंचितही मदत झाली नाहीं. अशा रीतीनें आपले अत्यंत अमोल समाधान हिरावून घेऊन परमेश्वरानें आपल्याला तो एक धडाच शिकवला. खरा त्याग कोणता हें त्याच्या स्वरूपावर नव्हे तर परिणामावरूनच ठरतें हें तत्व मल्हारीला नीटपणें पटलें. सर्व तऱ्हेनें आपली अशी वंचना होत असतां आपण करावें तरी काय ह्याचा मल्हारीला मोठाच प्रश्न पडला. आपला गांव सोडतांना आपल्या मनाचा जो गोंधळ होता, तोच आजही कायम आहे आज आपण फिरून नव्या आयुष्याला सुरवात करण्याच्याच मार्गावर आहोंत! तर मग लक्ष्मीच्या मागें येण्यांत आपण केला तो खरोखरच मूर्खपणा! नुसत्या भटकण्यानें प्रेम मिळतें तर पशुपक्षांना तें सहज मिळाले असतें! पण तसें नाहीं. बाह्य स्वरूपाच्या कुठल्याही देखाव्याला प्रेम भुलत नाहीं. उलट हटकून तें तेथून नाहींसें होतें. अशा प्रकारच्या अत्यंत निराशाग्रस्त मनःस्थितींतच मल्हारी लक्ष्मीकडे पहात होता. निदान तिच्या श्रद्धेचा आणि भक्तिचा हा अलौकिक दिग्विजय तरी आपल्या दृष्टीस पडला हें कांहीं आपलें कमी भाग्य नव्हे. आकाशाप्रमाणें अफाट पसरलेल्या स्वतःच्या समाधानाचे समाधान करण्याला ता पूर्णपणें असमर्थ होता. दिशा चुकलेल्या आणि अथांग दर्याच्या

अकाळविकाळ लाटांत सांपडलेल्या गलबताप्रमाणें त्याची स्थिती झाली होती. मनःक्षोभाच्या तडाख्यांत सांपडून त्याची भाव-नौका इतस्ततः फेकली जात होती. आणि त्या तडाख्यानें तिचा कर्णधार-बिचारा मल्हारी एकसारखा हैराण होत होता !

मिलिंद ! नुसत्या भावनेच्याच भांडवलावर जगाशीं टक्कर देण्याला निघालेला एक तरुण! त्याला ह्या अफाट जगाच्या अकुंचित वृत्तींत लक्ष्मी-सारखें थोर रत्न गवसलें. त्याला कळूं लागल्यापासून वेड्यावाकड्या वाढ-लेल्या त्याच्या कल्पना-त्याच्या भावना-अखेर लक्ष्मीच्या पवित्र जीवन-केंद्राभोंवती स्थिर झाल्या. स्वदेशांतल्या चळवळीकडे अत्यंत आतुरतेनें पहाणाऱ्या त्याच्या दृष्टीस त्या चळवळी फोल कां ठरतात, ह्याचें कारण आतां उमगलें. हवेप्रमाणें भाषेचे बुडबुडे सोडून राष्ट्राला स्वातंत्र्य मिळत नसतें, तर असीम त्यागानेंच खरी खरी राष्ट्रोन्नति होत असतें, हें त्याला लक्ष्मीच्या चिमुकल्या आयुष्यानें चांगलें शिकवलें. जिला आपण असहाय्य समजलों, जिला आपण शक्तिहीन मानलें, तिच्याच सहाय्यानें कांचनद्वीप सार्थ झालें. तिच्या आत्मशक्तीनें किसनचा उद्धार झाला. ज्या जनतेला आपण अज्ञ समजतों, जिचे प्रतिनिधी म्हणून आपण मोठ्या तोऱ्यानें मिरवतों, त्याच जनतेच्या आत्मशक्तीनें अखेर जिंकली जाणार ! आपल्यासारख्या मूठभर चळवळ्यांच्या चिमूटभर शक्तीनें पारतंत्र्याची मगरमिठी सोडवली जाणार नाहीं, हें तत्व मिलिंदाला आतां पूर्णपणें पटलें. त्याचा संपूर्ण अभिमान नाहींसा झाला. त्यानें स्वतःला विसरून आपलें आयुष्य पूर्णपणें लक्ष्मीच्या-विशेषतः राष्ट्रलक्ष्मीच्या सेवेकडे खर्च करण्याचा दृढ निश्चय केला. त्याच्यासमोर जो देखावा दिसत होता, त्यांत त्याला किसनचा उज्वल पश्चात्ताप पूर्णपणें प्रत्ययाला येत होता. किसनच्या चमत्कारिक नाहींसे होण्यामुळें मिलिंदावर फार मोठी जबाबदारी येऊन पडली होती. किसनच्या सर्व संपत्तीचा वारसा तो व लक्ष्मी ह्या दोघांकडे आला होता. मजुरांना एकेक वर्षाचा पगार मोफत वाटण्यांत आला होता व त्यांचे करार रद्द करून त्यांना स्वदेशाला जाण्याची परवानगी देण्यांत आली होती. किसनच्या योजनेप्रमाणें मिलिंदाला आपली देशसेवेची हौस भागवण्याची संधी मिळाली होती. स्वतः किसन मात्र त्या सर्व गोष्टींचें श्रेय घ्यायला तयार नव्हता. आपली योजना लिहून

मिलिंदाच्या हातीं पडेल अशी सोय करून तो जो नाहींसा झाला होता, त्याचा नंतर कुणालाच पत्ता नव्हता. मिलिंदाला तर किसनकरतां आतां वाईट वाटूं लागलें. प्रत्यक्ष नसलें तरी आपल्या औदार्यानें व स्नेहानें किसननें मिलिंदाच्या अंतःकरणांत शेवटीं पूज्यस्थान मिळवलें. आपल्या दिव्य त्यागानें आणि अलौकिक शक्तीनें त्यानें मिलिंदाला आपलेसें केलें. अत्यंत पापी माणसें जर आपल्या पापमार्गापासून परावृत्त झालीं, तर तीं किती वेगानें दुसरें टोंक गांठतात, ह्याचा चांगलाच अनुभव मिलिंदाला आला. किसन 'सैतान कीं साधु?' ह्याचा निर्णय प्रथम त्याच्या मनांत होत नव्हता. पण आज त्याच्यापुढें दिसणारीं स्वतंत्र झालेलीं आणि हर्षनिर्भर मजुरांचीं कुटुंबें पाहून किसन महान् साधू आहे ह्याबद्दल मिलिंदाच्या मनांत रतिमात्र शंका उरली नाहीं. किसनच्या आयुष्याची सर्व माहिती मिलिंदाला नव्हती, त्यामुळें किसन दुष्ट कसा झाला, ह्या गोष्टीचें रहस्य त्याला उलगडलें नाहीं. किसननें खास मिलिंदाकरतां म्हणून एक पत्र लिहून ठेवलें होतें. त्यांतलीं कांहीं वाक्यें तर मिलिंदाला विशेषच आठवत होतीं. "मीच उत्पन्न केलेला भस्मासूर अशा रीतीनें—सर्वस्वाचा स्वतःचा नाश करून मी ह्या जगांतून नाहींसा करीत आहें. आपल्याच रंगांत रंगलेलें जग माझ्यावर वाटेल ते आरोप करूं दे. पण मिलिंद तुम्हीं तरी असा विश्वास धरा कीं, त्या भस्मासुराच्या उत्पत्तीला एकटा किसनच कारण झाला नाहीं. मी एकवेळ तुमच्यासारखाच तरुण होतों—निष्पाप होतों. पण जगाच्या कपटपूर्ण काव्यानें मी फसलों. मी स्वतःच्या प्रियमाणसांना मुकलों. अब्रूला गमावून बसलों. अशा रीतीनें मला नागडा उघडा करून तुमचें निमकहराम जग दांत काढून मला म्हणूं लागलें, "नीतीच्या मर्यादा सोडूं नकोस" अशा संतापजनक स्थितींत कोण स्वस्थ बसेल? दुःखाच्या—अपमानाच्या उन्हाची तिरीप ज्यांना चुकूनही लागली नाहीं, अशा श्रीमंतांच्या पापी आचरणाकडे जग कानाडोळा करतें, नव्हे त्या पापाचें वेदोक्त संस्कार करायला तयार होतें. पण माझ्या आयुष्याचे प्रथम वाभाडे काढून, बेशरमपणें तें जग मला नीतीच्या पिंजऱ्यांत ठेवूं पहातें. अशा बंधनांत कोण राहील? माझ्या परिस्थितींत उभे रहा, आणि मग माझा न्याय करा. एवढीच तुम्हांला शेवटची विनंती आहे." किसनच्या म्हणण्यांत सत्य

होतें आणि म्हणूनच मिलिंदाला किसनबद्दल अननुभूत सद्भाव वाटूं लागला. किसन पुन्हां भेटेल तर आपण त्याचे पाय धरून त्याची क्षमा मागूं. पण आतां किसन भेटणार कसा, ह्याचा मिलिंदाला उलगडा होईना.

सर्व लहान लहान होड्यांतून मजुर आगबोटीवर पोंचवले गेले. किनाऱ्यावर लक्ष्मी, रंगू, मिलिंद व मल्हारी आणि ज्यांची तेथें रहाण्याची इच्छा होती ती पन्नास मंडळी एवढीच मागें राहिली. दूर अंतरावर दिसणारी ती बोट माणसांनीं फुलून निघाली. तिच्यांत जणूं जीवन ओतल्यामुळें ती हलूं लागली. एकदां, दोनदां, तीनवेळां शिटी झाली आणि बोट सुटली. मजुरांनीं कांचनद्वीपाकडे शेवटचें पाहून घेतलें. समुद्राच्या काठांवर उभ्या असलेल्या लक्ष्मीला तेथूनच वंदन केलें आणि आपल्या जन्मभूमीची व आपली लवकरच भेट होणार ह्या मनोराज्यांत दंग होऊन गेले.

ती निश्चल मूर्ति हलली. समुद्रकिनाऱ्यावर चाललेला सर्व प्रकार पहात असतां त्या मूर्तिला गहींवर येत होता. विशेषत: लक्ष्मीच्या सन्मानार्थ प्रत्येक मजूराची धडपड पाहून तर तो गहिंवर अधिकच दाटत असे. त्या टेंकडीच्या टोंकावरून सर्व हालचाली पहात असतां, कांहीं विलक्षण समाधान त्या मूर्तिला होत होतें. स्वत:च्या आयुष्याचें पूर्णपणें सार्थक झालें, असेंच त्या मूर्तीला वाटत असावें. सर्व कोलाहल शांत झाला. ती आगबोट सुटली हें त्या मूर्तीनें पाहिलें. समाधानाचा एक निश्वास त्या मूर्तीनें सोडला. आपल्या जीवनाच्या दोन टोंकांचीं गांठ घट्ट करून आतां त्या जीवनाला एखाद्या अर्भकाप्रमाणें पूर्णपणें आपल्या ताब्यांत घेऊन ती मूर्ति चालली होती. अंगीं शक्ति असून, हातीं संपत्ति असून, त्या सर्वांचा उपभोग–शून्य स्वामी होऊन त्या मूर्तीनें स्वत:चें सम्राटपद मिळवलें. त्या सम्राटपदावर त्याची स्थापना व्हायला कारणीभूत झालेली देवता–कांचनद्वीपांतली लक्ष्मी–तिच्याकडे–तिच्या चरणाकडे त्या मूर्तीचें सादर एकाग्र लक्ष होतें. तिच्या चरणानें पुनीत झालेल्या वालुकेच्या कणांकणांनीं स्वत:ला अभ्यंग स्नान घालावें म्हणून ती मूर्ति उठली. आकाशाच्या निळ्या पार्श्वभूमीवर एखाद्या तेजस्वी देवदूताप्रमाणें ती मूर्ति शोभत होती.

लक्ष्मी आणि इतर मंडळी परतली. किसनच्या भव्य प्रासादाजवळ

येतांच मिलिंद थांबला आणि त्यानें लक्ष्मीला आंत चलण्याची विनंती केली. रंगूचा हात धरून लक्ष्मी त्या भव्य प्रसादांत शिरली. कांचनद्वीपांतल्या वैभवाच्या सिंहासनावर अशा रीतीनें लक्ष्मीची—मूर्तिमंत त्यागमूर्तीची स्थापना झाली.

आकाशाच्या मध्य बिंदूवर सूर्यबिंब येऊन थडकलें. त्याचीं तेजस्वी किरणें समुद्राच्या लाटावर पडून त्यांना जणूं चांदीच्या रसांत बुडवून काढीत होतीं. वृक्षाच्या छायेखालीं पशूपक्षी समाधानानें रवंथ करीत होते. जिकडे तिकडे शांततेचें राज्य पसरलें होतें.

आपल्या मूकतेनें कांचनद्वीपांतील वनश्री आणि जलश्री लक्ष्मीच्या विरागी जयश्रीचें गीत गात होत्या. ती निश्चल मूर्ति कुठल्या तरी अज्ञातस्थळीं आपल्या अश्रूंनीं त्या गीतावर अभिषेक करीत होती.

सर्वसाक्षी भगवंताचा नेत्र—सहस्ररश्मी सूर्यनारायण आपल्या अनंत करांनीं चराचरांना आशीर्वाद देत होता. त्यांचे मंगल करीत होता. त्यांना श्रद्धेचा मार्ग दाखवीत होता.

---

# उपसंहार

उषःकालाचा समय जवळ जवळ येत होता. विलासी रजनीचा शृंगारीक खेळ भरत—वाक्य म्हणण्याची तयारी करीत होता. अंधःकाराच्या संमोहांतून महाराष्ट्रभूमि हळूं हळूं जागी होत होती. आंजारूनगोंजारून निद्रामग्न झालेलीं पाखरें जागीं होऊन गोड आवाजांत पहाटेपूर्वीची भूपाळी म्हणत होतीं. एखाद्या उंच झाडाच्या ढोलींत पारव्याचा जोडा एकमेकांच्या आगाला बिलगून प्रेमाच्या बेहोष स्थितींत गुंग होऊन गेला होता. गुरें चारणाऱ्या गुराख्यांच्या बांसरीच्या सुरानें मुग्ध होऊन एखादा नाग डौलानें आपला फणा उभारून डुलत होता. बागाइताला पाणी भरण्याकरतां मोटाचे दोर हातीं धरून कुणी शेतकरी आपल्या ‘ सर्जा—वाघ्या ’ ला चुचकारीत गाणीं म्हणत होता. आणि दूर अंतरावर शेतांत बारे देणाऱ्या ‘ कारभारणी ’ ची काळीसांवळी मूर्ति मधून मधून न्याहाळीत होता. पाण्यांत पडलेलें तिच्या कुरळया केशांचें प्रतिबिंब पाहून एखादा कवि वेडावून गेला असता आणि रसिक

हृदयाला फास घालून डोलायला लावील अशा सुंदर ओळींच्या चौकटींत तें चित्र रेखण्याला कलम हातीं धरलें होते. मानवी रक्तशोषण्याची शहरांतली यंत्रें सुरू होण्यापूर्वी कर्कश शिट्या देऊन आपले सैतानी अस्तित्व जाहीर करीत होतीं.

कडेपठारावर विषादपूर्ण मुखानें अधिष्ठित झालेलें सिंहगड, पुरंदर, आपल्या स्वातंत्र्य लक्ष्मीची आठवण होऊन मंद मंद उसासे टाकीत होते. तर सिंधुदुर्ग विजयदुर्ग समुद्राशीं त्या पहाटेच्या वेळीं हळूंच कांहीं तरी कुजबुज करीत होते. जणूं कांहीं आपल्या महाराष्ट्रभूमीला पुन्हां स्वातंत्र्य देण्याकरतां हे दोन शूर दर्यावर्दी सागरांत शिरून भावी संग्रामाला उपयुक्त अशा गोष्टींची टेहळणी करीत होते. रायगडावरचे स्वातंत्र्य लक्ष्मीचे दरबार पारतंत्र्याच्या मंत्रानें दगडाधोंड्यांत रूपांतरीत झाले होते आणि शूर मावळ्यांच्या पाऊलवाटा बुजून गेल्या होत्या. स्वातंत्र्याची आठवणही त्यांच्या बरोबरच धुळीला मिळत होती. पेशव्यांचा शनवारवाडा आपलें सौभाग्य गेलें म्हणून खिन्न वदन करून उभा होता, आणि मुळामुठेचें पाणी अवमानित होऊन धरणावरून खालीं मान खालून मुकाट्यानें खालच्या खडकावर पडत होतें पारतंत्र्याच्या अपमानानें चिडून गेलेला सह्याद्री आपले ओठ घट्ट मिटून बसला होता आणि मस्तक उंच करून कठोर तपश्चर्या आंचरीत होता. महाराष्ट्रभू आपल्या त्या शूर आणि लाडक्या पुत्राकडे मोठ्या आशेनें पहात होती. पहाट झाली. सह्याद्री शरिरांत चेतना खेळूं लागली. त्याचे शिखर प्रकाशमान होऊं लागलें. महाराष्ट्रभूनें अत्यंत कौतुकानें पाहिलें तों पूर्व दिशेला गुलाल उधळला गेला होता.

त्या अत्यंत मंगल वेळीं एक प्रवासी चांदगांवाकडे जाणाऱ्या वाटेनें चालला होता. ओढ्याजवळ येतांच त्यानें आपले हातपाय धुतले आणि भक्तिपूर्वक असणाऱ्या रथांत अधिष्ठित झालेल्या सूर्यनारायणाला वंदन केलें. गांवांत असलेल्या मारुतीच्या देवळांत तो येऊन पोंचला. आंत शिरून त्यानें मारुतीच्या मूर्तीपुढें साष्टांग प्रणिपात केला आणि विसाव्याकरतां म्हणून तो तेथेंच बसला.

चांदगांवांत शेतकरी हळूं हळूं उठून आपल्या उद्योगधंद्याला लागत होते. गाईंना पाजण्याकरतां वांसरें सोडण्यांत आलीं आणि घरोघरच्या

यशोदा आपापल्या कृष्णाकरतां दूध काढूं लागल्या. लक्ष्मी—कांचनद्वीपाहून परतलेली लक्ष्मी—स्नान करून पांडुरंगाचें पूजन करण्यांत गढून गेली होती. रानफुलें आणि तुळशी विठोबाला तिनें वाहिली. दुधाचा नैवेद्य तिनें दाखवला. तेवत असणाऱ्या निरांजनाच्या प्रकाशांत आपल्या देवाचें रूप तिनें निरखून पाहिलें आणि हातीं चिपळ्या घेऊन ती भजन करूं लागलीः—

"तुज पाहतां सामोरी दृष्टी न फिरे माघारी ।
माझें चित्त तुझ्या पायां, मिठी पडली पंढरीराया ॥"

लक्ष्मीच्या हातांतल्या चिपळ्या थयथय नाचूं लागल्या. तिच्या हृदयांतल्या वृत्ति अधीर होऊं लागल्या. 'मिठी पडली पंढरीराया' हें म्हणत असतां तिचा प्राण खरोखरच भक्तिभावाच्या विमानांत बसून पंढरीरायाचे चरणीं लीन झाला. अननुभूत आनंद—समाधींत ती मग्न झाली. ती पुढें म्हणूं लागलीः—

"नोहे सारिता नीराळें—लवण मिळवितां जळें ॥"

तिची स्थिति पाण्यांत मिसळलेल्या मिठासारखीच देवाशीं तद्रूप झाली. बाह्य जगाच्या उपाधी आपोआप तुटल्या. तिची तपश्चर्या सफळ झाली. स्वतःच विसर पडून ती म्हणालीः—

"तुका म्हणे बळी—जीव दीला पायातळीं ॥"

संतश्रेष्ठ तुकारामाची प्रासादिक वाणी तिच्या अंतःकरणांतून वाहूं लागली. तिचे नेत्र मिटले गेले. अभंग संपतांच एकतानतेनें निराळीच सृष्टि निर्माण केली. तिच्या अंतर्चक्षुपुढें एक तेजःपूर्ण मूर्ति दिसूं लागली. ती मूर्ति जवळ जवळ येऊं लागली. त्या मूर्तीच्या डोळ्यांत अश्रूबिंदू तरंगत होते. पण मुखाच्याभोंवतीं अलौकिक तेज चमकत होतें. अत्यंत श्रद्धेनें ती मूर्ति आपल्याकडे पहात आहे असें लक्ष्मीला वाटलें. कांहीं तरी बोलावें म्हणून त्या मूर्तीनें आपले ओठ उघडले. पण दुसऱ्याच क्षणीं अत्यंत प्रयासानें एक अक्षरहीं मुखावाटे न काढतां त्या मूर्तीनें आपलें व्रत कायम ठेवलें. जड पाऊलानें ती मूर्ति तेथून निघाली. पुन्हां पुन्हां मागें वळून पहात ती मूर्ति दूर दूर जाऊं लागली. लक्ष्मीच्या नेत्रांना दिसणारें तेज अंधुक होत चाललें. त्या मूर्तीला नमस्कार करण्याकरतां तिनें

आपले हात जोडले. तिच्या पाठीशीं तिचा 'मुकुंद' रांगत रांगत येऊन उभा राहिला. लक्ष्मीनें आपल्या मुलाला मांडीवर घेतलें आणि चिपळ्या घेऊन ती पुन्हां अभंग म्हणूं लागली. मुकुंदानें आपल्या चिमुकले हातांनीं टाळ्या वाजवण्यास सुरवात केली.

तो प्रवासी नुकतांच येऊन पुन्हां मारुतीच्या मंदीरांत बसला. त्यानें आपले सामान उचललें. बजरंगाला एकवार साष्टांग नमस्कार केला आणि त्यानें पुन्हां चालण्यास सुरवात केली. त्या प्रवाशाची चांदगांवांतली ती छोटी भेट कुणालाही कळली नाहीं. तो प्रवासी उल्हासानें चालला होता. मारुतीच्या देवळासमोर एक उंच झाडावर फटकणारें भगवें निशाण त्याला दिसत होतें. महाराष्ट्राच्या त्याग धर्माचें सारस्वरूप त्या निशाणाच्या-रूपानें अखिल जगाला आपला दिव्य मंत्र सांगत होतें. वायूच्या लहरी दशदिशांना त्या मंत्राचें उज्वल भाग वाहून नेत होत्या. सह्याद्रीच्या दऱ्यां-खोऱ्यांतून तो मंत्र जपला जात होता. महाराष्ट्रांतल्या चलाचलांना विश्वास होता, कीं 'त्यागांतच आपल्या स्वातंत्र्याचा पुनर्जन्म होणार. भगवंताचें त्यागरूप भगव्या वस्त्रांतून—भगव्या झेंड्यांतून प्रगट होणार. त्यागानेंच महाराष्ट्र मुक्त होणार. त्यागानेंच महाराष्ट्र—धन्य होणार.'

तो प्रवाशी त्या मंत्रानें मुग्ध झाला. नव्या दृष्टीनें—नव्या आशेनें त्यानें पुन्हां त्या भगव्या निशाणाकडे पाहिले आणि विनम्र स्वरांत तो स्वतःशीच पुटपुटला "जशी तुझी इच्छा भगवंता!"

\+ + +

महाराष्ट्रावर प्रकाशणारा सूर्यनारायण कांचनद्वीपांतल्या 'त्याग—मंदीरा-वर' प्रकाशमान झाला होता. 'त्याग—मंदीर' पूर्वीचें किसनचें विलास-गृह आज प्रसन्न मुखानें प्रातःकाळच्या प्रशांत समयीं सूर्याला अभिवादन करीत होतें. कांचनद्वीपांत अद्यापही मजुरांची कुटुंबें होतीं आणि त्यांचा अद्याप 'छळ' होत होता. पण स्वतःच्या इच्छेनें होणारा तो छळ मजूर लोक आनं-दानें सोशीत होते. मिलिंदानें आपल्या देशाला लागणाऱ्या स्वदेशी वस्तू त्पन्न खरण्याचा प्रथम एक छोटा कारखाना काढला व त्यांत बेकार सुशिक्षित आणि ह्यांना त्यानें कामाला लावलें. त्याच्या देशसेवेच्या कल्पना स्वतःच्या उपाशी बांधवांच्या तोंडी अन्नाचा घास देऊन त्यानें प्रत्यक्षपणें अमलांत

आणल्या. अलोट संपत्ती हातीं असल्यामुळें त्याच्या प्रयोगाला जरी खर्च लागत होता तरी निरनिराळे धंदेशिक्षण घेऊन तरुण लोक स्वदेशीं परत जात तेव्हां त्या खर्चाचें चीज करीत असत. अशा रीतीनें समाधानाच्या सुखांत ह्या झालेल्या त्याच्या अंतःकरणांत कित्येक दिवस त्याला सोडून गेलेली त्याची कविताशक्ति परत आली होती. सूर्योदयाबरोबर सर्व कारखान्याची पहाणी करून तो परत आला आणि 'त्याग-मंदीरा' च्या पायरीवरच तो बसला. त्याग मंदीरावर लावलेलें भगवें निशाण-लक्ष्मीचा प्रसाद-उल्हासानें वायूशीं खेळत होतें. त्या निशाणाकडे पाहून मिलिंदाचें अंतःकरण भरून आलें. आपल्या प्रेमळ भगिनीची-लक्ष्मीची आठवण होऊन त्याची चित्तवृत्ति बावरी झाली. तिची त्याग-मूर्ति मनःश्चक्षू पुढें येऊन त्याची काव्यशक्ति स्फुरूं लागली. त्याला न कळत त्याच्या तोंडून पुढील ओळी बाहेर पडल्याः—

देवा हीन दीन मन आणि वाणी
गांजलो अती मी संसारांत
माया अवखळ मज बुडवोनि
घाली अवघड बांध मनी
आलें तुझ्या मनीं देवा मी बुडावें
परी न अंतरावें पाय तूझ
निर्वाणीची आस देवा तुझा ध्यास
राहो चित्तीं वास पांडुरंगा ॥

त्या अभंगांत मिलिंदाची तंद्री लागली. चरणामागून चरण म्हणत असतां त्याच्या हृदयाला गुदगुल्या होऊं लागल्या. टाळीचा ताल धरून अतिशय प्रेमानें तो तो अभंग म्हणत होता. ह्यापूर्वी त्यानें आपल्या 'काव्यां'तील प्रियेस' उद्देशून कित्येक चुटके केले होते पण त्या सर्वांपेक्षां आजच्या काव्यांत असलेली गोडी कांहीं अननुभूत होती.

त्याची तंद्री उतरली. त्यानें डोळे उघडले आणि पाहिलें तों रंगू डोक्यावर पाण्याचा भरलेला हंडा घेऊन आपल्याकडे अत्यंत आदरानें पहात उभी आहे, असें त्याला दिसलें. तो झटकन् उठला आणि तिच्या डोक्यावरचा हंडा उतरवून घेण्याकरतां पुढें सरकला. रंगू हंसून म्हणाली,

"नको नको. पांडुरंगाच्या भक्ताला माझ्याकरतां येवढे कष्ट नकोत. खरंच मिलिंद, तुम्ही इतकं सुंदर भजन म्हणतां. मला नव्हतें हें ठाऊक एकूण बरेंच आहांत हो !" रंगूच्या त्या प्रशंसापत्रानें बिचारा मिलिंद लाजला कांहींसा शरमून तो म्हणाला, "असं होतं. चुकून केव्हां तरी ! गाण्याचं असंच आहे, कीं ऐकणाराची वृत्ति जर प्रसन्न होत असेल तर गाढवाचा आवाज सुद्धां त्याला गोड वाटेल"

"बरं ! बरं !" रंगू डोक्यावरचा हंडा टेकीत म्हणाली, "स्वतःला गाढव म्हणवून घेण्यांत तुम्ही मला–तुमच्या आईला कोण ठरवतां सांगा पाहूं ? पुरुषांना कधीं सरळ वागतां यायचं नाहीं अन् बोलतां पण यायचं नाहीं."

"तुम्ही म्हणतां तें खरं मानलं तरी आईच्याच दुधांतून अन् रक्तांतून मुलांच्या अंगीं गुण उतरतो असं नाहीं का सिद्ध होत!" रंगूची कोटी तिच्यावर परतवली ह्या समाधानांत मिलिंद वरील वाक्य बोलून गेला. त्याला वाटलें आतां आपल्याला उत्तर मिळणें कठीण ! पण रंगू त्यावर म्हणाली, "कबूल, पण आईच्या पोटीं फक्त पुरुषच येतात असं नाहीं, तर स्त्रियाही येतात आणि त्या फक्त आईच्या दुधाशीं बेमान होत नाहींत. पण पुरुषांचं सारंच निराळं !"

मिलिंद त्या उत्तरानें हतबुद्ध होऊन गेला. किंचित् खिन्न होऊन त्यानें विचारलें, "मग तुमचें म्हणणें तरी काय रंगूबाई ?"

हंसत हंसत रंगू म्हणाली, "दुसरं काय, आम्ही म्हणणार आम्ही आहोंत. विशेषतः माझ्या लक्ष्मीसारख्या स्त्रिया आहेत म्हणूनच तुम्ही कांहीं तरी ताळ्यावर आहांत, नाहीं तर कधींच साऱ्या जगाला जाळून पोळून तुम्ही कंगाल बैरागी बनला असता !" एवढें म्हणून ती आंत गेली.

तिच्या साध्या शब्दांतल्या सत्याचा विचार करीत मिलिंद आपल्या पुढील उद्योगाला लागला.

'स्त्रिया म्हणजेच मूर्तिमंत त्याग' एवढेंच तो मनाशीं पुटपुटला !

ॐ तत्सत्

---

# भावंडांच्या भेटी

( १ ) " **विचारविलास** " ले० प्रो. वा. म. जोशी. एम. ए.

( २ ) मुलींची द्रौपदी ले० श्री कृ. गो. किनरे

( ३ ) मरणोत्तर स्थिति व परलोकविद्या ले. श्री रा. स. भागवत

( ४ ) सुखस्वप्नें ( श्री. वाग्भट ना. देशपांडे, )

'विचार विलास' हें प्रो. वा. जोशी यांच्या कडून व पुढील तीन पुस्तकें प्रकाशक मेसर्स गणेश महादेव आणि मंडळीकडून भेटीस आलीं आहेत.

यशवंतः—( या मासिकाचे पहिले दोन अंक )

हें नवीन मासिक महाराष्ट्रांतील साहसी, उद्योगरत, कल्पक असे मेसर्स गणेश महादेव आणि मंडळींचे प्रोप्रायटर, श्री. वीरकर यांनींच सुरू केलें आहे. या मासिकाचे दोनही अंक अत्यंत सुन्दर, वाचनीय आणि प्रेक्षणीय इतकेंच नव्हे तर अनुकरणीय असे निघाले आहेत. मराठींत ललित वाङ्मयाला वाहिलेलीं मासिकें यापुढें कशीं निघालीं पाहिजेत, याचें उत्तम उदाहरण म्हणून हें **यशवंत** बिनहरकत पुढें करण्यास हरकत नाहीं. **मनोरंजन** मासिकाचे कै. का. र. मित्र, यांच्याप्रमाणें, किंबहुना आजच्या काळांत, त्यांच्यापेक्षांही कांहीं कांहीं बाबतींत श्रेष्ठ गुण श्री. वीरकर यांचे जवळ ईश्वरानें देऊन ठेवले आहेत, यांत शंका नाहीं. असले साहसी प्रकाशक आपल्याकडे आहेत, याबद्दल कोणाही रसिकास अभिमान वाटल्यायांचून जसा रहात नाहीं, त्याचप्रमाणें त्यांच्या साहसाचें सक्रिय कोडकौतुक करावयाला जाणता महाराष्ट्र केव्हां पुढें सरसावेल याबद्दल थोडीशी काळजी लागल्याखेरीजही रहात नाहीं. अशा साहसी आणि निरलस प्रकाशकांनीं संपादक त्रयीही विद्वान्, कल्पक उत्साही अशीच मिळविली असल्यामुळें '**यशवंत**' वाढत्या कलेनें आपलें यश वाढवीत जाणार यांत शंका कशाला ?

भेटी देणाऱ्यांचीं माला अत्यंत ऋणी आहे.

---

# महाराष्ट्र–कुटुंब–मालेच्या " मातृसेवा "

## या कादंबरीवरील बड्या वर्तमानपत्रांचे अभिप्राय.

**केसरी**—वडिलांविषयीं अनादर, गुरुजनांविषयीं तुच्छता हे अवगुण अलीकडच्या पिढींत जास्त प्रमाणांत आढळून येतात. याचा दोष कोणाकडे या प्रश्नाचा विचार कोणीहि मनाशीं केला तरी त्याला त्याचें उत्तर मिळूं शकेल. वस्तुस्थिति मात्र आज अशी दिसते. ही गोष्ट एकंदरीनें बरी नव्हे. त्या वृत्तींत फरक पडला पाहिजे. गुरुजनांना योग्य तो मान दिला पाहिजे. त्यांजविषयीं पूर्ण आदर असला पाहिजे व त्यांजवरील आपत्ति दूर करण्याचा प्रयत्न त्यांच्या पुत्रपौत्रांनीं केला पाहिजे, या बुद्धीनें श्री. कुलकर्णी यांनीं ही कादंबरी लिहिली आहे. त्यांनीं कादंबरीला जो अभिनव असा उपोद्घात लिहिला आहे त्यावरून हा त्यांचा हेतु स्पष्ट दिसून येतो. हें तत्त्व बिंबविण्यासाठीं त्यांनीं पुराणांतील कद्रु व विनता यांच्या कलहाचा मनोरंजक प्रसंग घेतला आहे. कद्रूनें पण जिंकल्याकारणानें विनता तिची दासी झाली. परंतु दास्य हें केव्हांहि व कोणत्याहि स्थितींत असहनीय असल्यानें विनता त्या दुःखानें ग्रस्त झाली. माझ्या मातेची या दास्यांतून तूं काय मोबदला घेऊन मुक्तता करणार असा मातृभक्त गरुडानें कद्रूस प्रश्न केला व अमृत आणून दिल्यास माता विनता दास्यमुक्त होईल असें कद्रूकडून गरुडानें अभिवचन घेतलें. अनेक संकटें आलीं असतांहि बेदरकारपणें त्यांतून यशस्वी रीतीनें मार्ग काढून गरुडानें अमृत संपादन केलें व आपल्या मातेला दास्यमुक्त केलें व त्यानंतर तिला झालेल्या परमानंदांत तो विलीन झाला. आज हिंदपुत्रांपुढेंहि असाच प्रश्न उत्पन्न झाला आहे. विनतेप्रमाणें हिंद माता ब्रिटानियाची दासी म्हणून अत्यंत मानहानीनें आपलें जीवित आक्रमण करीत आहे. एखादा सुपुत्र माझा उद्धार करील काय ? मला माझ्या पूर्ववैभवावर नेऊन बसवील काय ? अशा आशेनें तीही अपेक्षा करीत आहे. हिंदपुत्र तिच्या ऋणांतून मुक्त होणार कीं तिला अशीच दास्यांत कुजत ठेवणार असा प्रश्नहि मातृसेवा कादंबरी वाचकाना करीत आहे. श्री. कुलकर्णी यांनीं मातृसेवा ही कादंबरी अगदीं योग्य वेळीं

राष्ट्रांत स्वातंत्र्याच्या विचाराची लाट जोरानें उत्पन्न झाली असतां प्रसिद्ध केली. कादंबरीची भाषा सुंदर व आकृत्रिम आहे. ती महाराष्ट्र कुटुंबमालेचा गौरव वाढविणारी आहे.

**नवाकाळः**—श्री कुळकर्णी यांनीं आपली कादंबरीची रचना मुख्यतः महाभारतांतील आदिपर्वांत आणि वेदांतील सुपर्णाख्यान यावरील कथानकाला धरूनच केली आहे. परन्तु भाषाशैली आणि वर्णनकौशल्य या गुणांमुळें त्यांनीं वाचकाचें मनरंजन करून त्यांना तत्वबोधही केला आहे. केवळ मनोरंजन करून वेळ घालविण्यासाठीं ज्यांनीं हें पुस्तक हातीं घेतलें त्यांना कदाचित् हें कंटाळवाणें वाटण्याचा संभव आहे; कारण कद्रुविनताख्यान हें पौराणिक आख्यान आबालवृद्धांना परिचित असल्यामुळें 'पुढें काय असावें' हें औत्सुक्य ही कादंबरी वाचतांना उत्पन्न होणें शक्य नाहीं. लेखक कितीही उत्कृष्ट असला व रूपकाचे अलंकार चढवून आपलें पौराणिक कथानक आकर्षक, करण्याचा त्यानें कितीही प्रयत्न केला, तरी तें कादंबरीच्या स्वरूपांत मनोवेधक करणें किती अवघड आहे हें श्री. कुळकर्णी यांच्या प्रस्तुत प्रयत्नावरून दिसून येत आहे. कद्रुविनताख्यानाचें पोटीं कोणतें रहस्य आहे व असावें या जिज्ञासाबुद्धीनें हें पुस्तक वाचूं लागल्यास हें पुस्तक मनोरंजन करतां करतां मातृसेवेच्या उच्च भावनेची छाप वाचकांच्या अंतःकरणावर मारल्याखेरीज राहात नाहीं. आपली जन्मदात्री माता, आणि हिंदभूमाता यांच्याविषयींच्या कर्तव्याची जाणीव सांप्रतच्या काळीं हिंदवासीयांमध्यें किती आहे, याची तुलना गरुडाच्या जाज्वल्य व पवित्र मातृभक्तीबरोबर करतां करतां वाचक मातृसेवा या पुस्तकाची पानें चाळूं लागला म्हणजे गरुडाच्या मातृसेवेच्या प्रसंगाचीं वर्णनें त्याचें हृदय हालवून टाकल्यावांचून राहराहणार नाहींत. गरुडाच्या मातृभक्तीच्या पद्धतीची मातृभक्ति अंशतः अंगीं असलेले हिंदभूमीचे सुपुत्र कै. लोकमान्य टिळक किंवा लाला लजपतराय यांची चरित्रें जगाला आदरणीय का झालीं ? महात्मा गांधी यांचें चरित्र जगाला अद्यापहि आदरणीय कां वाटतें ? या सर्व प्रश्नांच्या उत्तराचें रहस्य मातृसेवेंतील गरुडाच्या चरित्रांत सांपडण्यासारखें आहे. गरुडासारखे थोडे जरी सुपुत्र हिंदभूला लाभले तरी 'एकश्चंद्रः स्तमोहं ति नच

तारागणोऽपि च' या न्यायानें हिंदभूचा उद्धार झाल्यावांचून राहणार नाहीं, हा ध्वनियुक्त सुंदर बोध श्री कुळकर्णी यांच्या प्रस्तुत कादंबरींत सांठविलेला आहे या ध्वनि–बोधाचे दिव्य दृष्टीनें प्रस्तुत कादंबरीतील गरुडाच्या पराक्रमाची व मातृभक्तीची वर्णनें वाचलीं व वारंवार मनन करून त्या बोधांतील तत्वें आचरणांत आणलीं तर हिंदुस्थानांतील तरुणांना जडलेला गुरुजनांविषयींच्या आणि पितृजनांविषयीं अनास्थेचा व अनादराचा रोग नाहींसा होईल आणि मातेचे व मातृभूमीचे आनंदाश्रू सर्व सत्पुत्रांना पावन करून सत्कार्याला प्रवृत्त करणारा आत्मविश्वास त्यांच्या ठिकाणीं उत्पन्न करतील. असें झालें तर आपण लिहिलेल्या 'मातृसेवे'चें सार्थक झालें असें श्री. कुळकर्णी यांना वाटल्यावांचून कसें राहील ?

याशिवाय ज्ञानप्रकाश, आनंद, रामकृष्णनिकेतन, तुतारी, व्यायाम, वैनतेय, इत्यादि मधून अत्यंत सुंदर असे अभिप्राय आलेले आहेत. अभिप्राय देणारांची माला अतिशय आभारी आहे.

---